श्री.

# भोपाळसंस्थानचा इतिहास.

माधवराव व्यंकटेश लेले, बी. ए., एल्. सी. ई.

म्युनिसिपल सेक्रेटरी लष्कर ग्वाल्हेर व स्पेशल

फारेस्ट असिस्टंट, ग्वाल्हेर स्टेट.

यांनीं तयार करून

तो

मुंबई येथें




जावजी दादाजी याच्या

"निर्णयसागर" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला.



इ० स० १८९४.

किंमत १|| दीड रुपया.

हा लहानसा ग्रंथ

जनाब वालाशान

नवाब शहाजहान बेगम साहिबा,

मालिक-रियासत भोपाळ

यांस,

ग्रंथकर्त्यानें

त्यांच्या परवानगीनें परमादरपूर्वक नम्रपणानें

अर्पण केला असे.

ग्रंथकर्ता.

# प्रस्तावना.

हा ग्रंथ मूळ फारसी भाषेंत **नबाब वालाशान जनाब शहाजहान बेगम** यांनीं पुष्कळ वर्षांपूर्वी अनेक सरकारी कागदांच्या आधारानें तयार करून छापून प्रसिद्ध करविला. त्याचें इंग्रजी भाषांतर तयार होऊन त्यांच्या उदार आश्रयानें प्रसिद्ध झालें आहे. कांहीं सरकारी कामानिमित्त सं० १८८५ सालीं भोपाळास आह्मी गेलों त्या वेळीं **कप्तान. एम. जे. मीड** साहेब यांचे मार्फतीनें या मूळ फारसी ग्रंथाच्या आधारानें मराठींत भोपाळचा इतिहास तयार करण्याबद्दल परवानगी मिळविली. व तें काम तयारही झालें, पण पुढें अनेक अडचणींमुळें हा ग्रंथ प्रसिद्ध करण्यास सवड झाली नाहीं. हल्लीं **कर्नल डी. जी. पिचर** डिरेक्टर आफ लँड रिकार्डस् ग्वाल्हेर यांच्या सहाय्यानें **जनाब नबाब बेगम साहिबा** यांचें गुणी व गुणग्राही **वजीर** यांनीं भोपाळ दरबारांतून उदार आश्रय दिल्यामुळें हा ग्रंथ प्रसिद्ध होत आहे. याबद्दल आह्मी **नबाब बेगम साहेबांचे** अतिशय आभारी आहोंत.

हा ग्रंथ केवळ मूळ फारसी ग्रंथाच्या आधारानें लिहिला आहे. त्याच्यांतील गोष्टी खुद्द संस्थानच्या मालकानें चौकशी करून लिहिल्या असल्यानें त्याबद्दल विशेष शंका घेण्याचें कारण दिसत नाहीं.

स्वतः संस्थानिकानें लिहून प्रसिद्ध केला असल्यानें या ग्रंथाची विशेष योग्यता आहे हें येथें लिहिलें पाहिजे असें नाहीं.

या ग्रथांतील यत्किंचित गुणांचेंच ग्रहण करून दोषाबद्दल क्षमा करण्याविषयीं प्रार्थना करून वाचकांची रजा घेतों.

लष्कर ग्वाल्हेर,
ता. १ जानेवारी १८९४ इ.

**माधवराव लेले.**

# भोपाळचा इतिहास.

## प्रकरण पहिलें.

### भाग पहिला.

#### सरदार दोस्तमहंमदखान यांचा वृत्तांत.

सरदार **दोस्तमहंमदखान** बिन **नूरमहंमदखान** बिन **जानमहंमदखान** बिन **खानमहंमदखान मिराजीखेल** हे इ० सन १७३१ त **आलमगीर** ( औरंगजेब ) बादशहाचा पुत्र **बहादरशहा** याच्या कारकिर्दीत **अफगाणिस्थानां**तील **खैबर** प्रांतांत असलेल्या **तराई** नांवाच्या गांवाहून **हिंदुस्थानां**त आले व **लोहारी जलालाबाद** येथें राहिले. तेथें एका पठाणाशीं त्यांचा तंटा झाला, त्यांत तो पठाण मारला गेला. तेव्हां तेथील कामगार **जालालखान** हा याबद्दल त्रास देईल या भीतीनें ते तेथून निघून **शहाजहानाबाद** किंवा दिल्ही येथें जाऊन राहिले.

त्या वेळीं तेथील फौज **माळव्या**च्या सुभ्यावर जाण्याच्या तयारींत होती. तिच्याबरोबर निघून ते **माळव्यां**त आले व **सितामहू**च्या राजाजवळ कांहीं दिवस नोकरीस राहिले. नंतर तेथून **भोसा** येथें **महंमदफरूख** याजकडे गेले. त्याच्याजवळ आपलें सामान ठेवून ते एकटेच एका **माळव्या**च्या सरदाराजवळ नोकरीस राहिले. त्याच्या हुकुमानें **बांसबरेली**च्या जमीदाराशीं त्यांनीं लढाई केली. तींत त्यांना जबर जखम लागली. **दोस्त महंमदखान** लढाईत मारले गेले असें **महंमदफरूख** याला कोणीं खोटेंच कळविलें. त्यावरून त्यानें त्यांचें सामानसुमान

**भोशांत** होतें तें जप्त केलें. ही गोष्ट ऐकतांच **दोस्तमहंमदखान** एकदम **भोशास महंमदफरूख** यांजकडे आले. तेव्हां त्यानें त्यांचें कांहीं सामान परत दिलें व बाकीचें आपल्याजवळ नाहीं ह्मणून सांगितलें. यामुळें ते नाराज होऊन **भेरस्या** परगण्यांत **मंगळगड** येथें गेले, व तेथील ठाकूर **आनंदसिंग** सोळांखी रजपूत यांच्याजवळ नोकरीस राहिले. पुढें त्यांची हितसाधकता व जिवापाड नोकरी करण्याची शैली पाहून तेथील राणी त्यांना आपला मुलगा ह्मणवूं लागली. राणी मेल्यावर तिचा कांहीं माल व जवाहीर त्यांच्या स्वाधीन होतें, तें तिच्या वारसांस न देतां त्यांनीं नीट **भेरस्या** गांवाचा रस्ता धरिला.

त्या वेळीं हा गांव **ताजमहंमदखान** नांवाच्या एका बादशाही उमरावास जहागीर होता. **दिल्ही** येथील **तैमुरलंगा**च्या वंशांतील मोगल बादशाहातीस उतरती कळा लागली असल्यामुळें त्या वेळीं हिंदुस्थानांत राजकीय बंदोबस्त विशेष नव्हता. दरोडेखोर व लुटारू लोक प्रजेस फार लुटीत असत व **माळव्यांत पारासून** वगैरे ठिकाणच्या रजपूत ठाकुरांच्या आश्रयानें राहून ते **माळव्या**पासून थेट **खानदेश** व **वऱ्हाड** यांच्या हद्दीपर्यंत बहुतेक प्रदेशांवर अंमल करीत होते. **भेरस्या** परगणाही या लोकांनीं उद्ध्वस्त करून टाकला होता. **चांदखेडी** येथील अंमलदार **यारखान** व इतर सर्व जहागीरदार लोक दरवडेखोर लोकांमुळें अगदीं त्रासून गेले होते. **दोस्तमहंमदखान** यांनीं काजी **महंमदसाले** व **अलमचंद कानगो** यांच्या मार्फतीनें जहागीरदार यांजकडून **भेरस्या** परगणा तीस हजार रुपये प्रतिवर्षी देण्याचा ठराव करून हेक्यानें घेतला, व आपले भाऊबंद व संबंधी **पठाण** लोक यांजला **अफगाणिस्थानां**तून बोलावून त्यांनीं आणून आसपासच्या प्रदेशांत स्वाऱ्याशिकाऱ्या करण्याचा क्रम सुरू केला. कांहीं दिवसांनंतर त्यानें एक गुप्त हेर फकिराच्या वेषानें **पारासून** येथें पाठविला. त्यानें हल्लीं होळीचे दिवस असल्यानें **पारासून** येथील ठाकूर व त्याचे शिपाई नाच रंगांत अगदीं दंग आहेत असें गुप्तपणें लिहून पाठविलें. तेव्हां **दोस्तमहंमदखान** बरोबर चांगले

शूर व हुशार शिपाई घेऊन मध्यरात्रीं **पारासून** येथें जाऊन पोहों-चले. त्या वेळीं ठाकूर व त्यांचीं सर्व माणसें नशेंत धुंद होऊन होळीच्या तमाशांत नाच रंग पहात बसलीं होतीं. **दोस्तमहंमदखान** यांनीं त्यांज-वर एकदम छापा घातला. त्यांत ठाकूर व त्याचे पुष्कळ लोक मारले गेले. व त्यांचीं बायकामुलें व सर्व मालमत्ता **दोस्तमहंमदखाना**च्या हातीं आली.

पुढें त्यांनीं पुनः स्वारीची तयारी करून **खेचीवाडा** व **उमठवाडा** येथील लुटारू लोकांस अगदीं जेर करून टाकिलें. **भोशा**चे काम-गार **महंमदफरूख** यांच्याकडून **शमसीखान** व **राजेखान** नां-वांचे दोन सरदार **शमसाबाद** येथें नाजीम किंवा सुभे होते त्यांची व **दोस्तमहंमदखान** यांची लढाई झाली तींत ते दोघेही मारले गेले. **जगदीशपूर**चा **देवरा** जातीचा **रजपूत** ठाकूर मोठा लुटारू होता; त्यानें **बरखेडा, परगणे दिलोद** येथील पाटलाजवळ खंडणी मागितली; ती त्यानें **दोस्तमहंमदखाना**च्या मदतीच्या भरवशावर दिली नाहीं, ह्मणून रजपूत लोकांनीं त्याला लुटलें. तेव्हां तो **दोस्तमहंमदखाना**-पाशीं रडत आला. त्यांनीं त्याची खात्री करून त्याला आपल्या जवळ ठेवून घेतलें. पुढें कांहीं दिवसांनीं दिलोद परगणे **रायपूर** येथील ठाकुरानें, **जगदीशपूर**चा ठाकूर व त्याचे लोक लुटीकरितां दूर गेले आहेत व फक्त ह्मातारेकोतारे लोक घरीं आहेत अशी खबर दिली. ती ऐकून **दोस्तमहंमदखान** बरोबर चांगले हुशार शिपाई घेऊन शिकारीच्या बहाण्यानें **जगदीशपुरा**जवळच्या नदीतीरावर एका बागांत येऊन उतरले व त्यांनीं आपला वकील **जगदीशपूर**च्या ठाकुराकडे पाठवून त्याच्या भेटीची इच्छा प्रदर्शित केली. तेव्हां तेथील रजपूत सरदारांनीं त्यांच्याकडे रसद पाठवून दिली. व दुसरे दिवशीं ते स्वतः त्यांच्या भेटीस आले. **दोस्तमहंमदखानां**नीं मोठ्या आदरानें त्यांस आपल्या डेऱ्यांत नेऊन बोलण्याचालण्यांत गुंतविलें. व थोड्या वेळानें अ-त्तर व पान आणण्याच्या निमित्तानें बाहेर आले. त्यांनीं आपले शि-पाई डेऱ्याच्या आसपास लवाजम्याच्या व व्यवस्थेच्या बहाण्यानें उभे

केले होते व मी डेऱ्याच्या बाहेर येऊन अत्तर पान मागवूं लागेन त्याच वेळीं डेऱ्याच्या दोऱ्या कापून व डेरा पाडून आंतील लोक ठार मारावे, असें त्यांस पूर्वीच सांगून ठेविलें होतें. त्याप्रमाणें त्या शिपायांनीं तेथील सर्व रजपुतांची कत्तल करून त्यांचीं प्रेतें नदींत टाकून दिलीं. त्या दिवसापासून त्या नदीचें नांव **हलाली** पडलें. **जगदीशपूर**वाल्यांच्या बायका व सर्व सामान **दोस्तमहंमदखान** व त्यांचे भाऊबंद यांच्या हातीं आलें. **दोस्तमहंमदखान** यांनीं **जगदीशपूर**चें **इसलामनगर** असें नवें नांव ठेविलें. व तेथें एक मजबूत किल्ला व दुसऱ्या इमारती बांधून त्यांतच राहून आसपासच्या मुलुखावर अंमल बसविण्याची सुरुवात केली. थोड्याच दिवसांत त्यांचा अंमल व दरारा पुष्कळ वाढला. पुढें ते **भोशांचा** कामगार **महंमदफरूख** याच्याबरोबर लढण्याकरितां निघाले. कांहीं दिवसांनीं **भोशाच्या** नजीकच मौजे **जमालबावडी** या ठिकाणीं उभयतांची लढाई झाली. **महंमदफरूख** आपली फौज लढाईस पाठवून स्वतः हत्तीवर बसून लढाईचा तमाशा पहात राहिला होता. **दोस्तमहंमदखान** यांनीं आपला भाऊ **शेरमहंमदखान** यास त्याच्याबरोबर आपली बहुतेक फौज देऊन लढाईस पाठविलें. व ते स्वतः कांहीं निवडक शिपायांसह **जमालबावडी**च्या जवळ एक टेंकडी होती तिच्या आड लपून बसले. लढाई सुरू होऊन ऐन माऱ्याच्या प्रसंगीं '**दुराहा**' गांवचा **राजेखान** मेवाती यानें **शेरमहंमदखाना**ला बरची मारली, ती त्याच्या छातींतून पार निघाली. इतक्यांत **शेरमहंमदखाना**नेंही त्याचे तरवारीनें दोन तुकडे केले. याप्रमाणें ते दोघेही ठार झाले. तेव्हां **दोस्तमहंमदखाना**ची फौज पळूं लागली. तिचा **भोशाच्या** फौजेनें पाठलाग केला. **महंमदफरूख** यानें आपल्यास जय मिळाला असें समजून रणदुंदुभी वाजविल्या. इकडे **दोस्तमहंमदखान** यांनीं आपला शत्रु **महंमदफरूख** हा एकाकी व जयाच्या आनंदांत गर्क होऊन गाफील झालेला आहे असें पाहून मोठ्या शौर्यानें व चतुराईनें त्याच्यावर छापा घातला व

त्याला ठार मारिलें व त्याच्या बरोबरच्या लोकांस कैद केलें. व नंतर आपल्या तोंडावर धाटा बांधून ते **महंमदफरूख** याच्याच हत्तीवर स्वार झाले व त्यांनीं त्याचें प्रेत बरोबर घेतलें. नौबत वाजविणारे लोक पकडले गेले होतेच. त्यांना एकसारखी नौबत वाजविण्याबद्दल हुकूम दिला. **भोशाच्या** फौजेंतील लोक नौबतीचा आवाज ऐकून व आपला मालक हत्तीवर उभा आहे असें पाहून जय झाल्यानें आनंदांत निमग्न राहिले. संध्याकाळच्या सुमारास **दोस्तमहंमदखान भोशाच्या** किल्ल्याकडे गेले. तेव्हां किल्ल्यांतील लोकांनीं **दोस्तमहंमदखानालाच** आपला मालक समजून किल्ल्याचा दरवाजा उघडून आंत घेतलें. **दोस्तमहंमदखानांनीं** शिपायांसुद्धां किल्ल्यांत दाखल होतांच **महंमदफरूख** याचें प्रेत फेंकून दिलें व किल्ल्यांत सर्वत्र जागीं बंदोबस्तास आपले लोक ठेविले. हा जय मिळाल्यानें **दोस्तमहंमदखानांचा** फारच लौकिक झाला व त्यांचें महत्त्व वाढलें. पुढें थोड्याच दिवसांत माळव्यांतील **'महलपूर' 'गुलगांवा' उंटखेडी, घयासपूर, अंबापाणी, सांची चौऱ्याशीं, छाणवा, खामखेडा, अहंमदपूर, बागरोद, इच्छावर, देवीपुरा,** वगैरे पुष्कळ परगणे त्यांच्या हातीं आले.

त्या वेळीं **माळव्यांत दयाबहादर** हे सुभेदार होते, त्यांनीं हें वर्तमान ऐकून उज्जनीहून फौज पाठविली. तिची व **दोस्तमहंमदखानांची** लढाई झाली. त्यांत **इमदाद चिनी** यानें दगाबाजी केल्यामुळें सुभ्याच्या सैन्याचा पराभव झाला व त्याचा तोफखाना व पुष्कळसें सामान **दोस्तमहंमदखानांच्या** हातीं आलें. **सुजाअलपूरचा** अमीन **बिजेराम** यानें **दोस्तमहंमदखानांची** अशी बढती झालेली पाहून तो परगणा त्यांच्या स्वाधीन केला व तो स्वतः त्यांच्याजवळ नोकरीस राहिला. **कुरवाईचा** नबाब **दलेलखान** यानें **भेरशास** येऊन **दोस्तमहंमदखानांची** भेट घेतली व त्यांचा स्नेह संपादिला. पुढें ते दोघेही मिळून स्वारीशिकारी करून जो मुलूख किंवा माल मिळेल तो निमेनीम

वांटून घेण्याचा विचार करूं लागले त्या संबंधाच्या बोलण्याचालण्यांत उभयतांची तक्रार होऊन मारामारी झाली तींत नबाब **दलेलखान** मारला गेला व त्याच्याबरोबरचे लोक **कुरवाईस** पळून गेले.

**गोंड** लोकांचा **गुंनूर** नांवाचा एक फार उत्तम व मजबूत किल्ला होता, त्याचा मालक **निजामशहा गोंड** याला **चैनपुरबाडी** येथें राहणाऱ्या त्याच्या जवळच्या भाऊबंदांनीं विष देऊन मारविलें होतें. **निजामशहाची** राणी **कमलावती** व त्याचा मुलगा **नवलशहा** हीं **गुंनूरच्या** किल्ल्यांत रहात होतीं. राणीनें **दोस्तमहंमदखानांच्या** शूरत्वाचें वर्तमान ऐकून त्यांच्याकडे गुप्तपणें, **बाडीच्या** ठाकुरांनीं **निजामशहास** मारविलें, त्याचा सूड घ्यावा ह्मणून बोलणें लाविलें. **दोस्तमहंमदखान** यांनीं आपल्या लष्कराची तयारी करून गुप्तपणें येऊन **बाडी** परगणा जिंकून घेतला व आपण राणीचे कारभारी झाले. राणी मेल्यावर **गुंनूरचा** किल्लाही त्यांनीं घेतला व लुटारू आणि जबरदस्त असे सर्व **गोंड** नाईक मारून टाकून बाकीच्यांस थोड्याबहुत जहागिरी देऊन आपले अंकित केलें. आणि **इसलामनगरापासून** तीन कोसांवर एका मोठ्या तलावाच्या कांठीं पहाडावर **भोपाळ** नांवाचें एक खेडें होतें. त्या ठिकाणीं किल्ला व शहर वसविण्याचें ठरवून त्यांनीं स० १७९१ त तटबंदी करण्यास आरंभ केला. व तें शहर लौकरच वाढण्याची तजवीज केली.

इ० सन १७४० त **महंमदशहा** बादशहाची व **नादिरशहाची** लढाई झाल्यानंतर नबाब **कमरुद्दीनखान** बहादर **निजाम उल्मुलुख दिल्हीहून हैदराबादेस** जाण्यास निघाले. ते **इसलामनगरच्या** किल्ल्यानजीक **निजामटेकडी** नांवाची एक लहानशी पहाडी आहे. तिच्याजवळ लष्करासहित जाऊन उतरले. इ० सन १७४२ त **बऱ्हाणपुराजवळ** उभयतां सय्यद बंधू **सय्यद दिलावर अल्लीखान** व **सय्यदहुसेन अल्लीखान** यांची **निजाम उल्मुलुख** यांच्याशीं लढाई झाली. त्या वेळीं **दोस्तमहंमदखानाचे** बंधू **मीर अहंमदखान** हे ५०० स्वार व २०० उंटांवरील जेजाला यांच्यासहित **दिलावर अ-**

**ल्लीखान** याच्या पक्षाकडे होते. ते मारले गेले होते. त्यावरून **दोस्त-महंमदखानांशीं** वैर धरून त्यांचा पाडाव करण्याची **निजामानें** इच्छा केली. **दोस्तमहंमदखानांनीं** अशा बलाढ्य शत्रूबरोबर लढण्याचें आपलें सामर्थ्य नाहीं असें पाहून तह केला व आपला मुलगा **यारमहंमदखान** याला **निजामउल्मुलुखाबरोबर** पाठविलें. **दोस्तमहंमदखान** यांनीं ३० वर्षेंपर्यंत सारखी मेहनत करून मुलूख मिळविला. त्यांना लढाईंत तिसांहून अधिक जखमा झाल्या होत्या. ते आपल्या वयाच्या ६५ किंवा ६६ वे वर्षीं इ० स० १७६३ सालांत मरण पावले. त्यांना **भोपाळानजीक फतेगडच्या** किल्ल्यांत पुरलें. तेथें त्यांची कबर अद्याप कायम आहे. त्यांचे वडील **नूरमहंमदखान** यांची कबर **भेरशा** येथें आहे. त्यांना सहा भाऊ होते, त्यांतील वडील **शेरमहंमदखान** हे **महंमदफरूख** यांच्या बरोबरच्या लढाईंत मारले गेले. दुसरे **अलफमहंमदखान** हे **बाजीराव** पेशवे मराठे यांच्याशीं लढतांना मारले गेले. तिसरे **शहामहंमदखान** हे **देवाभाऊ धारच्या** महाराजाचे सरदार यांच्याशीं लढतांना मारले गेले. चवथे **मीरअहंमदखान, दिलावरअल्लीखान** यांच्या लढाईंत मारले गेले. व पांचवे **अकिलमहंमदखान** हे **भोपाळास** दिवाण होते, हे आपोआप मेले. **दोस्तमहंमदखानाला** सहा मुलगे व पांच मुली होत्या. त्यांच्या मुलांचीं नांवें;—**यारमहंमदखान, सुलतानमहंमदखान, सदरमहंमदखान, फाजीलमहंमदखान, वासीलमहंमदखान, खानमहंमदखान.**

---

## भाग दुसरा.

### नबाब यारमहंमदखान.

**दोस्तमहंमदखान** मरण पावल्याचें वर्तमान **निजाम उल्मुलुख** यांनीं ऐकून **यारमहंमदखान** यास ह्मटलें 'तुझा बाप मरण पावला.' त्यावर **यारमहंमदखानानें** उत्तर दिलें कीं, 'आपण मला माझ्या

वडिलांच्या जागीं माझ्या शिरावरचें छत्र आहांत. एक पठाण विलायती मेला तर मेला.' हें ऐकून **निजामउल्मुलुख** फार खुष झाले. व त्यांनीं **यारमहंमद्खानाला** खिलत, माही मरातब, व नगारा, निशाण, हत्ती, घोडा, पालखी, छत्र, अबदागिरी वगैरे सुद्धां नबाबाचीं वस्त्रें व उमरावाची पदवी दिली, व बरोबर पुष्कळ सैन्य देऊन **भोपाळास** रवाना केलें. ते **भोपाळास** येऊन पोहोंचले. इकडे **दोस्तमहंमदखान** मरण पावले त्या वेळीं फौजेंतील मोठमोठ्या कामगारांनीं **सुलतानमहंमदखानाला** गादीवर बसविलें होतें. **नबाब यारमहंमदखान** यांचें वय त्या वेळीं १८ वर्षांचें होतें. त्यांनीं **सुलतान महंमदखानास** गादीवरून दूर केलें, व ते स्वतः गादीवर बसले. पुढें **अकीलमहंमदखान** दिवाण मरण पावल्यावर त्यांनीं **बिजेराम** यांला दिवाणगिरी दिली. व आपण स्वतः **इसलामनगर** गांव पसंत करून उत्तम इमारती बांधून तेथेंच राहिले, व तेथून त्यांनीं मुलूख संपादन करण्याचा उद्योग चालविला. कांहीं वर्षांनीं, **सेंवास, पठारी, उदेपूर** वगैरे परगणे त्यांच्या हातीं आले. **कोटा** व **बुंदी** येथील राजांशीं त्यांनीं लढाया करून व छापे घालून पुष्कळ खंडणी व लूट मिळविली. **रामपूर, ब्रिगभान,** व **करोड** येथें लढाया झाल्या त्यांत पुष्कळ बायकामुलें व वृद्धतरुण पुरुष त्यांच्या हातीं आलीं. त्यांत एक रजपूत किंवा ब्राह्मण जातीची मुलगी फारच सुस्वरूप व छानदार होती तिला पाहून नबाब फार मोहित झाले व त्यांनीं तिच्याशीं लग्न करून तिचा इतमाम पुष्कळ वाढविला.

**भोपाळच्या** जवळ **बोरबान बेटा** या गांवाच्या मैदानांत त्यांनीं **पेशव्यांच्या** फौजेशीं लढाई करून त्यांस पळवून लाविलें.

यांनीं एकंदर पंधरा वर्षेंपर्यंत राज्य केलें. व ते इ. स. १७७७ सालांत जलोदरानें मरण पावले. त्यांस **इसलामनगर** येथें पुरलें असून तेथें त्यांची कबर अद्यापि कायम आहे. त्यांना दोन चार मुली व

**फैजमहंमदखान**, **हयातमहंमदखान**, **सय्यदमहंमदखान**, **हुसेनमहंमदखान**, व **यासीनमहंमदखान** असे पांच मुलगे होते.

---

## भाग तिसरा.

### नबाब फैजमहंमदखान.

नबाब **यारमहंमदखान** मरण पावल्यावर दिवाण **बिजेराम** यांनीं **इसलामनगर** येथें नबाब **फैजमहंमदखान** यांस गादीवर बसविलें. त्या वेळीं त्यांचें वय अकरा वर्षांचें होतें. इकडे **भोपाळास उमेदराय**, **टीकाराम**, **इब्राहिमखान चेला** वगैरे कामगारांनीं **सुलतानमहंमदखान** याला गादीवर बसविलें. त्यावरून दिवाण **बिजेराम** ५००० पांच हजार फौजेनिशीं लढाईच्या इराद्यानें **इसलामनगराहून भोपाळास** आला. दोन्ही पक्षांची लढाई सुरू होऊन तोफा व बंदुका चालल्या. **चैनपुरबाडी**चा अमीन **हुलासराय** हा हें वर्तमान ऐकतांच आपल्या फौजेसुद्धां **भोपाळास** आला व त्यानें **सुलतानमहंमदखान** यास सांगून पाठविलें कीं, 'आपण मला किल्ल्याच्या आंत घ्याल तर मी **बिजेरामा**च्या बंडाचा एका क्षणांत नाश करून टाकीन.' **सुलतानमहंमदखानानें** त्याचें बोलणें खरें मानून त्याला फौजेसुद्धां किल्ल्यांत घेतलें. परंतु त्या कपटी **हुलासरायानें** शहरांत येतांच किल्ल्यावर, शहराच्या कोटावर, व बुरजांवर आपली फौज ठेवून शहराचे दरवाजे आपल्या ताब्यांत करून घेतले व लागलेच **सुलतानमहंमदखानाला** शहराबाहेर काढून देऊन **फैजमहंमदखानाला** आंत घेऊन यश मिळविलें.

**सुलतानमहंमदखान** शहराबाहेर निघाल्यानंतर लढाईची तयारी करण्यास लागले व थोडेच दिवसांत फौज जमवून लढाईस सिद्ध झाले. शहराचे बाहेर ईदग्याच्या मैदानांत दोन्ही पक्षांकडून लढाईची तयारी झाली. **नबाबही** आपली फौज घेऊन शहराबाहेर निघाले व त्यांनीं **सय्यदइब्राहिम** किल्लेदार याला हत्तीवर बसवून बरोबर फौज देऊन **सुलतान-**

**महंमदखान** याच्या फौजेशीं लढण्यास पाठविलें, लढाई सुरू होऊन तोफा, बंदुका व तलवारी चालूं लागल्या व दोन्ही पक्षांचे शिपाई फार वेळ मोठ्या आवेशानें लढले. **सुलतानमहंमदखान** हत्तीवर बसलेल्या किल्लेदारासच नबाब समजून त्याच्याजवळ आला व त्यानें आपल्या घोड्यास उडवून किल्लेदारास ठार मारिलें. त्यामुळें फौजेंत गडबड होऊन गेली. तेव्हां नबाबानें आपल्या स्वतःच्या फौजेनिशीं निकरानें हल्ला केला. हें पाहून **सुलतानमहंमदखान** व **सय्यदमहंमदखान** लढाई सोडून पळून गेले व त्यांच्या फौजेची दाणादाण झाली. नंतर **सुलतानमहंमदखान कुरवाईचा** जहागीरदार नबाब **इजतखान** याच्याकडे गेला. परंतु त्याजकडून कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून आपल्या जहागिरीच्या गांवीं गेला व तेथून त्यानें **रहाटगडच्या** किल्लेदाराला वश करून घेऊन तेथें जाऊन लढाईच्या तयारीस आरंभ केला. नबाब **फैजमहंमदखान** त्याचा पाठलाग करीत **सेंवासपर्यंत** गेले. पुढें उभयतांत तह होऊन **फैजमहंमदखानांनीं** त्याला **रहाटगड** जहागीर देऊन, त्यांनीं किंवा त्यांचे बंधु **सदरमहंमदखान** यांनीं केव्हांही भोपाळच्या राज्यांत दखल देऊं नये असा ठराव लिहून घेतला. असा या तंट्याचा निकाल करून नबाब **फैजमहंमदखान** शिकार करीत करीत **भोपाळास** पोहोंचले.

त्यांनीं राज्याचा बंदोबस्त, चांगले चांगले कामगार व आपली सावत्र आई **ममुलाबिबी** यांच्यावर सोंपवून दिला. असें सांगतात कीं, **सुलतानमहंमदखाना**बरोबरच्या लढाईंत नबाब **फैजमहंमदखान** यांचा न्हावी **काळूराम** हा मारला गेला. त्याला **इसलामनगरा**जवळील नाल्याच्या किनाऱ्यावर ईदग्याचे जवळच दहन केलें. त्या जागीं हिंदू लोकांनीं एक चबुत्रा बांधून त्याची पूजा करणें सुरू केलें, व त्या नाल्याचें नांव **काळभैरू** असें ठेविलें तें अद्यापपर्यंत प्रसिद्ध आहे.

**भोपाळ**शहरापासून पूर्वेस दहा बारा कोसांवर **रायसेन** नांवाचा एक उंच पहाडी किल्ला आहे, तेथें **दिल्लीच्या** बादशहाकडील **नवेद-**

**अल्लीखान ख्वाजासरा** या नांवाचा एक किल्लेदार होता. त्या वेळीं **तैमूरलंगाच्या** वंशांतील **मोंगल** बादशहांच्या राज्यास उतरती कळा लागली होती. त्यामुळें सर्व हिंदुस्थानांत चांगला बंदोबस्त नव्हता. व सर्वत्र निवळ भालेराई चालली होती.

नबाबांनीं किल्लेदार गाफिल आहेसें पाहून किल्ला आपल्या ताब्यांत घेतला, व 'लबाड व लुटारू लोक **रायसेन**च्या किल्लेदारास गाफिल पाहून **रायसेन**चा किल्ला आपल्या स्वाधीन करून घेऊन, त्यांत राहून, आसपासच्या प्रदेशांत बंडावा करूं इच्छीत होते. याकरितां त्या किल्लेदारास आह्मी आपल्याजवळ बोलावून घेऊन किल्ल्याचा चांगला बंदोबस्त केला आहे.' असें बादशहाकडे लिहून पाठविलें. त्यावरून बादशहानें त्यानां किल्लेदारीची सनद व फर्मान पाठवून त्यांची योग्यता वाढविली.

**पुण्याच्या पेशव्यांनीं दक्षिणे**पासून **अटके**पर्यंत व समुद्रापर्यंत सर्व देशावर स्वाऱ्या करून आपला अंमल बसविला होता. नबाब **यारमहंमदखानाच्या** फौजेनें त्यांचा एक वेळ पराभव केला होता. त्याबद्दल सूड घेण्याचें त्यांच्या मनांत फार होतें. नबाब **यारमहंमदखान** याचा भाऊ **वासिलमहंमदखान पेशव्यांच्या** फौजेंत नोकर होता, त्यानेंही त्यांस लढाई करण्याविषयीं भर दिली. त्यावरून **पेशव्यांची** फौज **भोपाळच्या** सरहद्दीवर येऊन पडली. **भोपाळ**वाल्यांनीं त्या जबरदस्त शत्रूबराबर लढण्याची आपली शक्ति नाहीं असें पाहून, **ममूलाबिबी** यांच्या सल्ल्यानें **भोसा, सुजावलपूर, अष्टा, सिहोर, इच्छावर, दुराहा** व **देवीपुरा** वगैरे परगणे **पेशव्यांस** देऊन त्यांपासून आपली सुटका करून घेतली. पुढें इ. स. १७६० सालांत **सदाशिवराव** व **विश्वासराव** दक्षिणेंतून **अहंमदशहा अबदाली** याच्या बरोबर लढण्यास निघाले, त्या वेळीं **भोपाळच्या** जवळ पोहोंचल्यावर त्यांनीं नबाबास भेटीस बोलाविलें, परंतु नबाब भेटीस गेले नाहींत, त्यावरून **भाऊ** बोलले, 'श्रीकृष्णकृपेनें **दिल्लीची** गादी **तुर्की** लोकांच्या हातून छिनावून घेऊन परत येऊं त्या वेळीं या पठाणाला पाहून घेऊं.' त्यावर नबाबांनीं

सांगितलें, 'देवाच्या दयेनें ही आपली इच्छा कधींही सफल होणार नाहीं.' शेवटीं असेंच घडून आलें. **भाऊ** सर्व लष्करासुद्धां **अहंमदशहाच्या** फौजेच्या हातीं सांपडून **पानिपत** मुक्कामीं मरण पावले, व **मराठ्यांचा** अतिशय नाश झाला. श्रेष्ठ कुलांतील **हिंदु** लोकांचीं बायकामुलें बावीस हजार व पन्नास हजार घोडे, दोन लाख बैल, पांचशें हत्ती, वीस हजार उंट व इतर अगणित सामान **अबदालीच्या** सैन्यास लुटींत सांपडलें. याप्रमाणें **दक्षिणी** लोकांचा पराजय व नाश झाला त्या वेळीं, **ग्वाल्हेरवाले महादजी शिंदे** एका उत्तम **दक्षिणी** घोडीवर स्वार होऊन पळाले. तेव्हां एक **दुराणी** स्वार त्यांच्या पाठीस लागला. साठ कोस दवडल्यावर घोडी थकून उभी राहिली, तेव्हां **दुराणीनें** लगट करून **महादजी शिंद्याच्या** घोंट्यावर तरवारीनें वार केला त्यामुळें त्याचा घोंटा तुटून गेला. त्याचें सर्व सामान, घोडी, हत्यारें, कपडे वगैरे छिनावून घेऊन तो **दुराणी** तसाच ६० कोस परत गेला.

या मोहिमेंत मुसलमानांचा जय होऊन **मराठ्यांचा** नाश झाला तो नवाब **फैजमहंमदखान** यांच्या शापानेंच झाला, असें **भोपाळचे** लोक मानतात व ते त्यांना सिद्धपुरुष समजतात. नवाब **फैजमहंमदखान** हे चांगले उंच व धिप्पाड असून ते आजानूबाहू होते व ते मितभाषी, एकांतप्रिय, थोर लोकांस पूज्य मानणारे व भाविक असे होते. ते **भोपाळच्या** बाहेर कधीं गेले नाहींत. त्यांचा नायबदिवाण **बिजेराम** हा चांगला योग्य मनुष्य होता. त्यानें **गोंड** लोकांस ताब्यांत ठेविलें होतें. तो मेल्यावर त्याचा मुलगा **घाशीराम** दिवाण झाला. त्यानें मोठमोठ्या हुद्यांच्या जागा हिंदु लोकांस दिल्या व गाई मारणारांचीं नाकें कापिलीं. आपल्या धर्माविषयीं, त्याला फार दुराग्रह होता, यामुळें दोन पठाणांनीं मसलत करून त्याला मारून टाकिलें. पुढें **इजतखान** दिवाण झाला. त्याला एका वेश्येनें विष दिलें. नंतर लाला **केसरीसिंग** याला दिवाणगिरी मिळाली. नबाबाचा धाकटा भाऊ **वासीनमहंमदखान** याला **केसरीसिंगाचा** मुलगा **मुनालाल** हा एका पठाणीशीं

लागू आहे अशी बातमी लागली, त्यावरून त्यानें कांहीं पठाणांशीं मसलत करून **केसरीसिंग** व **मुनालाल** यांना ठार मारविलें. त्यावरून त्यांच्या बायकांनीं घरांत दारू भरून आग लावून दिली, त्या योगानें घर उडून गेलें व त्यांच्या प्रेतांचा देखील पत्ता लागला नाहीं. या गोष्टीमुळें **नबाबास** पुष्कळ वाईट वाटलें. नंतर **यासीनमहंमदखान** दिवाण झाले. नबाब **फैजमहंमदखान** ता. २१ जमादिलावल हि. सं. ११९१ रोजीं, निमाज पढल्यानंतर मरण पावले. त्यांना जुन्या किल्ल्यांत पुरलें आहे. त्यांच्या कबरेवर एक मोठा घुमट बांधला आहे.

---

## भाग चौथा.

### नबाब हयातमहंमदखान यांची कारकीर्द.

नबाब **फैजमहंमदखान** मरण पावले त्या वेळीं त्यांना मूलबाळ नसल्यानें, त्यांचा धाकटा भाऊ नबाब **हयातमहंमदखान** याला ता. १ मोहरम हि. सन ११९२ रोजीं बुधवारीं **ममूलाबिबी** व राज्यांतले दुसरे मोठमोठे कामगार यांनीं गादीवर बसविलें. "खुदेव किश्वरे भोपाळ,"—"ईश्वर भोपाळच्या राज्याचा सहायकारी" या अक्षरांवरून ही तारीख निघते.

सरकारी दप्तरांतील एका जुन्या कागदांत लिहिलें आहे कीं, नबाब **फैजमहंमदखान** यांच्या मरणानंतर त्यांची बायको **सालेबेगम** ऊर्फ **बहूबेगम** इची आपणच राज्याची मुखत्यारीण रहावें व दरबारी लोकांचा सलाम शिरस्त्याप्रमाणें नबाबाच्या कबरेवर होत जावा अशी इच्छा होती. इकडे नबाब **हयातमहंमदखान**ही गादीवर दावा करीत होते. व **शरीफमहंमदखान** आपसांत लढाई करण्यास तयार झाला होता. दिवाण **यासीनमहंमदखान** नबाबाच्या मागून १९ दिवसांनीं मरण पावला. त्याचे पुत्रही गादीवर दावा करून लढण्यास तयार झाले होते. **बहूबेगम**जवळ एक निराळी फौज तयार होतीच. राज्यांतील कामगार लोक शिरस्त्याप्रमाणें दररोज सकाळसंध्या-

काळ, नबाब **फैजमहंमदखान** बहादर यांच्या कबरीवर सलामास जात असत. हा प्रकार पाहून **ममूलाबिबी** यांनीं **बहूबेगम**ला सांगितलें कीं राज्याचें काम पुरुषाशिवाय चालत नाहीं, याकरितां माजी नबाबाच्या भाऊबंदांपैकीं जो तुह्मास पसंत येईल त्यास गादीवर बसवा, याप्रमाणें पुष्कळशी समजूत केल्यावरून असें ठरलें कीं, नबाब **हयातमहंमदखान** यांनीं **बहूबेगम**च्या मर्जीप्रमाणें नायबीच्या तऱ्हेवर राज्यकारभार करावा. त्याप्रमाणें त्यांना नायबीचीं वस्त्रें मिळालीं. पुढें ३।४ तीन चार महिन्यांनीं दिवाण **छोटेखान** याला दिवाणगिरी देऊन **हयातमहंमदखान** स्वतः नबाब झाले. मेजर **विल्यम हौ** यांनीं केलेल्या इतिहासांत लिहिलें आहे कीं, 'कर्नल **गाडर्ड** साहेब कांहीं इंग्लिश फौजेसहित **भोपाळ**च्या नजीक मुक्कामास आले होते त्या वेळीं नबाब **हयातमहंमदखान** यांनीं त्यांच्याशीं स्नेह संपादन करण्याकरितां त्यांची चांगली व्यवस्था ठेविली. यामुळें त्या दिवसापासून या राज्याची व इंग्रजसरकारची दोस्ती राहिली. तिची आठवण इंग्रजसरकार विसरले नाहींत. त्याच इतिहासांत असेंही लिहिलें आहे कीं, **भोपाळ**चे लोक पुष्कळदां इंग्रजसरकाराशीं लढाई व तंटा करण्यास उत्सुक होते, परंतु नबाबांनीं त्यांस दाबून इंग्रजसरकाराशीं नेहमीं स्नेहाचें वर्तन ठेविलें. त्यावरून **मराठ्यांचें** व **भोपाळवाल्यांचें** वांकडें पडून, त्यांनीं **भोपाळ**चे पुष्कळ परगणे उद्ध्वस्त करून टाकिले. कर्नल **गाडर्ड** साहेबांची स्वारी पुनः **भोपाळा**स इ. सन १७७७ त आली. तेव्हां त्यांनीं **नबाब**साहेबांचे पुष्कळ आभार मानिले व त्यांनीं लिहून दिलें कीं, '**कंपनी**सरकार व **भोपाळ**सरकार यांच्यांत हमेशां स्नेह कायम राहील, व तुमच्यावर किंवा तुमच्या वारसांवर एखादा प्रसंग पडेल त्या वेळीं इंग्रजसरकाराकडून मदत मिळेल.'

त्या वेळीं **भोपाळ**च्या राज्याचें उत्पन्न सुमारें वीस लक्ष रुपये होतें, त्यांतून पांच लक्ष रुपये खुद्द नबाबसाहेबांच्या खासगी खर्चाकरितां दिले जात असून त्यावर दिवाणाचा कांहीं एक अधिकार नव्हता. बा-

कीच्या उत्पन्नांतून राज्यांतील शिपाई व कामगार वगैरेंचा खर्च दिवाणास भागवावा लागत होता. हे नबाब एकांतप्रिय व धार्मिक होते. व राज्याच्या कामांत त्यांचें लक्ष्य कमी असे. **बहूबेगम** सर्व राज्यांत मुख्य अधिकार चालवीत असे. तिच्या जुलमी स्वभावामुळें सर्व रयत त्रासलेली होती. नबाबांनीं चार गुलाम पाळलेले होते. **फोलादखान,** हा एका गोंडाचा मुलगा होता. **जमसेदखान** हा एका अहीराचा किंवा गौळ्याचा मुलगा होता. **इसलामखान** व **छोटेखान** हे दोघे कोणा ब्राह्मणाचे मुलगे होते. हे चारी मुसलमान झाले होते. **फोलादखान** हा लाला **भोलानाथ** व **दुर्जनसिंग** यांच्या मेळानें दिवाणगिरीचें काम करूं लागला. परंतु **नबाबा**च्या भाऊबंदांनीं त्याला ठार मारिलें. पुढें **ममूलाबिबी** यांच्या सल्ल्यानें **छोटेखान** दिवाणगिरीचें काम, तारीख १९ हि. सं. जिलकाद ११९४ पासून पाहूं लागला. या **ममूलाबिबीस माजी** असेंही ह्मणत. हिचा राज्यांत कोणत्याही तऱ्हेनें अधिकार नव्हता, परंतु ती सर्वांत वडील असून स्वभावानें चांगली, धार्मिक व उदार असल्यानें राज्यांतील सर्व कामगार व स्वतः **नबाब** तिचें ह्मणणें मानीत होते. ती ८० ऐशीं वर्षांची होऊन मरण पावली.

**छोटेखान** याला लिहिणें, वाचणें व हिशेब थोडेबहुत समजत होते. त्याचा, आसपासच्या **शिंदे, होळकर** वगैरे सरदारांशीं चांगला स्नेह होता. एक वेळ **हरीभाऊ** मराठ्यानें पेंढारी लोकांच्या साह्यानें, **भोपाळ**चे कांहीं परगणे लुटले व जाळले. तेव्हां **छोटेखानानें** फौज तयार करून त्याच्यावर पाठविली. ती येतांच **हरीभाऊ** पळून गेले, व ४०० शें पेंढारी धरले गेले. त्यांना **छोटेखाना**च्या समोर आणल्यावर त्यानें प्रत्येकास एकेक पागोटें व कांहीं रुपये देऊन, सोडून देऊन, सांगितलें कीं, 'पुनः तुह्मी आमच्या मुलुखांत आलां तर तुमची व्यवस्था निराळ्या तऱ्हेची होईल.' या गोष्टीचें सर्वांस फार आश्चर्य वाटलें. तेव्हां **छोटेखानानें** सांगितलें कीं, 'हे लोक सूड घेण्याच्या लायक नाहींत, व त्यांस सजा देणेंही बरोबर नाहीं; कारण हे **मराठे** लोकांच्या भरंवशा-

वर दांडगाई करितात. आजकाल **मराठे** बलाढ्य आहेत. आमच्या हातून त्यांचा कांहीं एक बंदोबस्त होऊं शकत नाहीं. तेव्हां आह्मी यांना मिंधे केले तर पुनः ते इकडे तोंड फिरविणार नाहींत.' हें त्याचें ह्मणणें खरें झालें. दिवाण **छोटेखान** जिवंत होता, तोंपावेतों पुनः पेंढारी लोकांनीं **भोपाळच्या** मुलखास त्रास दिला नाहीं.

**बहूबेगम,** दिवाण **छोटेखान** याच्याशीं नाराज होती. ती **फाजीलमहंमदखाना**चा मुलगा व **दोस्तमहंमदखाना**चा नातू **शरीफमहंमदखान** याला बोलली कीं, 'नबाब **हयातमहंमदखान** यानें आपल्या गुलामांस सर्वांचे धनी करून ठेविलें आहे. सर्व चांगल्या व भल्या कामगारांस त्यांच्या ताब्यांत राहावें लागतें, तुह्मांस त्यांच्यापुढें मान लवविण्याची लाज कशी वाटत नाहीं. मी पुरुष असतें तर त्या गुलामांची खबर घेतली असती.' त्यावर **शरीफमहंमदखान** बोलले, 'आह्मी काय करावें, नबाबसाहेब मालिक आहेत, ज्याला वाटेल त्याला ते वाढवूं शकतात.' **बेगमेनें** सांगितलें कीं, 'माझ्याजवळ पुष्कळ द्रव्य आहे, तुझ्यांत सामर्थ्य असेल तर कांहीं कर.' **शरीफमहंमदखान** तिच्या बोलण्यावरून फसला, व त्यानें गुप्तपणें आपल्या भाऊबंदांत खटपट करून फौज जमा केली. परंतु द्रव्याची जरूर पडली तेव्हां **बेगमेनें** एक पैसाही दिला नाहीं. यामुळें **शरीफमहंमदखान** नाराज होऊन **सिहोरास** गेला व तेथें त्यानें स्वतःच्या खर्चानेंच फौज तयार ठेविली.

कसबा **अष्टा,** त्या वेळीं मराठ्यांच्या ताब्यांत होता. तेथें **मीरअबदुलरसूल** व **मीरअबदुलबाकी** नांवाचे त्याचे आप्त व स्नेही होते, त्यांच्या घरीं त्यानें आपलीं मुलेंमाणसें **वजीरमहंमदखान** याच्या हातीं पाठवून दिलीं व **गुंनूर**चा किल्ला घेण्याचा इरादा करून, तेथील किल्लेदार **कुलीखान** याच्याशीं फितूर करून, तिकडे आपली फौज पाठविली. नबाब **हयातमहंमदखान** यांनीं हें वर्तमान ऐकून **सय्यदकाजमअल्ली** याच्याबरोबर कांहीं स्वार व पायदळ देऊन **गुंनूरच्या** बंदोबस्ताकरितां पा-

ठविलें. किल्ल्याच्या जवळच दोन्ही पक्षांचें तुंबळ युद्ध झालें. त्यांत **शरीफमहंमदखाना**ची फौज पळून गेली व **मीरकाजमअली** मारला गेला. नबाबानें दुसरी फौज आणखी एका सरदाराबरोबर देऊन त्यास **गुंनूरास** पाठविलें. व **कुलीखानाला** परत बोलावून कैद केलें. **शरीफमहंमदखान** ७०० शें स्वतःचे लोक व **अष्ट्याच्या** अमीलाचे शिपाई व पेंढारी स्वार बरोबर घेऊन व आपले भाऊबंद **मुमताजमहंमदखान, कामिलमहंमदखान, शरीफमहंमदखान, आषकमहंमदखान, हाफीजमहंमदखान,** व **मरहमतमहंमदखान** यांच्यासह **अष्ट्याहून शिहोरास** आला व तेथून त्यानें **भोपाळाकडे** चाल केली. **छोटेखान** दिवाण यानें **हुसेनमहंमदखान** मिराजीखेल व **अनवरखान** कमालजई, यांना **भोपाळाहून** फौज देऊन लढण्याकरितां पाठविलें. **भोपाळापासून** पश्चिमेस पांच कोसांवर मौजे **पेंदा** या गांवीं तारीख १६ जमादिलावल सन १२०१ हिजरी दिवशीं संध्याकाळीं दोन्ही फौजांची लढाई झाली. पेंढाऱ्यांचे स्वार व **अष्ट्याची** फौज पळून गेली. तिकडून तोफा व बंदुकांचे आवाज होऊन बाण आकाशांत उडूं लागले. **शरीफमहंमदखानाच्या** फौजेनें फितूर केला व तो एकटाच भाऊबंदांसह मैदानांत राहिला. त्यानें मोठी बहादरी करून, तरवार गाजविली. व घोड्याची लगाम उचलून **भोपाळच्या** फौजेंत गडबड उडवून दिली व **भोपाळवाल्यांकडील** चांगल्या चांगल्या स्वारांस मारून टाकिलें. परंतु **भोपाळचे** लोक पुष्कळ असल्यानें, **कामिलमहंमदखान** घोडा दवडून पळून गेला, त्याच्याशिवाय **शरीफमहंमदखान** व त्याचे सर्व भाऊबंद मारले गेले. त्यांचीं शिरें कापून **भोपाळास** नेलीं. **नबाबास** या गोष्टीपासून पुष्कळ वाईट वाटलें व त्या शिरांस त्यानें नीटपणें गाडून टाकविलें.

यानंतर **छोटेखान** अगदीं निर्भय झाला व त्याला गर्व फार झाला. त्यानें पठाणांस अगदीं दाबून टाकिलें. **नबाबाचे** भाऊबंद आपल्या मनांत फार नाराज झाले. व कसेंही करून **नबाबास** मारून राज्य आ-

पल्या हातीं आणावें किंवा आपल्या पसंतीचा कोणी **नबाब** करावा अशी त्यांची इच्छा होती. **रमजान** महिन्यांतील **ईदी**च्या दिवशीं नबाब **हयातमहंमदखान** हे दर्ग्याहून परत येण्यास निघाले व नेहमींच्या चालीप्रमाणें **ममूलाबिबीस** भेटण्याकरितां जुन्या किल्ल्यांत गेले. **यासीनमहंमदखाना**चा मुलगा **निजातमहंमदखान** हा शूर, बलाढ्य, व धैर्यवान, होता, तो त्या वेळीं पठाणांची एक टोळी बरोबर घेऊन जुन्या किल्ल्यांत आला व **कुलीखाना**ला थोड्याशा शिपायांनिशीं किल्ल्याच्या दरवाज्यावर बसवून **झिकरियाखान** व **मीयाखान** यांना बरोबर घेऊन वाड्यांत गेला. व नबाबास आदबीनें सलाम करून **ईदे**ची नजर करून त्यांच्याजवळ बसला. इकडच्या तिकडच्या गोष्टी चालल्या, त्यांत त्यानें नबाबास ह्मटलें, 'आपण एका गुलामास पठाण लोकांवर मुख्य केलें आहे, त्याला काढून टाकावें, किंवा त्याला मारून टाकण्यास आह्मांस परवानगी द्यावी. व त्याचा शिरच्छेद करवून आपल्यावरील दोष दूर करावा.' त्यावर नबाब बोलले, 'तो माझा विकत घेतलेला गुलाम नाहीं. त्याला मीं आपल्या मुलाप्रमाणें पाळला असून त्याची इमानदारी व हुषारी पाहून त्याला दिवाणगिरी दिली. आजपर्यंत त्याला शिक्षा देण्याजोगें असें त्याच्याहातून लबाडीचें किंवा कृतघ्नपणाचें एकही काम झाल्याचें आढळलें नाहीं, त्यानें कांहीं अपराध केला असल्यास सांग, मी आतांच त्याचा बंदोबस्त करितों.' हें ऐकून **निजातमहंमदखान** यानें एकदम जंबिया काढून नबाबावर हल्ला केला. **परशुराम** चोपदार पडद्याच्या आड उभा राहून सर्व बोलणें ऐकत होता. त्यानें आंत येऊन आपली चांदीची छडी **निजातमहंमदखाना**च्या डोक्यांत मारिली. तोंच वाड्यांतील बायकांनींही आरडाओरड व गडबड केली, त्यावरून **अल्लीखान, झुलफिकारखान, शेखमकीम, हाजीमीया** व **मनीमिया** या नबाबाजवळच्या सरदारांनीं ताबडतोब वाड्यांत धांवत येऊन **निजातमहंमदखान** वगैरे लोकांस ठार मारिलें. **कुलीखान,** ही खबर ऐकून, किल्ल्याचा दरवाजा सोडून आपला जहागिरी गांव **आंबा-**

**पाणी** येथें गेला. राजा **भोलानाथ ईदे**च्या सलामाकरितां दरबारांत आला होता तोही या गडबडींत मारला गेला. **छोटेखानानें** पठाणांच्या हातून आपला बचाव होणें मुष्कील असें पाहून पुष्कळ पठाणलोक मारून टाकिले, पुष्कळ हद्दपार केले, व कांहींना त्यांच्या जामिनी जप्त करून घालवून दिलें, व **भोपाळ**च्या आसपास चौक्या बसविल्या. तरी हा तंटा न मिटतां पूर्वींपेक्षां थोडा जास्त बंदोबस्त मात्र झाला.

पुढें **छोटेखानानें** शहरच्या पूर्वेस **बाणगंगा**नदीला एक पक्की पाळ बांधली. तिलाच पक्का पूल असें ह्मणतात. या कामावर त्यानें **मीर-आबिद** व **आबिउदल्नबी** यांस दरोगे नेमिलें होतें. त्यानें शहराच्या सभोंवार खंदक खोदण्याचें काम सुरू केलें. परंतु तें तो मरण पावल्यामुळें तसेंच राहिलें. त्यानें **फत्तेगड** किल्ल्याची मरमत करवून त्यांत आपणास राहण्याकरितां एक महाल बांधिला. याच सुमारास **ममूलाबिबी** मरण पावली. तिनें बांधविलेल्या दोन मोठ्या चांगल्या पक्क्या मशीदी अद्यापि कायम आहेत. **छोटेखान** हा मध्यम उंचीचा होता व शरीरानें फार स्थूळ किंवा कृश नव्हता. बोलण्याचालण्यांत तो फार गरीबी दाखवीत असे. त्याचें वर्तन बहुतेक हिंदु लोकांप्रमाणेंच असे. तो चाळीस वर्षांच्या वयाचा होऊन शनवार तारीख २६ जमादिलाखर हि. स. १२०९ रोजीं पहांटेस मरण पावला. त्याला **फत्तेगड** किल्ल्यांत पुरलें आहे.

त्याच्या मागें **अमीरमहंमदखान, नबाबखान, दाराबखान, महमूदखान, दाऊदखान, इमामखान, वजीरखान, मीर इस्माईल-मीर असादुल्ला, मीरहातम** वगैरे सरदारांच्या मदतीनें त्याचा मुलगा दिवाण झाला. त्यांनीं त्याला आपल्या हातांत ठेवून रयतेवर जुलूम करणें सुरू केलें. त्यावरून नवाब **हयातमहंमदखान** यानें त्याला त्याच्या साथीदारांसह कामावरून दूर करून त्यांना **भोपाळांत** न येऊं देण्याविषयीं हुकूम दिला. तेव्हां त्यांनीं बंड करून **फत्तेगड** किल्ल्यांत बसून लढाई सुरू केली. व तोफांच्या गोळ्यांनीं शहरांतील पुष्कळ घरें पाडलीं. पुढें **नबाबा**च्या फौजेशीं लढाई झाली. नंतर कांहीं दिवसांनीं त्यांच्या अंगीं ल-

ढण्याचें सामर्थ्य न राहिल्यानें सहा लाख रुपयांचा माल त्यांनीं शहरांतून लुटून घेतला होता त्यासुद्धां ते मध्यरात्रीं किल्ल्याच्या खिडकींतून **नागपुरा**कडे पळून गेले व **रघूजी** राजे **भोंसले** यांच्याजवळ नोकर राहिले.

पुढें त्यांनीं त्या राजाला **हुषंगाबाद** घेण्याविषयीं उद्युक्त केलें, तेव्हां राजानें **सखारामबापू, पांडुरंगपंत** व **नूरखान** सफेतपोष यांच्या बरोबर चाळीस हजार फौज देऊन **हुषंगाबादे**वर पाठविलें. त्यांनीं जाऊन तेथील किल्ल्यास वेढा घातला. **शेखमाखन** किल्लेदार यानें नेटानें लढाई चालविली व आपल्या जवळील दोन हजार फौज पुरेशी नाहीं असें जाणून **भोपाळा**हून मदत मागविली. तेव्हां **नबाबा**नें बक्षी **खैरातीलाल** व **महिराबखान** यांच्याबरोबर दहा हजार फौज त्याच्या मदतीस पाठविली. कांहीं दिवस लढाई चालल्यावर एके दिवशीं मौलवी **महंमदखान** काबूली यानें शंभर विलायती लोकांनिशीं किल्ल्याच्या बाहेर निघून **नागपूर**च्या फौजेंत घुसून शत्रूस त्राहि त्राहि करून सोडिलें. या हल्ल्यानें **नागपूर**ची फौज घाबरून गेली व त्यांच्यांतील कांहीं सरदार मारले गेले. **मौलवी**-बरोबरचेही कांहीं लोक पडले. **मौलवी**साहेब किल्ल्याकडे परतले तों किल्ल्यावरील कोणी शिपायानें बंदूक चालविली, तिची गोळी त्यांच्या डोक्यास लागून ते रणांगणीं पडले. पुढें शत्रूच्या फौजेनें किल्ल्यास पूर्णपणें वेढा दिला. हें पाहून **भोपाळ**ची फौज किल्ला सोडून **नर्मदा** उतरून **भोपाळा**स परत आली व **नागपूर**वाल्यांनीं सन १२१० हिजरीच्या अवलीस तो किल्ला घेतला.

पुढें **हिंमतराम** मुत्सद्दी यास राजा हा किताब मिळून तो दिवाण झाला. **छोटेखाना**ची बायको आपल्या मुलास हद्दपार केल्यावर **भोपाळा**हून **सिरोंजे**स जाऊन राहिली. तेथें **टोंक**चा नबाब **अमीरखान** याच्याकडून तिला कांहीं दरमहा नेमणूक मिळत होती. तिचा दुसरा मुलगा **अमीरमहंमदखान** हा **जावऱ्या**चा नबाब **गफूरखान** याच्याजवळ नोकरीस राहिला. याप्रमाणें **भोपाळ**च्या राज्याची व्यवस्था होती. एके दिवशीं एक मनुष्य बरोबर कांहीं स्वार घेऊन शहराच्या तटाच्या दरवा-

ज्यावर आला, त्याला देवडीवरील शिपायानें रोंकून आंत जाऊं दिलें नाहीं, त्यावरून त्यानें, 'मी **शरीफमहंमदखाना**चा मुलगा **वजीरमहंमदखान** आपल्याकडे आलों आहें, असें जाऊन नबाबसाहेबांस सांगा,' असें देवडीवाल्यांस सांगितलें, तेव्हां त्यांनीं त्याप्रमाणें खबर पाठविली.

नबाबांनीं त्यांस बोलाविलें, तेव्हां **वजीरमहंमदखान** बहादर नबाबांजवळ आले. नबाबांनीं त्यांची प्रेमानें भेट घेतली व त्यांस विचारिलें, '**भोपाळा**हून तुह्मी गेल्यावर कसा गुजारा केला.' **वजीरमहंमदखानानें** सांगितलें कीं, 'दिवाण **छोटेखानाच्या** जुलुमामुळें आह्मी परदेशीं निघून गेलों व कांहीं दिवसपावेतों **उमटवाडी**चा सरदार **हत्तीसिंग** राजपूत याच्याजवळ राहिलों. तेथून पुढें दक्षिण **हैदराबादेस** जाऊन तेथें शिपायांत नोकर झालों. **भोपाळ**ची दुःखदायक स्थिति ऐकून फार वाईट वाटल्यामुळें आपल्या स्वदेशीं जाऊन पुनः त्याच्याचकडे आलों.' नबाबानें त्याच्या सेवेंत वय घालविण्याच्या इराद्यानें, गळ्यांत हात घालून ह्मटलें. 'तूं आतां मला मुलाच्या ठिकाणीं आहेस. व तूं या राज्याचें संरक्षण चांगलें करशील हें आह्मांस ठाऊक आहे.' पुढें कांहीं महिन्यांनीं राजा **हिंमतराम** याची दिवाणगिरी निघाल्यावर **वजीरमहंमदखाना**ला दिवाण करण्याची नबाबाची इच्छा होती; परंतु **नबाबा**चा मुलगा, **गोषमहंमदखान** व बायको **अस्मतबेगम** यांनीं हरकत करून सांगितलें कीं, 'या मनुष्यास अधिकार देऊं नका; कारण, याच्या वडिलांवर जो जुलूम झाला त्याचा हा खचित बदला घेईल.' तेव्हां नबाब स्वस्थ राहिले. व त्यांनीं **सुलतानमहंमदखाना**चा मुलगा **मुरीदमहंमदखान** याला **सैफुद्दीन** हकीम याच्या सांगण्यावरून **रहाटगडा**हून बोलावून आणिलें. **मुरीदमहंमदखान** आपल्याबरोबर हजार लोक घेऊन तारीख १२ जिल्काद सन १२१० हिजरी रोजीं **भोपाळास** येऊन शहराच्या बाहेर आपल्या बापाच्या बागेंत उतरला. तेथेंच सारा दिवसभर आपल्या वाडवडिलांची आठवण करीत व प्रत्येक झाडाला कवटाळून शोक करीत राहिला. तो एखाद्या

वाणगटाप्रमाणें दिसत असे. दुसऱ्या दिवशीं त्यानें नबाबाची गांठ घेतली. त्या वेळीं त्यानें त्याच्या मनाजोगीं गोड गोड भाषणें बोलून त्यास इतकें खुष केलें कीं तो नबाबास **गोषमहंमदखाना**पेक्षांहि जास्त आवडूं लागला. नंतर तो **अस्मतबिबीस** भेटण्यास वाड्यांत गेला व सलाम करून तिच्याशीं त्यानें मान खालीं घालून अशा आदबीनें भाषणें केलीं कीं **बेगमेचें** मन अगदीं वेधून गेलें. सर्व फौज, राज्यांतील कामगार व रयत वगैरेच्या बरोबर तो फारच मनमिळाऊपणानें वागल्यानें लोक त्याच्याशीं फारच राजी झाले. परंतु दूरदर्शी पठाणांनीं ताडिलें कीं 'हा मनुष्य परत आला हें या शहरास फारच अपायकारक आहे. पुढें काय स्थिति होईल याविषयीं मोठीच काळजी आहे.' नबाबांनीं हकीम **सैफुद्दीन** व **घासीमीया** यांच्या सांगण्यावरून त्याला दिवाणगिरी देण्याचें कबूल केलें. परंतु **मुरीदमहंमदखानानें** सांगितलें कीं, 'प्रथम **मराठे** लोकांपासून **भोपाळास** होणारा त्रास मिटवून नंतर मी दिवाणगिरी पतकरीन. नबाबांनीं पुष्कळ खर्च पडला तथापि त्याचें ह्मणणें कबूल केलें. नंतर त्याला तारीख ११ जमादिलावल सन १२११ हिजरी रोजीं दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं. **मुरीदमहंमदखान** यानें गरीब लोकांस पुष्कळ धर्म केला, व कामगार लोकांस वस्त्रें व पोषाक देऊन त्यांस आपलेंसें केलें. पुढें एक महिन्याच्या आंतच, त्याचा स्वभाव बदलून गेला. त्यानें प्रथम **विजेरामा**च्या बायकोस त्रास दिला व राजा **हिंमतराम** आणि त्याचा पुतण्या मुनसी **ख्यालीराम** यांना दीड महिना विनाकारण कैदेंत ठेवून दहा हजार रुपये दंड घेऊन सोडून दिलें. पेंढारी लोकांचा अंमल वाढत असल्यानें त्याजला फौज कमी करितां येईना. शिपायांना पगार देण्यास उशीर लागे यामुळें कांहीं महिन्यांचा पगार तुंबल्यावर शिपायांनीं बंड केलें. **मुरीदमहंमदखानानें** गांवांतील प्रत्येक घरवाल्याकडून सक्तीनें रुपया घेतला तरीही फौजेस पुरवठा न पडल्यानें राज्यास कर्ज झालें. तारीख ११ रजब रोज शनिवारीं संध्याकाळच्या वेळीं **मुरीदमहंमदखान अस्मतबेगम**च्याजवळ

जाऊन तिला ह्मणाला, 'मावशीसाहेब, खर्च फार व वसूल कमी आहे. फौज कमी करावी तर शत्रूच्या हातून प्राण वांचणें कठिण, नगदी रुपयांची जरूर आहे तर आपण कांहीं लाख रुपये मजला दिलेत तर शिपाईलोकांस वांटून देईन.' **बेगमेनें** सांगितलें, 'तूं राज्याचा दिवाण आहेस, कांहीं तजवीज करून फौजेचा पगार वांट. मजपाशीं तुला देण्यास रुपये कोठून येतील.' हीं बोलणीं पडद्याच्या आडून चाललीं होतीं. इतक्यांत या कृतघ्न व लुच्चा मनुष्यानें आपले सोबती **करीमखान, अमीरखान** व **सुजातखान** यांना खूण केली. त्यावरून त्यांनीं एकदम पडद्याच्या आंत घुसून **बेगम, गुलाबख्वाजसारा** व **महंमदअलीबोहरा** वगैरेंना मारून टाकिलें. व **मुरीदखानानें** वाड्यांतील नगदी खजीना व इतर जिन्नस लुटून **रहाटगडास** पाठवून दिले. व आपल्यावरील आळ टाळण्याकरितां नबाब **गोषमहंमदखान** यांच्या सांगण्यावरून हें काम झालें असें जाहिर केलें. नंतर त्यानें बंड केलें व **फत्तेगडच्या** किल्ल्यांत जाऊन बसून रयतेस अतिशय त्रास देण्याचें सुरू केलें. त्यामुळें लोक अतिशय त्रस्त होऊन मध्यरात्रीं बोडक्यांनीं 'याचा लौकर सत्यानाश होवो.' ह्मणून परमेश्वराची प्रार्थना करीत असत. एके दिवशीं तो **फत्तेगड** किल्ल्यांतून नावेंत बसून तलावाच्या पलीकडे पुराण्या किल्ल्यांत नबाब **फैजमहंमदखानाच्या** कबरेंत गेला व तेथें त्यानें एका गरीब मनुष्याच्या मुलीशीं लग्न लाविलें व तो त्या कबरेंतच निजला. त्या ठिकाणीं त्याला एक भयंकर स्वप्न पडलें. त्यामुळें तो घाबरून उठला व आपल्या बायकोस बरोबर घेऊन नावेंत बसून **फत्तेगडास** परत आला. तो आपल्या बायकोस आपल्या घरीं नेत होता त्या वेळीं त्याचा चेहरा वेड्यासारखा दिसत होता असें सांगतात. व तो घाबऱ्या घाबऱ्या बाहेर येऊन वरचेवर 'माझ्या सर्वांगाचा दाह होतो आहे. मी जागा असतों तोंवर बरें, झोंप लागली न लागली कीं डोळ्यांपुढें भयंकर वाघ, साप, भुतें, डाकिणी वगैरे येऊन मला मारण्याचा इरादा करितात असें भासतें' असें ह्मणत असे. तो हमेषा **गोषमहंमदखान** व **वजीर म-**

**हंमदखां** यांना मारण्याच्या खटपटींत असे. परंतु त्याचा हेतु सफल झाला नाहीं. **वजीरमहंमदखान** थोड्या लोकांनिशीं पेंढारी लोकांशीं सामना करण्याकरितां **भोपाळा**बाहेर गेला होता. तेव्हां **मुरीदमहंमदखानानें** बाडीयेथील कामगार **रहीमखान** याला **वजीरमहंमदखान** त्या ठिकाणीं येतांच त्याला ठार मारावें, असें पत्र पाठविलें. तें **वजीरमहंमदखाना**च्या हातीं लागलें, त्यावरून त्यानें **रहीमखाना**वर एकदम हल्ला केला. तेव्हां तो पळून गेला. **वजीरमहंमदखानानें** त्याचा तोफखाना व इतर सामान लुटून घेतलें व नंतर **गुंनूर** व **चौकीगडचे** किल्लेही घेतले. या सुमारास नबाब **हयातमहंमदखानांनीं** **कुलीखाना**ला दिवाण करण्याचें वचन देऊन **अंबापाणी** गांवाहून मदतीस बोलाविलें. त्यावरून **कुलीखान** **अंबापाणी**हून व **वजीरमहंमदखान** **बाडी**हून निघाले. ते दोघेही **महलपुरास** भेटले. नंतर ते दोघेही **भोपाळास** आले. **वजीरमहंमदखान** पक्क्या पुलावर उतरले. व **कुलीखान** मौजे **छुला** या गांवीं राहिले. **मुरीदखानानें** हें वर्तमान ऐकून **शिंद्याचे** सिरोज येथील सुभे **बाळाराव इंगळे** यांना मदतीस बोलाविलें, त्यावरून त्यांनीं वीस हजार फौजेनिशीं येऊन **ईदग्या**च्या मैदानांत तळ दिला. व **मुरीदखाना**कडे त्यांनीं असा निरोप पाठविला. कीं, तुह्मी प्रथम **भोपाळ**शाईतील एखादा किल्ला आमच्या स्वाधीन केला तर आह्मी तुह्मास मदत करूं. त्यावरून **मुरीदखानानें** **इसलामनगर**चा किल्ला त्यांच्या स्वाधीन केला. **टोंक**चे नबाब **अमीरखां**, त्या वेळीं **भोपाळ**च्या लष्करांत एक शिपाई होते; त्याला, **फत्तेगड** किल्ल्याचा बंदोबस्ताकरितां व **गोषमहंमदखाना**वर नजर ठेवण्याकरितां नेमिलें व आपण स्वतः **बाळाराव** याजबरोबर **इसलामनगरास** गेला. तेथील किल्लेदार **कादर महंमदखान** यानें नबाब **हयातमहंमदखान** याची बहीण **मोतीबेगम** इच्या सांगण्यावरून त्याच्याशीं सामना करून त्याच्यावर तोफांच्या गोळ्यांची वृष्टि केली. तेव्हां **मुरीदमहंमदखान** तेथून निघून **सुभ्यास** **रायसेन** येथें घेऊन

गेला. व तो किल्ला त्यानें त्याच्या स्वाधीन केला. **सुभ्यानें** आपल्या वतीनें **भानबल** याला तेथील किल्लेदार नेमिलें व स्वतः **शिरोंज**चा रस्ता धरिला. पुढें त्या उभयतांनीं, एक महिन्यानंतर तीस चाळीस हजार फौज व पुष्कळ तोफा बरोबर घेऊन, **भोपाळास** येऊन, **गोविंदपुऱ्याच्या** मैदानांत तळ दिला. दुसऱ्या दिवशीं **गोषमहंमदखान** व **वजीरमहंमदखान** यांनीं शहराच्या बाहेर निघून हल्लीं ऐषबाग, फरहत अफजा, व दिलखुष बाग आहेत त्या ठिकाणीं तळ दिला. तोफांच्या व बंदुकांच्या आवाजानें जमीन दणाणून गेली व दारवेच्या धुरानें सूर्य झांकून गेला. पुढें तलवार सुरू झाली. मेलेल्या लोकांच्या रक्तानें जमीन अगदीं लाल होऊन गेली. शेवटीं **सुभ्या**चा पराभव होऊन ते **मुरीदमहंमदखाना**सहित **शिरोंज**कडे पळून गेले. नबाब **अमीरखान** नोकरी सोडून **यशवंतराव** होळकराकडे निघून गेला व पुढें कांहीं दिवसांनीं सुदैवानें स्वतः नबाब झाला. **बाळाराव** यानें **मुरीदमहंमदखानास** कैद केलें व त्याच्याजवळ रुपया मागितला. त्यानें आपल्याजवळ कांहीं नाहीं असें सांगितलें. पुढें त्यानें कैदेच्या व त्रासाच्या भीतीनें हिरकणी खाऊन प्राण दिला. त्यानें मरणाचें सोंग केलें असें समजून **बाळारावानें** दोन दिवसपर्यंत त्याचें प्रेत पुरूं दिलें नाहीं. पुढें तें प्रेत सडून घाण सुटल्यावर पुरण्याचा हुकूम दिला.

**मुरीदमहंमदखानाचें** स्मरण होतांच **भोपाळ**च्या लोकांस भीति, त्रास उत्पन्न होत, व जेव्हां कोणी **भोपाळ**चे लोक **सिरोंजेस** जातात त्यावेळीं ते त्याच्या कबरेवर पांच जोडे मारितात, व त्या ठिकाणीं इतर कबरस्थानाप्रमाणें प्रार्थना करीत नाहींत.

पुढें नबाबानें **वजीरमहंमदखानाला** **वजीरउद्दौला** ही पदवी देऊन दिवाणगिरीचीं वस्त्रें दिलीं व राज्याचें मुखत्यार केलें. त्याच्या मोहरेवर '**ईश्वरमहंमदवजीर** याचा राजा आहे,' हें वाक्य कोरिलें आहे. **वजीरमहंमदखान** बहादर राज्याचा कुलमुखत्यार झाल्यामुळें **सर्फराजखान** उर्फ **कुलीखान** हा नाराज होऊन **अंबापाणी**

येथें निघून गेला. **वजीरमहंमदखानानें विलायतमहंमदखान** याजबरोबर फौज देऊन **रायसेन**चा किल्ला घेण्यास पाठविलें. त्यानें जाऊन त्या किल्ल्यास वेढा दिला. हा किल्ला एका उंच डोंगरावर आहे. त्यावर तोफेचा गोळा पोहचूं शकत नाहीं. याकरितां त्यानें किल्ल्याचे रस्ते रोंकून किल्ल्यांत दाणापाणी जाण्याचें बंद केलें. नंतर **वजीरखान**ही स्वतः त्या ठिकाणीं पोहोंचले. **भानबल**, किल्ल्याच्या बाहेर येऊन थोडासा लढून पुनः किल्ल्यांत जाऊन बसला. **रायसेन**चे सर्व लोक किल्ल्याच्या आंत होते. त्यांस, धान्य सरल्यावर किल्लेदारानें बाहेर घालवून दिलें. **भोपाळ**च्या फौजेंत विलायती ( अफगाणी ) लोक फार होते. त्यांनीं या लोकांस लुटिलें व त्यांच्या बायकांबरोबर त्यांनीं मनसोक्त वर्तन केलें. **भानबल** यानें वेढ्याच्या योगानें त्रासून **कासीमखान, गुलखान** व **सुलतानखान शिरोंज**वाले यांजबरोबर **वजीरमहंमदखान** बहादर यांजकडे निरोप पाठवून, तहाचें बोलणें लाविलें, व तीस हजार रुपये घेऊन किल्ला सोडून देण्याचा ठराव केला. त्यावरून **वजीरमहंमदखानानें** रुपये पाठवून दिले. **भानबल** यानें तोफा बुरजावरून खालीं लोटून दिल्या, दारू पाण्यांत टाकली, किल्ला सोडून दिला व **सिरोंजे**चा रस्ता धरिला. ही गोष्ट इ० स० १७९७ सालीं घडली. “ षुदफत्ते **रायसेन** जामदाद अयजदी ” ( ईश्वराच्या मदतीनें **रायसेन** येथें जय झाला ) यावरून या गोष्टीची तारीख निघते. पुढें **वजीरमहंमदखानानें अंबापाणी** गांवावर फौज पाठविली, व **सर्फराजखान** ऊर्फ **कुलीखान** याला कैद करून **रायसेन**च्या किल्ल्यांत पाठविलें. परंतु नबाब **हयातमहंमदखान** यांनीं त्याला क्षमा करून बंदमुक्त केलें, व त्याची जहागीर त्याला परत दिली. पुढें **वजीरमहंमदखानानें हुसंगाबाद**च्या किल्लेदारास वळवून घेऊन **हुसंगाबाद** घेतली. ही गोष्ट **नागपूरच्या राजास** कळतांच त्यानें **नूरखानसफेतपोष, पांडुरंग** व **सदोबा** पंडीत यांच्याबरोबर मोठी फौज देऊन त्यांस **हुसंगाबादे**स पाठविलें. दोन तासपर्यंत उभय पक्षांचें तुंबळ युद्ध झालें.

**भोपाळ**ची फौज फार तर पांच हजार व **नागपूर**ची फौज जवळ जवळ चाळीस हजार होती. लढाईच्या ऐन माऱ्याच्या वेळीं **वजीरमहंमदखानानें अल्लीसाहेब** दखनी यांच्याशिवाय आपलेबरोबर कोणीही नाहीं असें पाहून नाइलाजानें किल्ल्याकडे घोडा परतविला. त्याला एकटा पाहून शत्रूंनीं त्याचा पाठलाग केला. त्याचा घोडा फारच चपळ होता त्यानें किल्ल्याचा खंदक १२ बारा गज रुंद होता त्याच्यावरून साफ पलीकडे उडी मारली. तरी घोड्यास किंवा स्वारास कांहीं इजा झाली नाहीं! **नागपूर**ची फौज, हा घोडा व स्वार यांचा तमाशा पाहून थक्क होऊन खंदकाच्या किनाऱ्यावर उभी राहिली. पुढें तिनें किल्ल्यास वेढा दिला. **वजीरमहंमदखाना**नें चार पांच दिवसपर्यंत किल्ल्याच्या आंतून लढाई केली. नंतर तो बरोबरच्या लोकांसह नावेंत बसून **नर्मदा** पार होऊन **गुनूर**च्या जंगलांत निघून गेला. तेव्हां मागें **नागपूर**च्या फौजेनें **हुसंगाबाद**चा किल्ला घेतला. हा किल्ला **नर्मदा** नदीच्या किनाऱ्यावर पक्क्या दगड व चुन्यानें फार मजबूत बांधलेला होता. तो सन १८३३ सालांत **इंग्रज** लोकांनीं पाडून टाकिला. हल्लीं त्याचा नदीच्या बाजूकडील एक तट मात्र कायम आहे.

नबाब **हयातमहंमदखान** यांच्या मनांत **वजीरमहंमदखान** डोईजड झाल्यामुळें त्याला कैद करण्याचें होतें. परंतु त्यांस दुसरा कोणी मनुष्य राज्याचा बंदोबस्त अंगावर घेऊन करण्याजोगा आढळेना ह्मणून त्यांचा नाइलाज होता. मीया **वजीरमहंमदखान** बहादर याच्या अंगीं जितकें धैर्य व शौर्य होतें तितकीच नबाब **हयातमहंमदखान** यांच्या अंगीं या गोष्टींची उणीव होती. शिवाय ते फार आळशी व दुसऱ्याचें ऐकून वागणारे होते. त्यांनीं **गोषमहंमदखाना**च्या सांगण्यावरून **अकबरखानाला** दिवाणाचें काम सांगितलें. परंतु त्याच्या हातून बंदोबस्त होईना. **वजीरमहंमदखान** व **गोषमहंमदखान** यांच्या पुष्कळ वेळां लढाया झाल्या. चौथी लढाई मौजे **बिसनखेडा** परगणे **ताल** या गांवीं झाली. तींत **मिरझाअसतबेग** वगैरे नबाब

हयातमहंमदखानाचे सरदार मारले गेले. **गोषमहंमदखानानें** **शिरोंजेहून महंमदशहाखान** व **सुजाअलपुराहून करीमखान** पेंढारी यांना आपल्या मदतीस बोलाविल्यावरून ते दोघेही **भोपाळास** आले. **वजीरमहंमदखान इसलामनगरच्या** किल्ल्यांतून निघून **भोपाळच्या** जवळ मैदानांत **नवबहार** बागेंत आले. त्या दिवशीं पाऊस पडल्यानें दोघेही आपापल्या जागीं परत जाऊन राहिले. पुढें **महंमदशहाखान** व **करीमखान** यांचा आपसांत तंटा झाला. इकडे **महंमदशहाखान** हा **अकबरखान** याला आपल्याबरोबर घेऊन **सिरोंजेस** चालता झाला व **करीमखान**ही निघून गेला. नबाब **गोषमहंमदखानानें दौलतरावशिंद्याजवळ वजीरमहंमदखान** याला **भोपाळाहून** काढून देण्याकरितां मदत मागितली. **शिंद्यांनीं इसलामनगरचा** किल्ला घेऊन **हकीमअसदअली** याला **भोपाळच्या** बंदोबस्ताकरितां पाठविलें. **हकीमा**चा भाऊ **फजलअली** हा पूर्वीं नबाब **हयातमहंमदखाना**कडे नोकर होता, व कांहीं कारणावरून त्याला शहरांतून काढून दिलें होतें. त्याचा सूड उगविण्याचें **हकीमअसदअलीच्या** मनांत होतें. ही गोष्ट **वजीरमहंमदखानानें** **हकीम** येतांच ताडली होती. तरी त्यानें त्याला मेजवानी देऊन त्याचा बंदोबस्त उत्तम प्रकारें ठेविला होता. नबाब **हयातमहंमदखान** व **गोषमहंमदखान** यांच्या हातून राज्याचा बंदोबस्त अगदीं होण्यासारखा नाहीं व **वजीरमहंमदखान** हा हुषार, शूर व दूरदर्शी आणि राज्यकारभार करण्यास योग्य आहे असें **हकीमानें** पाहून, त्याचा नबाबाशीं पुनः मेळ करून दिला व आपण **ग्वाल्हेरीस** परत गेला. तेव्हां पुढें तर **वजीरमहंमदखानानें भोपाळचा** बंदोबस्त आपल्या मनाप्रमाणें फार उत्तम केला. यानंतर नबाब **हयातमहंमदखान** स्वस्थपणें आपल्या महालांत राहिले. ते तारीख १६ रमजान सन १२२३ हिजरी रोजीं बुधवारीं ७२ बहात्तर वर्षांच्या वयाचे होऊन मरण पावले.

## भाग ५ वा.

## नवाब गोषमहंमदखान यांची कारकीर्द.

तारीख ४ साबान सन १२२३ हिजरी रोजीं नवाब **गोषमहंमदखान** हे नुसते नांवाला गादीवर बसले. **वजीरमहंमदखान** त्या वेळीं अतिशय बलाढ्य झाले होते. त्यांनीं पुष्कळ लोक जमा करून आसपासच्या संस्थानिकांपासून खंडणी घेण्याचा बेत केला. ते पूर्वी **उमटवाड्याचे** ठाकूर **हत्तीसिंग** यांच्या नौकरींत असतांना त्यांच्या घोड्याचें शेंपूट तुटलें होतें. तो घोडा दक्षिणी जातीचा, सुरंग रंगाचा, खत खोड नसलेला, व अतिशय चपळ असा होता. त्याचें नांव '**पंखराज**' असें होतें. या खंड्या घोड्याला **वजीरमहंमदखान** आपल्या डोळ्यांआड केव्हांही होऊं देत नसत. यामुळें यांचें नांव 'कंडे घोडेवाले' असे पडलें होतें. या नांवाची पेंढारी लोकांत व आसपासच्या संस्थानांतील लोकांस अशी दहशत पडून गेली होती कीं तें नुसतें ऐकिल्याबरोबर त्यांच्या तोंडचें पाणी पळून जात असे. सन १२२४ हिजरी सालांत **नागपुराहून सादिकअलीखान** व **ग्वाल्हेरीहून तात्यानाथ** हे पुष्कळ फौजा घेऊन, **नागपूर** व **ग्वाल्हेरच्या** राज्यांत **वजीरमहंमदखान** यानें पुष्कळ वेळ स्वाऱ्या करून त्रास दिला होता त्याबद्दल त्याचें शासन करण्याकरितां **भोपाळास** आले. तेव्हां **वजीरमहंमदखान गुंनूरच्या** किल्ल्याच्या आश्रयानें राहिला. **सादिकअलीखान** यानें '**वजीरमहंमदखानानें** दांडगाई करून पूर्वापार स्नेह तोडून **भोंसले** व **शिंदेसरकार** यांच्या प्रजेस त्रास दिला, सबब त्याला शासन करण्याकरितां आह्मी आलों आहोंत, तो हातीं आल्यास त्याला धरून नेऊं नाहीं तर त्याचीं बायकामुलें आमच्या स्वाधीन करावीं.' असें नवाब **गोषमहंमदखान** यांस सांगून पाठविलें. नवाबानें आपल्या आप्तपणाकडे दुर्लक्ष करणें अयोग्य आहे असें जाणून **वजीरमहंमदखान** याच्या मुलांमाणसांस आपल्या वाड्यांत जागा दिली. व **वजीरमहंमदखान** हातीं लागल्यास वाटेल तर कैद क-

रून न्यावें परंतु त्याचीं बायकामुलें निरपराध आहेत सबब त्यांच्याशीं दावा करणें योग्य नाहीं असा जबाब दिला. **सादिकअलीखानानें**, नबाब हे **वजीरमहंमदखाना**चा पक्ष धरितात असें पाहून पुनः 'त्याच्या मुलास ओलीस पाठवून हा तंटा मिटवावा व महाराज **रघोजी** भोंसले यांचा स्नेह संपादावा हें बरें; कारण **रघोजी** या मुलास पाहून फार खुष होतील असा निरोप पाठविला.. त्यावरून नबाबानें नाइलाजानें ही गोष्ट कबूल करून **वजीरमहंमदखाना**चा मुलगा **मोईजमहंमदखान** याला **सादिकअलीखाना**कडे ओलीस पाठविलें. त्यानंतर तो **भोपाळां**त थोडीशी फौज ठेवून **नागपुरास** चालता झाला. **वजीरमहंमदखान** कांहीं दिवस स्वस्थ राहून एकाएकीं **गुंनूराहून भोपाळास** आला व त्यानें **नागपूर**ची फौज शहरांतून व किल्ल्यांतून हांकून लाविली. व नबाबास अतिशय दूषणें दिलीं. तेव्हां नबाबानें त्यास मी दरबारच्या सांगण्याप्रमाणें वागलों असें सांगितलें. त्यावरून **लालजी, मुस्तफा** व **लालारूपचंद** मंत्री यांना त्यानें हत्तीच्या पायीं बांधून मारविलें व बक्षी **बेणीलाल** व मुनसी **सुरजमल्ल** यांना तोफेच्या तोंडीं दिलें. नबाब **मोईजमहंमदखान नागपुरास** आल्यावर **सादिकअलीखाना**च्या खटपटीनें प्रथम भेटीसच **रघोजीनें** त्याचा चांगला मान केला. व पुढें एक वर्षपर्यंत त्याला पाहुण्याप्रमाणें वागवून त्यानें त्याला कपडे देऊन परत पाठविलें व त्याला पोहोंचवायाला **रघोजीराजे** भोंसले तीन कोसपर्यंत स्वतः आले होते. आपला मुलगा परत येण्याचें वर्तमान ऐकून नबाबास फार आनंद झाला व तो स्वतः पुष्कळ लव्याजम्यानिशीं भोपाळापासून अठरा कोसांवर **नूरखानडेरा** येथवर सामोरा जाऊन त्याला मोठ्या इतमामानें शहरांत घेऊन आला. त्या सुमारास **टोंक**चे नबाब **अमीरखान** हे फौजेसहित **नागपूरकरांबरोबर** लढाई करण्याकरितां जात होते. ते **भोपाळा**जवळ आले. **वजीरमहंमदखाना**पाशीं त्यांनीं मदत मागितल्यावरून ते स्वतः त्यांजबरोबर गेले. **सागर**च्या जवळ दोन्ही पक्षांची गांठ पडली तेव्हां **वजीरमहंमदखानानें अमीरखानास**, 'आज लढणें बरोबर

नाहीं, फौज मजल मारून थकून भागून आली आहे सबब उद्यां लढाई करावी.' असें सांगितलें. ही गोष्ट त्यांनीं मानली नाहीं व लढाई सुरू केली. तींत **नागपूर**च्या फौजेचा जय झाला तेव्हां **अमीरखान वजीरमहंमदखानां**स ह्मणाले, 'लढाईची व्यवस्था बिघडून गेली याकरितां आतां पळून जाणें दुरुस्त आहे.' त्यावरून **वजीरमहंमदखान** बोलले, 'तुह्मी जा, मी जिवंत आहे तोंवर समरांगणांतून तोंड फिरविणार नाहीं.' नंतर **अमीरखान** पळून गेले. **वजीरमहंमदखाना**नें आपल्या फौजेस दम देऊन आपल्याबरोबर थोडे शिपाई होते तरी नेटानें व आवेशानें हल्ला केला व शत्रूंस समरांगणांतून पळवून लाविलें. सर **ब्यारी क्लोज** साहेब बहादर **नर्मदे**च्या किनाऱ्यावर **इंग्रजी** फौजे सह मुक्कामास होते व ते **नागपूर**च्या फौजेच्या पक्षाचे होते. **वजीरमहंमदखान** यांनीं ही गोष्ट ऐकून **भोपाळा**कडे कूच केलें व 'आमच्या वडिलांनीं कर्नल **गार्ड** साहेब बहादूर यांस मदत केली त्या दिवसापासून **कंपनी** सरकारची व आमची दोस्ती आहे. आह्मी **इंग्रजी** फौजेशीं लढाई करणार नाहीं.' असें **अमीरखाना**स सांगून पाठविलें. **वजीरखाना**नीं परत येतांना जे जमीदार लोक शरण आले त्यांच्या—शिवाय बाकीच्या विरुद्ध राहिलेल्या सर्व जमीनदारांस ठार मारिलें. नंतर पावसाळा संपेपर्यंत **भोपाळां**त राहून ते नबाब **गोषमहंमदखान** यांस **रायसेन** येथें घेऊन गेले. व तेथें **कानसिंग** शीख याला चारशें स्वारांनिशीं चाकरीस ठेवून त्यांनीं मौजे **अहंमदपुरा**पासून **भेलशा**पर्यंत मुलूख लुटला. **शिंद्या**कडील **भेलशा**चा सुभा **विजय बहादर** यानें मोठ्या धैर्यानें मराठ्यांचीं चार पलटणें व पुष्कळसे स्वार यांच्यासह त्यांच्याशीं लढाई केली. दोन प्रहरपर्यंत लढाई झाली तिच्यांत नबाबाचा जय झाला. दुसरे दिवशीं नबाब **वजीरखान** यांनीं कूच करून जातां जातां **बागरोद**चा किल्ला घेतला. रस्त्यांत **टोंक**चे नबाब **अमीरखान** यांची भेट झाली. पुढें ते **अंबापाणी** येथें आले. त्या ठिकाणाहून त्यांनीं **सर्फराज** खानाची पाठवणी केली. **महंमदखान** ऊर्फ **कुलीखान** जहागीरदार यानें त्यांचें चांगल्या प्रकारें आदरातिथ्य करून

नवाब साहेबांस आपल्या घरीं नेऊन त्यांना मेजवानी दिली. **वजीरमहंमदखानां**नीं त्या ठिकाणीं **गौहरमहंमदखान** यांला नजरकैदेंत ठेवून **वाजीदमहंमदखाना**ला **अंबापाणी** गांवीं मुक्रर केलें. व आह्मी **गौहरमहंमदखाना**ला राजद्रोहाकरितां दूर करून तुमच्या मुलास तुमचें काम सांगितलें आहे असें **कुलीखानास** सांगितलें. **गौहरमहंमदखान** व **वाजीदमहंमदखान** हे दोघे दूधभाऊ होते. पुढें **वजीरमहंमदखान** तेथून कूच करून **रायसेन**च्या मार्गानें **नर्मदा** किनाऱ्यानें मौजे **चौरास** या ठिकाणीं आले. तेथें **नागपूर**च्या फौजेचा सरदार **गोषसाहेब** हा आपल्याशीं लढण्यास येत आहे असें त्यांना कळलें. तेव्हां त्यांनींही लढाईची तयारी केली. दोन्ही फौजांची **नर्मदा**किनाऱ्यावर लढाई झाली. त्यांत शेंकडों हिंदु व मुसलमान मारले गेले. **गोषसाहेब** हे कांहीं लोकांनिशीं एकीकडे उभे राहून लढाईचा तमाशा पहात होते. तिकडे **भोपाळ**च्या फौजेंतील कांहीं शीख स्वार गेले. **नागपूर**च्या फौजेंतही शीख स्वार असल्यानें ते आपल्या पक्षाकडीलच आहेत असें समजून **गोषसाहेब** आपल्या जागीं स्वस्थ राहिले. **भोपाळ**च्या स्वारांनीं **गोषसाहेबा**ला ओळखून त्याच्यावर हल्ला केला व त्याचें डोकें कापून **वजीरमहंमदखाना**कडे नेलें, तेव्हां **नागपूर**ची फौज पळाली व नवाब विजयी होऊन **भोपाळास** आले. तेथें त्यांस **भोंसल्या**कडील **रामभोला** रिसालदार यानें **महलपूर**चा किल्ला घेतल्याची खबर लागली. त्यावरून **वजीरमहंमदखान** ताबडतोब **महलपुरा**वर गेले. **रामभोला** यानें थोडासा लढाईचा आव आणून पळ काढिला. या गोष्टीमुळें **नागपूर** व **ग्वाल्हेर**वाल्यांशीं **वजीरमहंमदखानाचें** वैर पडलें. नंतर सन १२१९ हिजरी सालांत दोघांनीं एकत्र होऊन **भोपाळावर** फौज पाठविली. **शिंद्या**कडील सरदार **जगबाबापू** व **नागपूर**वाल्याकडील सरदार **सादिकअलीखान,** हे होते. दोघांनींही चार महिनेपर्यंत **भोपाळास** वेढा घातला. पुढें बरसातींत **नागपूर**ची फौज **हुसंगाबादेस** व **शिंद्या**ची फौज **चंदेरी**कडे निघून गेली. दसऱ्याच्या

दिवशीं पहांटेस **जगबाबापू, रामलाल, कृष्णाभाऊ** व **दानसिंग** बावन हजार फौजेनिशीं, व **सादिकअल्लीखान** तीस हजार फौजेनिशीं, **भोपाळास** आले. त्यांनीं चारी बाजूंनीं शहरास वेढा देऊन सहा महिनेपर्यंत तेथें तळ दिला. या वेढ्यांत **भोपाळ**वाल्यांचा फार नाश झाला. शहरांतील लोक शहर सोडून चालते झाले. पुष्कळ लोक खाण्यास न मिळाल्यानें मृत्यु पावले. यामुळें शहरांत फारच थोडी वस्ति राहिली. तोफांच्या गोळ्यांनीं शहर उध्वस्त होऊन गेलें. शत्रूंचे मोर्चे अगदीं शहराजवळ येऊन लागले. **वजीरमहंमद खानबहादर** यांनीं नवाब **गोषमहंमदखानास** 'हुकूम होईल तर मी **रायसेन**च्या किल्ल्यांत जाऊन तेथें लढाईचें सामान जमवून शत्रूंशीं लढाई करीन.' असें सांगितलें. त्यावर नवाबांनीं, '**नागपूर** व **ग्वाल्हेर**करांच्या मुलुखांत तूं लुटालूट केलीस यामुळें हल्लीं हें संकट प्राप्त झालें आहे. आतां ईश्वरावर भरंवसा ठेवून येथेंच राहून, देहांत प्राण आहे तोंवर लढाई कर.' असें सांगितलें. मेजर जनरल **सर जान मालकम** साहेबांनीं आपल्या इतिहासांत लिहिलें आहे कीं, महाराज **दौलतराव** शिंदे व **रघूजीराजे** भोंसले यांनीं एकत्र होऊन **भोपाळ**चा मुलूख जिंकून घेऊन निमेनिम वांटून घेण्याकरितां सन १८१२ इ० सालांत चढाई केली. तेव्हां **जगबाबापू**बरोबर पंचवीस हजार फौज होती व **दानसिंगा**च्याबरोबर बारा पलटणी, व तीस मोठ्या तोफा, व **रामलाल** व **कृष्णाभाऊ** यांच्याबरोबर पंधरा हजार फौज, मिळून एकंदर बावन हजार फौज होती. तसेंच **सादिकअल्लीखाना**बरोबर तीस हजार फौज मिळून एकंदर ब्यायशीं हजार फौज होती. इतक्या लोकांनिशीं त्यांनीं **भोपाळास** वेढा दिला. **भोपाळांत** एकंदर अकरा हजार फौज होती. त्यांत सहा हजार खास सरकारी शिपाई, व **नबाबा**बरोबर **नामदारखान** पेंढारी होता, त्याचे तीन हजार लोक व आसपासचे जमीदार **रतनसिंग** वगैरे होते त्यांची दोन हजार फौज होती. इतके लोक पंधरा दिवस पावेतों राहिले. सोळावे दिवशीं पेंढारी लोकांची फौज नि-

वून गेली. पुढें खाण्यास धान्य न राहिल्यानें लौकरच किल्ल्यांत एकतीसशेंच लोक राहिले. **वजीरमहंमदखानानें** या फौजेची पुढें लिहिल्याप्रमाणें व्यवस्था लाविली होती. **डोंगरशिंगा**बरोबर जुन्या किल्ल्यांत शंभर, गुंनूरी दरवाजावर **जयसिंगा**च्या हाताखालीं दोनशें, **बाकरअलीच्या** हाताखालीं बुधवार दरवाजावर दोनशें, **सय्यदबुसन्हा** याच्या हाताखालीं दोनशें, आदितवार दरवाजावर **मुलाहिमखान** याच्या हाताखालीं दोनशें, **ख्याजबक्ष** चेला याच्या हाताखालीं जुमराती दरवाजावर दोनशें, नबाब **मोईजमहंमदखान** यांच्या हाताखालीं पीर दरवाजावर चारशें, **करीममहंमदखान** याजबरोबर इमामी दरवाजावर दोनशें, **लालारोषनराय** याच्याबरोबर बीसहजारी देवडीवर पांचशें, **दिलमहंमदखान** याच्याबरोबर फत्तेगडांत चारशें, **जालमसिंग** याजबरोबर बालेकिल्ल्यांत शंभर, **सोजीखान** याच्याबरोबर **फत्तेगड** दरवाज्यावर शंभर, याप्रमाणें लोक नेमून ठेविले होते. खुद्द **वजीरमहंमदखान** हे सर्व शहरांत पांचशें लोकांसहित फिरून हरएक जागीं मदत देण्यास तयार रहात असत. **वजीरमहंमदखान** हे दररोज चाळीस तोफांचे गोळे शत्रूच्या फौजेंत टाकीत असत. व लढाईच्या वेळीं कांहीं जास्ती तोफा चालवीत असत. त्यांनीं बंदूका चालविणें मना केलें होतें. कारण बंदुकीची गोळी शत्रूंच्या लष्करापर्यंत पोंचत नव्हती. तलावाच्या मार्गानें नावेंतून वेळोवेळीं धान्य येत होतें तरी रुपयास दोन शेरांची धारण झाली होती. **दानशिंगानें** आदितवार दरवाजाजवळील तटावर व **सादिकअलीखानानें** गुंनूर दरवाजाच्या तटावर मारा चालविला होता. त्यांत एक वेळीं **नागपूर**ची फौज दरवाजे फोडून शहराच्या आंत घुसली, परंतु पठाणांच्या बायकांनीं घरांच्या माड्यांवरून विटांचे तुकडे व दगड यांची वृष्टि करून त्यांस मागें परतविलें व नंतर **वजीरमहंमदखान** यांनीं आदितवार दरवाज्यापासून मंगळवार दरवाज्यापर्यंत त्यांचा पाठलाग करून त्यांनां पळवून लाविलें. तेथून ते गुंनूरी दरवाजाशीं आले. तेथेंही त्यांनीं शत्रूंशीं पुष्कळ वेळपावेतों लढाई करून त्यांला पळवून दिलें. व बायकांच्या

शौर्याची फारच तारीफ केली. या वेळीं धान्य रुपयास एक शेरही मिळेनासें झालें. ज्या नावांवरून धान्य येत असे त्या शत्रूंनीं धरल्या. लोकांची येथवर स्थिति झाली कीं हिंदू लोक चिंचेची साल व चिंचोके आणि मुसलमानलोक चामडें भाजून व शिजवून खाऊं लागले. फेब्रुवारी महिन्यांत **दानसिंगानें** पुष्कळ हल्ले केले. परंतु त्यास यश मिळालें नाहीं. पुढें **रामलाल** यानेंही तीन हजार लोकांनिशीं **वजीर** गंजावर हल्ला केला, तेव्हां मोठें तुमुलयुद्ध होऊन एक हजार लोक पडले. व त्या वेळीं दोन रुपयांस एक शेरभरही धान्य मिळेनासें झालें. या योगानें शहरांत एकंदर दोनशें लोकच शिल्लक राहिले होते. मराठ्यांच्या फौजेंत पांच शेरांची धारण होती. पुढें मार्च महिन्यांत **जगबाबापू** मरण पावला. एप्रिल महिन्यांत जुन्या किल्ल्यावर **डोंगरसिंग** होता त्यानें विश्वासघातानें **सादिकअल्लीखानाशीं** मिळून शत्रूचे पांचशें लोक किल्ल्यांत बोलावून घेतले. **वजीरमहंमदखान** व **नजरमहंमदखान** यांनीं मोठ्या शौर्यानें तीस शिपायांनिशीं लढाई करून शत्रूंस पळवून लाविलें. मे महिन्यांत, '**भोपाळ**वाल्यावर ईश्वराची कृपा आहे याकरितां त्यांच्याशीं लढाई करूं नये' असें स्वप्न पडल्याचें **सादिकअल्लीखानानें** प्रसिद्ध करून **नागपुराची** वाट धरिली. तेव्हां शिंद्याची फौजही **सारंगपुरा**कडे निघून गेली. या वेढ्याच्या वेळीं फार मोठ मोठ्या लढाया झाल्या त्यांची हकीकत पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.

पहिली लढाई. **जगबाबापू** यांनीं **भोपाळ** हस्तगत करून घेण्याकरितां कमर बांधून शहराच्या उत्तर बाजूवर नेटानें तोफा चालविल्या, त्या योगानें तट पुष्कळसा पडून गेला. **वजीरमहंमदखान** जुमराती दरवाजांतून आपल्या लोकांनिशीं बाहेर पडले तों शत्रूंचीं दोन पलटणें **वजीर**गंजापर्यंत येऊन पोंहचल्याचें त्यांच्या नजरेस आलें. या ठिकाणीं दोन तोफा गोळ्या भरून आड ठेविल्या होत्या. शत्रू माऱ्यांत येतांच गोलंदाजांनीं तोफा डागल्या. त्याबरोबर त्यांचे तीनशें लोक पडले.

खुद्द **वजीरमहंमनखानांनीं** आपल्या हातानें तीस लोक मारले. या हल्ल्यांत **वजीरमहंमदखानाचे** चुलते **अलफमहंमदखान** मात्र मारले गेले. व **सय्यदअहंमद** व **अहंमदअलीखान** हे दोघे जखमी झाले. शत्रु पळून गेले याबद्दल मुसलमानांनीं **ईश्वराचे** आभार मानिले. किल्ल्यांतील लोकांस दोन दिवसपर्यंत अन्न मिळालें नव्हतें. तिसरे दिवशीं **सातनवाडी** येथील जमीदार **रतनसिंग** यानें दोनशें बैल गव्हांचे गोण लादलेले आणिले. त्यावरून **वजीरमहंमदखान** त्याच्याशीं फार खुष झाले व त्याबद्दल त्यांनीं त्याला पुष्कळ इनाम दिलें.

दुसरी लढाई. **जगबाबापू** यांनीं आपल्या सर्व फौजेनिशीं **पीर** दरवाजावर हल्ला केला. **वजीरमहंमदखाना**नें आपली फौज शहराबाहेरील पडक्या घराआड गुप्तपणें बसवून ठेविली. व शत्रु जवळ आल्यावर त्यांच्यावर बंदुकीचा नेमका मारा चालविला. त्यायोगानें त्यांचा बहुत नाश झाला. तरी त्यांनीं **वजीरमहंमदखाना**ला घेरलें. इतक्यांत दिवाण **गुलशनराय** यांनीं आपल्या लोकांनिशीं वीसहजारी देवडीच्या रस्त्यानें निघून बाण व बंदुका यांचा भडिमार करून शत्रूस पळवून लाविलें, व **वजीरमहंमदखाना**ला परत जाण्यास सवड करून दिली. त्यानंतर **जगबाबापू** आपल्या तळावर परत गेले. **रामलाल, राजाभाऊ, दानसिंग** व इतर मराठे सरदार, **जगबाबापू**ची फार फजिती करून ह्मणाले, ‘तुमच्याबरोबर एवढी मोठी फौज असून तुह्मांस शहर सर करितां आलें नाहीं. आह्मीं एका हल्ल्यांत उद्यां कसें शहर घेतों तें पहा.’ दुसरे दिवशीं त्यांनीं आपले लोक सिद्ध करून लढाईची तयारी करून हल्ला केला. गंधानाल्याजवळील तटास त्यांनीं वीस शिड्या लाविल्या व **शेरबेग** याच्या मोरीजवळ नऊ, जुमराति दरवाजावर पांच व **पीर**दरवाजावर पांच याप्रमाणें शिड्या लावून हल्ला करणाऱ्या लोकांस वर चढण्याचा हुकूम दिला. **वजीरमहंमदखान** व **नजीरमहंमदखान** यांनीं शंभर लोकांनिशींच त्यांच्याशीं सामना करून त्यांच्यावर दगड, बाण, व बंदुका यांचा व तोफेच्या गोळ्यांचा असा भडिमार केला कीं

त्यायोगें शत्रु मागें परतून पळाले. किल्ल्यावरील लोकांनीं कांहीं शिड्या वर ओढून घेतल्या व कांहीं तोडून टाकल्या व नंतर सर्व नागव्या तरवारीनिशीं शहराबाहेर निघून जो सांपडेल त्यास मारीत चालले.

तिसरी लढाई. एक दिवस **गोषमहंमदखान** हे वेढ्याच्या त्रासानें कष्टी होऊन **वजीरमहंमदखाना**बरोबर शहाराबाहेर पडले. परंतु ते **मस्तानशहा**च्या दरग्यांत जाऊन पोहोंचण्यापूर्वींच त्यांनां मराठी फौजेनें गांठिलें. त्यांच्यावर **राजाभाऊ** यांनीं दहा हजार पायदळ व पांच हजार स्वारांनिशीं हल्ला केला. **नबाबा**बरोबर अगदीं थोडे लोक होते तथापि त्यांनीं शत्रूच्या फौजेवर मोठ्या निकरानें हल्ला केला. त्या योगानें शत्रु मागें सरले. नबाब आदितवार दरवाजाबाहेर तटाजवळ घोड्यावरून आपल्या शूर शिपायांची बहादरी पहात होते. **गुलबुरगा** येथील रहाणार सय्यद **खैरुद्दीनहुसेन** याला **वजीरमहंमदखाना**नें इशारा केल्याबरोबर तो तटावर चढून गेला व आपल्या हातांनीं त्यानें शत्रूवर तोफेचा विलक्षण मारा चालविला. इतक्यांत संध्याकाळ झाली. **वजीरमहंमदखाना**नें **इकबालखान** चेला याला, शत्रूस आड व आश्रय होणारीं आसपासचीं पडकीं घरें जाळून टाकण्याविषयीं हुकूम दिला. नबाब व **वजीरमहंमदखान** हे उजाडेपर्यंत घोड्यावर बसून राहिले. व उजाडल्यावर नमाज पढून शहरांत गेले.

चौथी लढाई. **महंमददीनखान** यांनीं, **नागपूर**च्या फौजेनें गुंनूरीदरवाजावर येऊन तटास शिड्या लाविल्याचें वर्तमान कळवितांच **वजीरमहंमदखान** ताबडतोब आपल्या लोकांनिशीं त्या जागीं दाखल झाले व तटांतील जंग्यांतून गोळ्यांचा नेमका भडिमार करून एक तासभर लढाई झाल्यावर त्यांनीं शत्रूचा पराभव करून त्याला हांकून लाविलें.

पांचवी लढाई. **मीरमहंमदआकिलखान** माजूब यानें **शुजाखाना**च्या बुरुजावर चढून त्या बुरुजाला उद्देशून म्हटलें, 'हे बुरुजा ईश्वरकृपेनें तूं हल्लीं माझ्या हातीं आहेस पण उद्यां सकाळीं तूं कोठें

'ईश्वरानें आजवर बुद्ध्या हें संकट तुह्मांवर आणिलें होतें. परंतु आतां ते संकटाचे दिवस संपून ईश्वराची कृपा होत चालली आहे. याकरितां त्याच्यावर भरंवसा ठेवून उमेदीनें लढाई चालवावी.' या अवसरांतच जुन्या किल्ल्याचा किल्लेदार **डोंगरसिंग** यानें दगा करून नबाब **फैजमहंमदखान** याच्या थडग्यांत एक हजार लोक घेतले. परंतु **नजीरमहंमदखानानें पीरजादा, बक्षीबहादर, महंमदखान, मिरजाकमाल** बेग, व **गुलाममोहीउद्दीन** यांच्या सहायानें त्या लोकांवर हल्ला करून मोठ्या शौर्यानें त्या लोकांस तेथून हांकून लाविल्याचें आनंदकारक वर्तमान त्याला कळलें.

सातवी लढाई. दारू सर्व संपून गेल्यावर **वजीरमहंमदखानानें** मौलवी **निजामउद्दीन** व **काजीमहंमदयूसफ** यांना **सादिकअलीखाना**कडे तहाचें बोलणें लावण्यास पाठविलें. **सादिकअलीखान** हा स्वतः मुसलमान असल्यानें **भोपाळ**चें राज्य बुडणें हें योग्य नाहीं, असें त्याला मनापासून वाटत होतें व लढाईतही त्याचें मन नव्हतें. **वजीरखानानें** निरोप पाठविला कीं, 'लढाई बंद केल्यास आम्ही **रायसेन** येथें निघून जाण्यास सिद्ध आहों.' त्या दिवशीं एकही तोफ किंवा बंदूक चालली नाहीं. परंतु पहाटेच्या सुमारास **नाथू** पेंढारी यानें तीनशें बैल भरून दारू व दोनशें बैल धान्य, साखर व तंबाखू आणिली. दारू येऊन पोहोंचल्यावर **वजीरमहंमदखानानें** पुनः तोफा चालविण्यास हुकूम दिला. तोफांचे गोळे **जगबाबापू** व **सादिकअली** यांच्या गोटांत येऊन पडल्यामुळें पुष्कळ गडबड झाली. तोफांचे आवाज ऐकतांच मौलवी व काजी हे दोघेही परत आले. व मनांत लढाई चालविण्याचें असून आपल्यास तहाचें बोलणें करण्यास व्यर्थ पाठविल्याबद्दल त्यांनीं **वजीरमहंमदखानास** फार दोष दिला व ते रागानें आपल्या घरीं निघून गेले. ही दारूही संपल्यावर पुनः थोडी अडचण पडली त्या वेळीं, एका म्हाताऱ्यानें **वजीरमहंमदखानास** कळविलें कीं, 'एका बुरुजांत कांहीं रकम भरून ठेविली असल्याचें माझा बाप बोलत होता, ती रकम काय

होती तें मला ठाऊक नाहीं.' या म्हाताऱ्याचा बाप नबाब **यारमहंमदखान** याच्याजवळ आबदार होता. **वजीरमहंमदखानानें** तो बुरूज खोलवून पाहिला, तों त्यांत एका तळघरांत पांचशें थैले दारवेचे निघाले व त्यायोगानें त्यांला पुनः तोफा चालविण्यास साधन झालें.

हा वेढा पुष्कळ दिवस राहिला व प्रेतें सडून बिघडलीं. यामुळें वेढा घालणाऱ्या फौजेंत महामारी सुरू होऊन तिच्या योगानें शेकडों लोक तिच्या तोंडीं बळी पडले. घोड्यांनाही चारा न मिळाल्यानें ते नुसते अस्थिपंजर मात्र राहिले होते व सर्व फौज नाउमेद होऊन गेली होती. **सादिकअलीखान,** स्वप्न पडल्याचा बहाणा करून **नागपुरास** निघून गेला. व आपला हेतु पूर्ण झाला नाहीं, ही गोष्ट **जगबाबापूच्या** मनास फार लागल्यानें त्यानें हिरकणी खाऊन प्राण दिला. त्याला **इस्लामनगरा**जवळ अग्नि देऊन त्याचे लोक **ग्वाल्हेरीस** निघून गेले. अशा रीतीनें **भोपाळ**वाल्यांची या भयंकर वेढ्यापासून सुटका झाली. या लढाईच्या प्रसंगांत **वजीरमहंमदखान** व त्याचे दोन पुत्र यांचें प्रसंगावधान, आग्रह, शौर्य, व धैर्य वगैरे गुणांची फार उत्तम परीक्षा झाली व त्यांच्या अंगीं खरें पाणी असल्याचें निदर्शनास आलें.

आपली फौज परत आलेली पाहून **दौलतराव** शिंदे नाराज होऊन त्यांनीं पुनः **सर जान बाप्टिस्टी** फिलोज किंवा जान बत्तीस साहेब फिरंगी व **जसवंतराव** मराठा यांच्या बरोबर दुसरी फौज देऊन **भोपाळास** पाठविलें; त्यावरून **वजीरमहंमदखानानें** **दिल्ली** येथून **सर जान आक्टर लोनी** याजकडून मदत मागविली व त्यांच्याकडे मौलवी **निजामउद्दीनखान** व काजी **महंमदयूसफ** यांच्याबरोबर कर्नल **गार्डर्ड** साहेबांनीं त्यांना दिलेल्या शिफारसपत्राची नकल व कांहीं चांगल्या चांगल्या रकमा नजर पाठविल्या व इकडे आपण धान्याचा पुरवठा फार मेहनतीनें करीत राहिले. शिंद्याच्या फौजेंतील दोन्ही सेनापतींमध्यें सुदैवानें तंटा उपस्थित होऊन अखेर त्या

दोघांची **सिहोरा**जवळ लढाई झाली. तेव्हां ते परत निघून गेल्यामुळें **भोपाळ**ची आपोआप सुटका झाली. या अवसरांत **भोपाळ**चे दोन्ही वकील **दिल्लीस** पोहोंचून त्यांनीं आपल्या जवळील जिनसा व पत्र **कर्नल** साहेबाजवळ पावतें केलें होतें. त्याचा त्यांच्या मनाजोगा जबाबही मिळाला व त्यांच्या मध्यस्थीवरून **शिंद्यांनीं भोपाळ**च्या राज्यास त्रास न देण्याचें कबूल केलें. याप्रमाणें एकीकडील भीति नाहींशी झाल्यावर **वजीरमहंमदखानानीं सेंवास** व **चिपानेर** येथील पेंढारी लोकांवर मोहीम केली. व तेथून **करममहंमदखान, महंमददीनखान,** व **इजायतमसी** यांना, आपसांत सलोखा व्हावा ह्मणून बोलणें लावण्याकरितां, **नागपूर**च्या राजाकडे वकील पाठविलें. ते निघून गेल्यावर ते **रायसेन** येथें गेले व तेथून पावसाळा संपल्यावर त्यांनीं **तुमीरावण**वर स्वारी केली व त्या जागीं आजारी पडल्यामुळें तेथून **देवडी** गांवास परत आले. त्या ठिकाणीं ते तारीख १६ रबिलाखर सन हि. १२३१ रोजीं शनिवारीं ज्वराच्या योगानें मरण पावले. हकीम **ईजायतमसी** याचा मुलगा हकीम **शहाजादमसी** यानें त्याचें प्रेत **भोपाळास** रवाना केलें. व आपणही त्याच्या मागोमाग फौजेसुद्धां जाऊन **भोपाळ** शहराबाहेर उत्तरेस,त्यांच्या बागांत, त्यांना पुरलें. ते आपल्या वयाच्या बावन्नाव्या वर्षीं व **भोपाळां**त त्यांना पूर्ण अधिकार मिळाल्यावर विसाव्या वर्षीं मरण पावले. शेवटीं शेवटीं त्यांचें महत्व व त्यांची योग्यता, मि. **कारन्याक,** जनरल **ब्राउन, डब्ल्यू. जेकिन्स,** गव्हरनर जनरल **लार्डमिंटो** साहेब, **डब्ल्यू. मेटकाफ** व इतर मोठमोठ्या इंग्लिश गृहस्थांबरोबर, स्नेहभावानें त्यांचा पत्रव्यवहार चालल्यामुळें, पुष्कळ वाढली होती. त्याचीं पत्रें अद्यापि सरकारी दप्तरांत जपून ठेविलीं आहेत.

**शहाजादमसी** व त्याचा बाप हे रोमनक्याथोलिक पंथाचे असून **शहाजादमसी**चें खरें नांव, **बल्तजारबुरबाईन** असें होतें. त्याची विधवा स्त्री अद्यापि **भोपाळास** आहे. तिला चाळीस हजार रुपये सालिना उत्पन्नाची जहागीर आहे. व ती **म्यॉडम डीलेन** या नांवानें प्रसिद्ध

आहे. **भोपाळास** सुमारें दीडशें रोमन क्याथोलिक लोक असून त्या सर्वांमध्यें ही बाई मुख्य आहे.

**शहाजादमसी** याचें थडगें **आग्र्याच्या** सिव्हिल लाइनींतील रोमनक्याथोलिक कबरस्थानांत असून त्याच्यावर एक सुंदर घुमट बांधलेला आहे.

---

## भाग ६ वा.

### नबाब नजीरउद्दवला नजरमहंमदखान यांची कारकीर्द.

**वजीरमहंमदखाना**ला दोन पुत्र होते. त्यांतील वडील पुत्र मोठा शूर व धैर्यवान् होता; परंतु त्याचें राज्यकारभारांत अगदीं लक्ष नव्हतें. ह्मणून धाकटा पुत्र **नजरमहंमदखान** हाच नबाब **नजीरउद्दवला** या नांवानें राज्याचा अधिकारी झाला. त्यानें थोड्याच दिवसांत राज्याची व फौजेची अतिशय सुधारणा केली. त्यानें मौलवी **निजामउद्दीन** याला **दिल्लीयेथील** इंग्लिश रेसिडेंटाकडे पाठवून इंग्रजसरकाराशीं तह करण्याची खटपट चालविली. व इंग्रजी कामगारांच्या मनांत आपल्याविषयीं चांगला ग्रह व्हावा ह्मणून एकसारखा यत्न चालविला. **भोपाळशहरास** शत्रूंनीं वेढा घातल्या दिवसापासून **वजीरमहंमदखान** यांच्या तेजापुढें **गोषमहंमदखान** अगदीं दिपून कवडीमोल होऊन गेले होते व त्यांच्या हातीं त्यांच्या वाड्याबाहेर यत्किंचित्ही अधिकार राहिला नव्हता. पुढें **नजरमहंमदखानानीं** त्यांच्या खर्चाकरितां जहागीर दिली होती तिच्या उत्पन्नावर ते स्वस्थ राहिले. ता० २२ रविलाखर सन १२३३ फसली किंवा सन १८२३ इसवी रोजीं शुक्रवारीं नबाब **नजरमहंमदखान** यांचें नबाब **गोषमहंमदखान** यांची कन्या **गोहर बेगम** इच्याबरोबर लग्न झालें.

पेंढारी लोकांचा बिमोड करण्याकरितां जनरल **आडॉम्स** यांच्या हाताखालची **इंग्रजी** फौज **होषंगाबादेस** जमत होती. त्या वेळीं नबाब **नजरमहंमदखान** यांनीं हकीम **शहाजादमसी** याला वकील नेमून

पाठवून इंग्रजी फौजेस आपल्याकडून होईल तितकी मदत दिली. व ती फौज **नर्मदा** उतरून आल्यावर आपण स्वतः **रायसेन** येथें गेले. त्या ठिकाणीं त्यांची व **जनरल**साहेबाची गांठ पडून बोलणें झाल्यावर त्यांनीं **शहाजादमसी** याच्याबरोबर कांहीं स्वार व पायदळ देऊन त्याला इंग्रजी फौजेच्या कुमकेस राहण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें ते **कोठ्यापर्यंत** फौजेबरोबर राहिले.

**मराठे** लोकांच्या स्वाऱ्यांमुळें व **जगबाबापू** यांनीं पुष्कळ दिवस वेढा घातला होता त्या योगानें सर्व राज्याची वाताहत होऊन लोक भिकेस लागले होते व राज्याचें बारा लाख रुपयांहून ज्यास्त नुकसान झालें होतें. तथापि **नजरमहंमदखानानीं** सरकारी जड जवाहीर व दागदागिने विकून एकावन लाख रुपये **इंग्लिश** फौजेस मदत देण्याच्या कामीं खर्च केले. त्या दिवसापासून त्यांचा निस्सीम स्नेह व त्यांची राज्यनिष्ठा **इंग्रजी** कामगारांच्या अंतःकरणावर पूर्णपणें ठसून गेली. ही जी त्यांनीं कामगारी बजाविली त्याबद्दल त्यांना **इंग्रज** सरकाराकडून पांच परगणे व **इस्लामनगर**चा किल्ला मिळून त्यांबद्दल सनद व पदकही मिळालें.

ता० २२ मोहरम सन १२३९ फसली रोजीं गुरुवारीं नवाब **नजरमहंमदखान इसलामनगरास** सहल करण्यास गेले होते. त्यावेळीं ते आपल्या वाड्यांत निजले असतांना त्यांनीं, भरलेल्या पिस्तुलानें सहज आपल्या कानाजवळ खाजविलें, इतक्यांत पिस्तूल उडून गोळी त्यांच्या डोक्यांतून पार निघून पलीकडील भींतींत गढली व त्यांचा तत्काळ प्राण गेला. याविषयीं दुसरें लोक असेंही सांगतात कीं, नवाब आपली लहान कन्या **सिंकदरबेगम** हिला सहज मांडीवर घेऊन खेळवीत असतांना, त्यांचा धाकटा मेहुणा आठ वर्षांच्या वयाचा **फौजदारमहंमदखान** यानें नकळत नवाबाच्या कमरबंदांतून पिस्तूल काढून घेतलें. त्या वेळीं गोळी नवाबाच्या डोक्यांतून, चुकून किंवा बुध्या मारल्यानें गेली व त्या योगें नवाब मरण पावले. ही दुसरी हकीकत विशेष संभवनीय आहे. कारण ती मेजर **विल्सन हाऊसाहेबांच्या** इतिहासांत आढळते. या नवाबानीं तीन वर्षें,

नऊ महीने, व सहा दिवस राज्य केलें. त्यांचें वय अठ्ठावीस वर्षांचें होतें. त्यांना मोठ्या बगीच्यांत त्यांच्या वडिलांजवळच पुरिलें आहे. त्यांची कबर अद्यापि कायम आहे. तिच्यावर पुढील ओळी लिहिल्या आहेतः— '**नजीरउद्दवला** ज्याची बरोबरी कोणी करूं शकणार नाहीं असे, पिस्तूल उडाल्यानें मरण पावले'. त्यांचें वय नजीरउद्दवला या अक्षरांनीं व्यक्त होणाऱ्या संख्येंत एक वर्ष कमी केल्यानें निघतें.

**इंग्रज**सरकारांनीं नबाब **नजीरमहंमदखान** यांच्याबरोबर तह केला त्यांतील कलमें येणेंप्रमाणें:—

१ आनरेबल **ईस्टइंडियाकंपनी** व **भोपाळ**चे नबाब व त्यांचे वारस व संतती यांच्यामध्यें स्नेह, एकी, व एक विचार कायम राहावा. एकाचे शत्रु किंवा मित्र तेच उभयतांचे शत्रु किंवा मित्र मोजावे.

२ कलम दुसरें—**भोपाळ**च्या सर्व राज्याचें सर्व शत्रूंपासून संरक्षण करण्याची जबाबदारी **इंग्रज**सरकारावर आहे.

३ कलम तिसरें—**भोपाळ**चे नबाब, त्यांचे वारस, व संतति, यांनीं **इंग्रज**सरकाराशीं मिळून, व त्यांचा वरिष्ठपणा कबूल करून, त्यांच्या हुकुमांत वागावें. त्यांनीं इतर कोणत्याही संस्थानिकाशीं किंवा राजेरजवाड्याशीं अगदीं संबंध ठेवूं नये.

४ कलम चवथें—नबाब व त्यांचे वारस व संतति यांनीं दुसरे कोणतेही राजेरजवाडे किंवा संस्थानिक यांच्याशीं **इंग्रज**सरकारास कळविल्यावांचून किंवा त्यांच्या संमतीशिवाय कोणच्याही प्रकारचें बोलणें चालवूं नये; परंतु यामुळें त्यांचा हमेषाप्रमाणें आप्तइष्ट व स्नेही वगैरे बरोबर मित्रभावाचा व आसपासच्या जमीदार व कामगार लोकांबरोबर किरकोळ संबंधांत पत्रव्यवहार चालण्यास हरकत नाहीं.

५ कलम पांचवें—नबाब किंवा त्यांचे वारस यांनीं कोणावरही चढाई करूं नये. त्यांचा कोणाशीं तंटा उपस्थित झाल्यास त्याबद्दलची चौकशी व निकाल **इंग्रज**सरकाराकडून करून घ्यावा.

**६ कलम सहावें—भोपाळ**च्या संस्थानांतून ६०० स्वार व ४००

पायदळ इतकी फौज **इंग्रजसरकारच्या** नोकरीकरितां तैनात राहावी व प्रसंगविशेषीं जरूर पडल्यास **भोपाळची** सर्व फौज **इंग्लिश** फौजेशीं सामील रहावी. फक्त राज्याच्या आंतील बंदोबस्ताकरितां लागणारी फौज मात्र राज्यांत रहावी.

७ कलम सातवें—**इंग्रजी** फौजेस पाहिजे तेव्हां **भोपाळच्या** राज्यांत येण्यास मोकळीक असावी. पिकाचें किंवा इतर कोणत्याही तऱ्हेचें नुकसान **इंग्रजी** फौजेंतील लोकांपासून न होण्याविषयीं फौजेच्या कामगारांनीं होईल तितकी खबरदारी ठेवावी. जरूर वाटल्यास ही फौज **भोपाळास** कांहीं दिवस राहील व याकरितां **भोपाळच्या नबाबांनीं** आपल्या व आपल्या वारसांच्या वतीनें जरूर पडेल त्या वेळीं **नजरगड** व **गुलगांव** येथील किल्ले त्यांच्या आसपासच्या २००० यार्ड अंतराच्या आंतील जमिनीसुद्धां राहण्यास देण्याचें कबूल करावें.

८ **इंग्रजी** फौजेस रसद मिळवून देण्याच्या कामीं **नबाबांनीं** व त्यांच्या वारसांनीं मदत करावी. व सर्व जरूरी सामान **नबाबाच्या** राज्यांत विकत घेऊन त्यांच्या राज्यांत सर्व ठिकाणीं माफीनें नेलें जावें.

९ **नबाब** व त्यांचे वारस हे आपल्या राज्याचे पूर्ण अधिकारी राहतील. त्यांच्या राज्यांत **ब्रिटिशसरकारचा** अंमल कोणत्याही रीतीनें चालू केला जाणार नाहीं.

१० **पेंढारी** लोकांशीं लढाया झाल्यावेळीं **नबाबांनीं** फार मेहनतीनें व फार विश्वासानें आपल्या राज्याचें सर्व उत्पन्न **इंग्रजसरकारच्या** उपयोगास आणिलें. याकरितां हें त्यांचें वर्तन पाहून **इंग्रजसरकार** फार खुष झालें. हें व्यक्त करून दाखविण्याकरितां व कंटिंजंट फौज तयार ठेवण्याची नबाबास नड पडूं नये ह्मणून **इंग्रजसरकार** त्यांनां **अष्टा, सीहावर, सिहोर, दुराहा,** व **देवीपुरा** हे पांच महाल सर्व अमलानिशीं वंशपरंपरा देत आहे.

११ हा अकरा कलमांचा तहनामा **रायसेन** येथें तयार होऊन त्याच्यावर क्यापटन **स्टीवर्ड, करीममहंमदखानबहादर** व **शहाजाद-**

मसीसाहेब यांनीं आपापले सहीशिक्के केले. क्यापटन **स्टीवर्ड** यांनीं आपल्या सरकाराकडून या तहाची मंजुरी तीन आठवड्यांत आणून दे- ण्याचें व **करीममहंमदखान** व **शहाजादमसी** यांनीं **नबाबा**ची मंजुरी दोन दिवसांत आणून देण्याचें कबूल केलें आहे.

हा तह **रायसेन** येथें ता० २६ फेब्रुवारी सन १८२३ इ० किंवा ता० २० रबीउलसानी सन १२३३ हीजरी रोजीं पुरा केला गेला.

हा तहनामा **ग०्हरनरजनरल**साहेबांनीं **लखनौ** मुक्कामीं ता० ८ मार्च सन १८२३ इ० रोजीं मंजूर केला. हा तहनामा झाल्यावर **भोपाळास पोलिटिकलएजंट** ठेवले गेले. त्यांनीं **सिहोर**च्या आस- पासची जागा रहाण्यास पसंत केली. त्याप्रमाणें ती त्यांनां छावणी- करितां आंखून दिली गेली. तहनाम्यांतील ठरावाप्रमाणें एकंदर स्वार व शिपाई मिळून एक हजार लोक **भोपाळ**च्या फौजेंतून छाटून **सिहोरास पोलिटिकलएजंटा**च्या हाताखालीं निराळे ठेवले. व त्यांचा पगार दर- माहा सन १२३३ फसलीसालांत नबाब **खुदसिया बेगम** राज्याच्या मुखत्यार झाल्या त्या वेळपर्यंत सरकारी तिजोरींतून जात होता. त्यानं- तर दुसरा ठराव केला गेला त्याअन्वयें या सरकारांतून दरसाल एक लाख तीस हजार रुपये या फौजेच्या खर्चाबद्दल देण्याचें ठरविलें, व त्या फौजेस **भोपाळ कांटिजंट** हें नांव दिलें. पुढें सन १२५० फसली- सालीं नबाब **सिकंदर बेगम** यांच्या मुखत्यारीच्या वेळीं एकंदर दोन लाख रुपये फौजेच्या खर्चाबद्दल सालीना देण्याचें ठरवून, शिवाय या बाबतींत निराळा ठराव केला गेला तो येणेंप्रमाणें:—सन १८२३ किंवा सन १२३३ फसलीसालच्या तहनाम्यांतील सहाव्या कलमाप्रमाणें **भो- पाळच्या राज्याकडून इंग्रजसरकारच्या** नोकरीकरितां ६००स्वार व ४०० पायदळ देण्याचें ठरलें आहे. परंतु पुढें उभयपक्षांच्या संमतीनें या फौ- जेवर सर्व अंमलदार गोरे लोक असावेत, व या सर्व लोकांचा खर्च ए- कत्र घेतला जाऊन त्यांतच तोफखाना, पायदळ व स्वार असे तिन्ही तऱ्हेचे लोक कामापुरते ठेविले जावे. आतां ही रकम पक्की ठरली नाहीं,

ती ठरणें योग्य आहे असें जाणून व याबद्दल ज्यास्त खर्च वाढवून, एकंदर दोनलाख रुपये सालिना देण्याचें **भोपाळच्या** राज्याचे मुखत्यार **सिकंदर बेगम** यांनीं कबूल केलें. व ही गोष्ट **इंग्रजसरकारासही,** मान्य झाली. याकरितां हल्लीं ठरविलें गेलें आहे कीं, सन १२५७ फसली किंवा ता० १ जुलई सन १८४७ इ०पासून **भोपाळसंस्थानांतून कांटिजंटच्या** खर्चाकरितां दोन लाख रुपये सालीना हमेषाकरितां दिले जावे. व पुढें केव्हांही सहाव्या कलमाअन्वयें यासंबंधें ज्यास्त रुपयांची मागणी **भोपाळचे** राज्यावर केली जाऊं नये.

गव्हरनरजनरल **मार्क्विस आफ दलहौसी** यांची या गोष्टीस ता० २९ नवंबर सन १८४९ रोजीं मंजुरी मिळाली.

**इसलामनगर** मिळालें त्याबद्दलच्या सनदेचें भाषांतर खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

आपला खरेपणा व स्नेहभाव याविषयीं **मार्क्विस आफ हेस्टिंग्स** गव्हरनरजनरल यांच्या मनावर फार चांगला ग्रह झाला आहे व आपण पुढारीपणानें मेहनत घेऊन मदत केली, व आपल्या फौजेनेंही **माळव्यांतील** फौजेबरोबर राहून चांगली मदत ठेवली, याबद्दल आपली पसंती व संतोष उघड करून दाखविण्याकरितां आपल्यास आपल्या पूर्वजांच्या ताब्यांत असलेला **इसलामनगरचा** किल्ला, शहर व त्याच्या आसपासचा प्रदेश सर्व अमलांसहित वंशपरंपरेनें देण्याचा ठराव करून त्याप्रमाणें तो किल्ला, शहर व आसपासचा प्रदेश आपल्या स्वाधीन करण्यांत आला आहे. व यापुढें आपण आपला स्नेहभाव व राजनिष्ठा याहीपेक्षां ज्यास्त रीतीनें उघड करून मनोभावानें वर्तन कराल असा भरंवसा आहे.

'तारीख ३ आक्टंबर सन १८२३ इ०. तारीख २२ जिल्हेद सन १२३३ कुवार वद्य ३ सन १२२६ फसली. व संवत १८७५ रोज शनिवार.'

---

# भाग सातवा.

## नबाब गोहर बेगम खुदसीया बेगम यांची मुखत्यारी.

नबाब **नजीरउद्दवला** मरण पावल्यानंतर **मीया करीम महंमद्‌खान** व इलाया **शहाजाद मसी** यांनीं मेजर **हेन्ले** पोलिटिकल एजंट **भोपाळ** यांच्या संमतीनें **गोहर बेगम** यांजकडे राज्याची मुखत्यारी देऊन आपण दोघे त्यांचे नायब या नात्यानें काम पाहूं लागले. व त्यांनीं नबाब **खुदसीया बेगम** हे शब्द शिक्क्यावर खोदविले. नबाब **नजीरउद्दवला** मरण पावले त्या दिवशीं **खुदसिया बेगम** यांचें वय १८ वर्षें ६ महिने व १४ दिवसांचें असून **सिकंदर बेगम** यांचें वय ११. वर्षांचें होतें. राज्याचे नायब यांनीं पोलिटिकल एजंटाच्या संमतीनें असें ठरविलें कीं, **सिकंदर बेगम** यांच्या नवऱ्यास मुख्य मानावें. नबाब **गोषमहंमदखान** यांना आठ मुलगे व आठ मुली मिळून सोळा मुलें होतीं. त्यांचीं नांवें. १ **मोईजमहंमदखान. २ मीया फौजदारमहंमदखान. ३ हतीममहंमदखान. ४ बहादरमहंमदखान. ५ आदिलमहंमदखान. ६ अकबरमहंमदखान. ७ आधीनमहंमदखान.** व ८ **उमरावमहंमदखान.** आणि १ **सरदारबीबी. २ साहेबबेगम. ३ वजीरबीबी. ४ लाडुबीबी. ५ जनायतबीबी. ६ अमानतबीबी. ७ ऐवाजबीबी.** व ८ नबाब **खुदसिया गोहर बेगम.** नबाब **गोषमहंमदखान** हे ता० २३ मोहरम सन १२४२ हीजरी किंवा सन १८३८ इ० रोजीं मरण पावले.

पोलिटिकलएजंट यांच्या विचारानें **वजीरमहंमदखान** यांचा नातू व **मीया अमीर महंमदखान** याचा मुलगा नबाब **मुनीरमहंमदखान** यांनीं असें लिहून दिलें कीं, आह्मी **खुदसिया बेगम** यांच्या आज्ञेंत राहूं. व त्यांच्या वडिलांनीं असें लिहून दिलें कीं, आपण राज्यकारभारांत अगदीं हात घालणार नाहीं. यानंतर नबाब **सिकंदरबेगम** यांचा नबाब **मुनीरमहंमदखान** यांच्याबरोबर विवाह होण्याचें ठरून वाग्निश्चय झाला. पुढें

**खुदसिया बेगम** यांनीं **मुनीरमहंमदखान** नपुंसक असल्याचा खोटाच आळ आणून हा वाग्निश्चय मोडला. त्यावरून त्यांनीं आपला हक्क सिद्ध करण्याकरितां लढाईची तयारी केली. तेव्हां हकीम **शहाजादमसी** याच्या सल्ल्यानें, **बक्षीबहादर** यांला, कांहीं फौजेनिशीं त्याच्यावर रात्रीं छापा घालण्याकरितां पाठविलें. उभयपक्षांत चार दिवसपर्यंत लढाई व रक्तस्राव चालले. **भोपाळांतील** पोलिटिकलएजंट **टामस हरबर्ट माँडाक** साहेब यांनीं नबाब **खुदसिया बेगम** यांस लिहिलें कीं, 'आह्मी आपल्या मदतीकरितां येत आहों. व क्यापूटन **जॉन्स्टन** हे ताबडतोब **सिहोराहून भोपाळास** येऊन तंटा मिटवतील. परंतु ते येण्यापूर्वींच आपण तंटा मिटविण्याविषयीं होईल तितका यत्न करावा.' शेवटीं **मुनीरमहंमदखान** यानें आपली सालीना चवेचाळीस हजारांची जहागीर सोडून दिली. व त्याचा धाकटा भाऊ नबाब **जहानगीर महंमदखान** याच्याशीं पोलिटिकलएजंटाच्या संमतीनें **सिकंदर बेगमचें** लग्न होण्याचें ठरलें. व त्याला नबाब **नजीर-उद्दवला समशेरजंग** असा किताब दिला. परंतु ते **नबाब दूला** या नांवानें प्रसिद्ध होते.

या सुमारास हकीम **शहाजादमसी** हे ता० १ जुलई सन १८२९ इ० रोजीं क्षयरोगानें मरण पावले. त्या वेळीं त्यांचें वय ४३ वर्षांचें होतें. मौलवी **अबदुलकादर** व मुल्ला **शहाउद्दीन** यांनां एजंट, मि० **विल्किन्सन** साहेब यांच्या सांगण्यावरून **खुदसिया** बेगम यांनीं **नबाब दूला** यांना शिक्षक नेमिलें. व **मीरवासीरअली** यांला पोलिटिकल एजंटांनीं त्यांचे गुरु मुकरर केलें. पुढें लौकरच मि० **विल्किन्सन** यांच्या जागीं क्यापूटन **आल्व्हस** साहेब आले. त्यांनीं **नबाबास** पूर्ण अधिकार केव्हां मिळेल ह्मणून **बेगम** साहेबांस विचारतां त्यांनीं सांगितलें कीं, ते १९ किंवा २० वर्षांचे झाले ह्मणजे त्यांस अधिकार दिला जाईल.

**लार्ड विल्यम बेंटिक** गव्हरनर जनरल हे **सागर** येथें आल्यावेळीं

**नबाब दूला** हे आपल्याबरोबर **करममहंमदखान,** मदारुलमहाम व दिवाण **खुषवक्तराय** यांस बरोबर घेऊन मोठ्या समारंभानें तेथें गेले. त्यांचा त्या ठिकाणीं चांगला मानमरातब राहून **गव्हरनर जनरल** साहेबांची भेट होऊन त्यांना वस्त्रें मिळालीं. त्या वेळीं त्यांनीं आपल्या लग्नाचा समारंभ होऊन आपल्यास राज्याचा पूर्ण अधिकार मिळण्याबद्दल अर्ज केला. त्यावरून **लार्ड विल्यम बेंटिक** साहेबांनीं क्याप्टन **आल्व्हस** यांना **खुदसियाबेगम** यांस लग्न लौकर करून टाकण्याविषयीं सल्ला देण्यास लिहिलें. व पूर्ण अधिकार मिळणें तो तूर्त तहकूब ठेवावा असेंही लिहिलें.

या संभाषणाची हकीकत ऐकून **खुदसियाबेगम** फार नाराज होऊन त्यांनीं **सादुलखान, इब्राहीमखान** वगैरे जे लोक आपल्यास प्रतीकूळ आहेत असें त्यांना वाटलें त्यांस शहरांतून काढून लाविलें. सन १२५० सालच्या अवलीस **करममहंमदखान** मरण पावल्यावर **खुदसियाबेगम** यांनीं आपला धाकटा भाऊ **मीयाफौजदारमहंमदखान** याला मदारुलमहाम नेमण्याचा यत्न केला परंतु तो सफल न होतां दिवाण **खुषवक्तराय** यांना ती जागा व राजा हा किताब मिळाला.

राजा **खुषवक्तराय** याचे साथीदार **अलीशहा, कुलीखान, महंमदतुराबखान** वगैरे होते. हकीम **गुलाबहुसेनखान** व हकीम **बहादूरअलीखान** हे नबाब **खुदसिया बेगम** यांच्या पूर्ण मर्जींतले होते. पुढें मेजर **आल्व्हस** यांची **राजपुतान्यांत अजमिरास** बदली झाली. व त्यांच्या जागीं **विल्किन्सन** साहेब परत आले. त्यावर त्यांनीं लग्नाच्या बाबतींत **गव्हरनर जनरल** साहेबांच्या सूचनेप्रमाणें बरीच तहरीर चालविली. तेव्हां शेवटीं ता० १८ एप्रिल सन १८३५ रोजीं शुक्रवारीं लग्नसमारंभ मोठ्या थाटानें शेवटास गेला.

त्यानंतर लवकरच **नबाबांनीं** आपल्यास पूर्ण अधिकार मिळण्याबद्दल खटपट चालविली. मि० **विल्किन्सन** साहेबांनीं मित्रभावानें याविषयीं **बेगम** साहेबांजवळ बोलणें लावलें व उभयपक्षांचें ह्मणणें ऐकून घेऊन

राजा **खुषवक्तराय** हे बहुतेक **नबाबाच्या** मर्जीनुरूपच निकाल करण्याच्या बेतांत होते. ता० ११ रबिलाखर सन १२९२ रोजीं शेख **अबदुलकादर** घेलानी यांच्या उरूसासंबंधें दीपोत्साह वगैरे चालला होता व **नबाबाची** सर्व आप्त इष्टमंडळी व फौजेचे सर्व सरदार वगैरे लोक त्या जागीं जमले होते. त्या वेळीं **हमीरसिंगानें सिकदरबेगम** यांना कळविलें कीं, '**नबाबानें** गुप्तपणें लोक जमविले असून त्यांचा इरादा उभयतां **बेगमांस** ठार मारून टाकण्याचा आहे व त्याच्या सांगण्यावरून **सादुल्लाखान** कांहीं अफगाण लोकांनिशीं शहराच्या नजीकच बावडीवर इशारा मिळण्याकरितां वाट पहात आहे.' हें वर्तमान ऐकून उभयतां **बेगमांनीं** प्रथम फातेहा ( प्रार्थना ) आटपून आपल्या वाड्यांत जाऊन **कुलीखान** याजबरोबर **यक्कान्** किंवा बाडीगार्डीपैकीं तीस स्वार देऊन **नबाबास** पकडून कैद करण्यास पाठविलें. आणि नबाबाच्या पक्षांतील **मुस्तानीबखान** व **हमीरसिंग** ठाकूर यांनां कैद करवून, **मीरअनवरअल्ली** याजबरोबर शंभर स्वार देऊन **सादुल्लाखान** यास धरण्यास पाठविलें. नबाबाच्या वाड्याच्या आंत व बाहेर सक्त पाहारा ठेविला व त्याच्या पक्षाच्या पंनास लोकांस एकदम हद्दपार केलें. **अनवरअल्ली** याचा हेतु सफळ न होतां ते सुमारें, **भेलशापर्यंत** दौड करून परत आले. यांत सामील असणाऱ्या कांहीं कांहीं सरकारी कामगारांनाही नोकरीवरून दूर करून हद्दपार केलें. मि० **लान्सिलाट विल्किन्सन** साहेब यांनीं हा तंटा मिटविण्याविषयीं वरचेवर सांगून पाठविलें. परंतु त्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं.

पुढें मीया **अमीरखान,** नबाब **मुनीरमहंमदखान,** व **नबाबाचा** मामा **असादअल्लीखान** हे **नबाबाची** सुटका करण्याची खटपट करण्याकरितां पोलिटिकल एजंटाकडे सल्ला विचारण्यास **सिहोरास** गेले. त्यांनीं पुष्कळ स्वार व शिपाई नोकर ठेविले व **गफूरखान** याला एक कोतवालघोड्यासह **भोपाळास** पाठविलें. तो ता. २४ जिल्हेज सन १२९२ रोजीं संध्याकाळीं **भोपाळच्या** बाहेर येऊन पोहोंचला. व मौ-

ळवी **नियाजुद्दीन** याच्या कबरेजवळ मुक्कामास राहिला. व तेथून त्यानें **नबाबास** गुप्तपणें आपण आल्याचें कळविल्यावरून **नबाब** वेष पालटून **मीरअसादअल्ली** यास बरोबर घेऊन शहरांतून निघून **भोपा**ळच्या टेंकडीपर्यंत पायींपायींच आले व तेथें घोड्यावर बसून तावडतोब **सिहोरास** रवाना झाले. ते तेथें मध्यरात्रीस पोहोंचले. त्यांनीं दहा कोस मजल दोन घंट्यांत केली. पोलिटिकल एजंट त्यांस भेटण्यास बंगल्याबाहेर आले. व त्यांचा त्यांनीं चांगला मान मरातब ठेवून त्यांनां अकरा तोफांची सलामी दिली. **नबाबानें** आपला बाप, भाऊ व चुलता यांच्या सल्ल्यानें तेथील सावकारांपासून कर्ज काढून एक हजार लोक नोकरीस ठेवून **सिहोराहून** निघून **खुदसिया**बेगम यांच्या कामगारांस **दुराहा, देवीपुरा** व **नहारखेडा** येथून हांकून देऊन तीं गांवें त्यांनीं आपल्या हस्तगत करून घेतलीं. या सुमारास पोलिटिकल एजंटांनीं **बेगम** साहेबांकडे पुनः लिहून पाठविलें कीं, राज्याच्या आंतील व्यवस्थेंत हात घालण्यास आह्मांस अधिकार नाहीं. तथापि स्नेहभावानें आमची विनंति आहे कीं, हा तंटा मिटवून टाकावा हें बरें. यावरून पोलिटिकल एजंट यांच्या बंगल्यावर दोहों पक्षांकडील लोकांची भेट होऊन बोलणें झालें. त्यांत राजा **खुषवक्तराय** व हकीम **गुलाबहुसेनखान** हे **बेगमेच्या** तर्फेनें व **असादअल्लीखान** व मीर **बासिलअल्ली** हे **नबाबाच्या** तर्फेनें हजर होते. **बेगमेच्या** वकिलाचें ह्मणणें होतें कीं, **नबाबांनीं** प्रथम १० वर्षेपर्यंत **बेगमेच्या** हाताखालीं काम करावें. नंतर त्यांस मुखत्यारी मिळावी. व **नबाबाच्या** वकिलांचें ह्मणणें होतें कीं तीन वर्षेपर्यंतच हाताखालीं काम करून नंतर मुखत्यारी मिळावी. याविषयीं कांहींच निकाल होण्याचें न दिसल्यानें आपसांत तंटा मिटण्याची आशा राहिली नाहीं. व दोन्ही पक्षांचे वकील आपापले जागीं निघून गेले.

नबाबानें **अष्याचा** किल्लेदार **शहामतखान** याला फितवून किल्ला आपल्या हस्तगत करून घेतला. ही गोष्ट **बेगम**साहेबांस कळ-

तांच त्यांनीं राजा **खुषवक्तराय** याजबरोबर कांहीं फौज देऊन त्याच्यावर पाठविलें. पोलिटिकल एजंट यांनीं लाला **बैजनाथ** याला काय काय प्रकार होतो तें पाहण्यास पाठविलें. ता० १९ रबिलाखर सन १२९३ रोजीं **भोपाळ**ची फौज **अष्टा**पासून एक कोसावर **मागटी** येथें आली. **नबाबांनीं सादुल्लाखान, कानसिंग, मीरअसादअल्ली, अंबापाणी**चा जहागीरदार **फाजिलमहंमदखान,** त्यांचा मामा **मीरवासिलअल्ली** व **इब्राहीमखान** यांना बरोबर घेऊन आपल्या सैन्यानिशीं ते लढाईच्या तयारीनें **अष्टा**बाहेर पडले. **मीरवासिलअल्ली** व **इब्राहीमखान** यांनीं, राजा **खुषवक्तराय** यानें पुढें चाल करून न येतां **कोटरा** गांवीं परत जावें व तेथून काय बोलणें करावयाचें असेल तें करावें, असा निरोप पाठविला. राजानें जबाब दिला कीं, आपले लोक चालून आल्यानें थकले आहेत, त्यांच्या हातून एक पाउलही पुढें टाकवणार नाहीं. याकरितां आह्मी **पबनास** नदीच्या किनाऱ्यावर फौजेनिशीं तळ देऊन दुसरे दिवशीं काय करणें त्याबद्दल निरोप पाठवूं. असें सांगून त्यानें वकीलास निरोप दिला. इतक्यांत कोठूनसे बंदुकींचे आवाज ऐकूं आल्यावरून उभयपक्षांत लढाईचें तोंड लागलें. त्यांत सर्व लोक सामील झाले. **कानसिंगा**नें आपल्या स्वारांनिशीं राजावर हल्ला करून त्याला घेरून घेण्याचा बेत केला. परंतु **भोपाळ**च्या स्वारांनीं त्याच्यावर उलट मारा करून त्याचा पराभव केला व त्याचें शिर कापून राजाकडे आणिलें. त्यानें तें **बेगम**कडे पाठविलें. **सादुल्लाखान** यानें आपल्या विलायती लोकांनिशीं **भोपाळ**च्या पायदळावर हल्ला केला. व त्याचा सेनापति बक्षी **इरादतखान** याला जखमी केलें परंतु त्यांना परत जावें लागलें. एकंदरींत लढाई सुमारें एक तास चालून ३०० लोक ठार झाले. **नबाबा**चे शिपाई नवीन भरती केलेले असल्यानें भिऊन पळून गेले. खुद्द **नबाब** मोठ्या धैर्यानें व शौर्यानें लढत राहिले. सर्व **भोपाळ**च्या सैन्यांत, **मलीकहैदर** नांवाचा एक उत्तम घोडेस्वार अतिशय शूर असा होता. त्यानें

**नबाबावर** चाल केली. तेव्हां **नबाबानें** आपला घोडा बाजूस काढून घेऊन त्यास भाल्यानें ठार केलें. हें पाहून **अलीशहा, गुलामशहा, असगरहुसेन, नूरुद्दीन** हकीम, **बहादूरअलीखान** वगैरे **भोपाळच्या** सैन्यांतील सरदार पुढें सरसावले. **नबाब** हळू हळू नीट व्यवस्थितपणानें परतून किल्ल्यांत दाखल झाले. नंतर राजानें किल्ल्याच्या बाहेर **पबनास** नदीच्या कांठीं तळ दिला.

पुढें २९ व्या तारखेस **भोपाळच्या** कांहीं सरदारांनीं **नजरगंज** येथील बाजारावर हल्ला केला. या हल्ल्यांत ४० लोक मेले. व बाजार लुटला गेला. पावसाळ्यामुळें **भोपाळच्या** फौजेचे फार हाल झाले. व ता० २० जमादिलावर रोजीं **पबनास** नदीस पूर येऊन त्यांचें पुष्कळ सामान व धान्य वाहून गेलें.

या सुमारास कलकत्त्याहून **गव्हनर जनरल** साहेबांचे फॉरेन सेक्रेटरी **म्यॉकनाटन** साहेब यांच्याकडून **विल्किन्सन** साहेबांकडे या संबंधांत एक पत्र आलें, त्यांत हा सर्व तंटा मिटवून टाकण्याची व्यवस्था लिहिली होती. **विल्किन्सन** साहेबांनीं आपले मीरमुनशी **वेणीप्रसाद** यांना **अष्टास** पाठविलें. त्यांनीं सांगितल्यावरून ता० ९ जमादिलाखर सन १२९३ रोजीं राजा **खुषबक्तराय** आपल्या फौजेनिशीं **भोपाळास** परत गेले, व **नबाबही** आपल्या सैन्यानिशीं **सिहोरास** आले. पोलिटिकल एजंटांनीं **गिरधारीलाल** यांला **अष्टास** अमीन केलें. पुढें ते एजंट साहेब **सिहोरच्या** छावणींत असलेली इंग्रजी फौज बरोबर घेऊन **भोपाळ** नजीक **वजीरमहंमदखान** याच्या बागेजवळ तळ देऊन राहिले. त्यांनीं **बेगम** साहेबांस सांगून पाठविलें कीं, आपण केलेले करारमदार आपल्यास पाळलेच पाहिजेत. हल्लीं **गव्हरनर जनरल** साहेबांचा हुकूम असा आला आहे कीं, आपण राज्याचा सर्व अधिकार नबाब **जहांगीरमहंमदखान** यांस द्यावा. आपल्यास कोणचेही तऱ्हेनें इजा न होऊं देण्याची व आपली मालमत्ता, अब्रू व जहागीर, पूर्ववत् कायम राहण्याची जबाबदारी **कंपनी** सरकार आपल्यावर घेतें. **बेगम**साहेबांस हा हुकूम कबूल क-

रावा लागला. त्यांनीं ही व्यवस्था मान्य केल्यानें पोलिटिकल एजंटही फार राजी होऊन त्यांनीं त्यांस ८१६॥ गांव दरसाल ४९८६१२॥ रुपये उत्पन्नाचे जहागीर लावून दिले. ते आजवर खुद्द त्यांच्या खासगीकडे चालत आहेत. तसेंच त्यांनीं राजा **खुषबक्तराय** यांस सालीना २४००० ची जहागीर देवविली.

---

## भाग ८ वा.

### नबाब जहानगीरमहंमदखान.

ता० १ रमजान सन १२९३ रोजीं हिंदुस्थान सरकारच्या हुकुमानें **लानसिलाट विल्किन्सन** साहेब, पोलिटिकल एजंट यांच्या व **भोपाळां**तील मुख्य मुख्य कामगारांच्या समक्ष **नबाबांस** राज्याची मुखत्यारी मिळाली. **नबाबाचे** चुलते **असादअल्लीखान** यांना मदारउलमहाम नेमिलें. व **मीरवासीलअल्ली** यांना वकील केलें. याचप्रमाणें **नबाबाच्या** सर्व स्नेही मंडळीस मोठमोठ्या जागा मिळाल्या. कांहीं दिवसपर्यंत **नबाबांचा** व **सिकंदरबेगम** यांचा चांगला एकोपा राहिला. व **सिकंदरबेगम** यांस गर्भ राहिला. परंतु पुढें लौकरच आपमतलबी लोकांनीं उभयतांत कलागती लावल्या. ता० २ सफर सन १२९४ रोजीं बुधवारीं रात्रीं नबाबांनीं, **बेगम** साहेब, सर्व लोकांत, मुसलमानी धर्माच्या व विशेषतः पठाण लोकांच्या चालीस विरुद्ध अशा रीतीनें, पडद्याशिवाय वागतात, याबद्दल त्यांच्या हातावर किंवा पायावर तरवारीनें वार केला. ती जखम शिवण्यास चार टांके घ्यावे लागले. ता० ७ सफर रोजीं सोमवारीं **सिकंदरबेगम** आपल्या आईस व आपल्या सर्व नोकरचाकरांस बरोबर घेऊन **इसलामनगरास** निघून गेल्या. ता० १८ रोजीं मुनशी **जमालउद्दीनखान** यांनीं **इंदुरास** जाऊन तेथून शस्त्रवैद्य **महंमदसुजातखान** याला **बेगम** साहेबांस उपचार करण्याकरितां आणिलें. ता० १० रविलावल रोजीं त्यांची जखम अगदीं बरी झाल्यावर **बेगम** साहेबांनीं

स्नान केलें. ता० ६ जमादिलावल सन १२५४ रोजीं **इसलामनगर** येथें आमचा जन्म झाला.

नबाब हमेषा स्वाऱ्या शिकाऱ्या करण्यांत गढून गेलेले असत व ते इतके उदार व थोर मनाचे होते कीं कोणीही स्वकीय किंवा परदेशी मनुष्य, त्यांच्यापासून विन्मुख परत जात नसे. सन १२५६ सालीं त्यांनीं **जहांगीराबाद** हा पुरा वसविला. व तेथें घरें बांधविणारांस सरकारांतून द्रव्याची मदत दिली. त्यांनीं विद्वान् लोक आपल्याजवळ जमविले व प्रत्येकाची त्यांच्या त्यांच्या गुणांप्रमाणें पारख करून योग्यता ठेवली. सर्व लष्करी व्यवसायांत ते फार अद्वितीय होते. परंतु ऐन तारुण्यांतच त्यांची पाचनशक्ति कमी झाली व त्यांना हकीम **वारीसअलीखान** यानें पुष्कळ औषधोपचार केले तरी त्यांच्यापासून कांहींच गुण आला नाहीं. आह्मी व नबाब **सिकंदरबेगम** मिळून त्यांची शेवटची भेट घेण्याकरितां **इसलामनगरा**हून आलों. नंतर ते ता० २८ जिल्काद सन १२६० रोजीं मरण पावले. तेव्हां त्यांचें वय २७ वर्षांचें होतें. त्यांना **नूरबागें**त पुरलें आहे. ते मध्यम उंचीचे, व सडपातळ बांध्याचे असून त्यांचा वर्ण गोरा, रूप सुंदर व वर्तणूक अदबशीर व मान्य अशी होती. ते घोड्यावर उत्तम बसत असून त्यांस तरवार चांगली खेळतां येत होती. त्यांस हमेषा शिकारीचा नाद असे. त्यांत विशेषतः ते वाघाची शिकार करीत. भाला व बंदूक त्यांस चांगली चालवितां येत असे. ते सर्व लोकांस मोकळेपणीं भेटत असून फार उदार होते. त्यांनीं डोक्यावर केस राखले असून त्यांना थोडीशी दाढी होती. व ते बरेच चांगले कवी असल्याची प्रसिद्धी होती. त्यांच्या कारकीर्दींत फार स्वस्ताई होती. खेड्यापाड्यांत उत्तम गहूं एक रुपयास ८० शेर व शहरांत ५० शेर मिळत. व इतर जिन्नसही याच मानानें स्वस्त होते. त्यांच्या कारकीर्दीपासून मोठमोठ्या विद्वान् व प्रसिद्ध प्रसिद्ध लोकांचें **भोपाळास** येणें जाणें विशेष वाढलें. व त्यांच्यापासून पुढें **भोपाळचे** सर्व राजपुरुष विद्वान् व हुशार होत गेले. त्यांच्यापूर्वी ते नुसते ल-

ढाईच्या कामीं निपुण असत. हल्लींच्या मौलवी **शरीफहुसेन** नांवाच्या विद्वान् गृहस्थास त्यांनींच **भोपाळचे** काजी नेमलें. व पुष्कळ विद्वान् लोक, कवी व मुनशी वगैरे लोकांस सरकारांत नोकर ठेविलें. **शेखअहंमद** नांवाचे अद्वितीय विद्वान् अरबी गृहस्थ, ज्यांनीं, नफतुल यमन, व हिदायत अल्अफरा, व अयालाउल् अजबा, वगैरे ग्रंथ केले आहेत, ते याच **नबाबाच्या** वेळीं **भोपाळास** आले होते. त्यांनीं **नबाबाच्या** स्तुतिपर शमसुउल्इकबाल, नांवाचा कवितावद्ध उत्तम व प्रौढ ग्रंथ अरबीभाषेंत लिहिला आहे. या **नबाबांनीं** बरोबर सात वर्षें, दोन महिने, व अठ्ठावीस दिवस राज्य केलें.

---

## प्रकरण २ दुसरें.

---

### भाग १ पहिला.

### मीया फौजदार महंमदखान यांचा कारभार.

नबाब **नाजीरउद्दवला जहांगीर महंमदखान** समशेरजंग, मरण पावल्यावर, पोलिटिकल एजंट कप्तान **हेन्री ट्रिव्हेलियन** साहेब यांनीं, राज्याच्या एकंदर स्थितीबद्दल **गव्हरनर जनरल** साहेबांकडे रिपोर्ट करून सरकारचा अखेर हुकूम येईपर्यंत, **असाद अल्लीखान** यालाच कारभार चालविण्यास सांगितलें. सन १२६१ हिजरीच्या मोहोरमच्या १२ तारखेस पोलिटिकल एजंटांनीं राज्यांतील मुख्य मुख्य सरदार व कामगार यांना बोलावून **शहाजहान बेगम** राज्याची मालकीण असून मीया **फौजदार महंमदखान** यांनीं दिवाणगिरी करावी, व सर्व लोकांनीं त्यांच्या आज्ञेंत वागावें, असा हिंदुस्थान सरकारचा हुकूम आल्याचें कळविलें. हा हुकूम सर्वांनीं मान्य केला व **असाद अल्लीखान** काम सोडून आपला जहागीर गांव **बासोदा** येथें गेले.

**फौजदार महंमदखान** यांनीं राज्यकारभार हातीं आल्यावर रा-

ज्यांतील मोठमोठीं कामें आपल्या पक्षांतील लोकांस देऊन राज्याचा कारभार अगदीं आपल्या इच्छेप्रमाणें चालविला. आह्मी, **खुदसिया** बेगम, व **शिकंदर बेगम, इसलामनगराहून** ता० ११ एप्रील सन १८४९ इ० रोजीं **भोपाळास** आलों. **गव्हरनर जनरल** यांनीं आमच्या मातोश्रीच्या नांवानें पत्र पाठविलें. त्यांत लिहिलें होतें कीं, 'नबाब **जहांगीर महंमदखान** मरण पावल्याबद्दल आपल्यास फार दुःख वाटतें. व या संस्थानांतील वहिवाटीस अनुसरून, नबाब **नाजीर महंमदखान** मरण पावल्यावर आपल्यास राज्याचे अधिकारी ठरविलें होतें. त्याचप्रमाणें सर्व सरदार व कामगार लोकांच्या व इंग्रज सरकारच्या संमतीनें, **शहाजहान बेगम** यांना राज्याचे मालक ठरविलें असून त्यांचें लग्न झाल्यावर त्यांच्या नवऱ्यास राज्याचा मुख्य अधिकार मिळेल. व त्या वयांत येऊन त्यांचें लग्न होईपर्यंत राज्यकारभार पोलिटिकल एजंट यांच्या देखरेखीखालीं राहून सर्व कामकाज, नबाब **गोषमहंमदखान** यांचे चिरंजीव मीया **फौजदार महंमदखान** यांनीं चालवावें. त्यांच्या लायकीबद्दल व राज्यनिष्ठेबद्दल **गव्हरनर जनरल** साहेबांची खात्री आहे. तसेंच राज्यांतील कोणच्याही महत्वाच्या प्रकरणाचा निकाल करण्यापूर्वी पोलिटिकल एजंट आपल्यास सल्ला विचारतील. व **शहाजहान बेगम** यांचें पालन करण्याचें काम आपल्याकडे सोंपविलें आहे'.

थोड्या महिन्यांतच **वासीदअल्ली** व तोफखान्याचे अंमलदार **अहंमदखान** वगैरे राज्यांतील मोठमोठे कामगार लोक, मीया **फौजदार महंमदखान** आपल्याशीं नीट रीतीनें वागत नाहीं हें पाहून त्रासून **सिहोरास** गेले व तेथून **इंदूरचे** रेसिडंट **हामिल्टन** साहेब यांजकडे त्यांनीं अर्ज पाठविला कीं, 'वरिष्ठ सरकारच्या हुकुमाअन्वयें आह्मी **फौजदार महंमदखान** यांच्या आज्ञेप्रमाणें वागत गेलों. परंतु त्यांनीं आह्मांस दरबार बंद केल्यानें आह्मांस आमच्या मालकांस भेटतां येत नाहीं. तसेंच कांहींएक कारण न सांगतां त्यांनीं नबाब **जहांगीर महंमदखान** यांच्या वेळच्या नोकरांस काढून टाकून आपल्या आश्रित लोकांस रा-

ज्यांतील मोठमोठीं हुद्याचीं कामें दिलीं आहेत आणि जे कोणी बाकी राहिले आहेत त्यांसही काढून टाकण्याचा त्यांचा विचार दिसतो.' त्यावरून **हामिल्टन** साहेबांनीं त्यांची खातरजमा करून **ईडन** साहेब व आपले मीर मुनशी **शहामत अलीखान** यांना तंटा न होऊं देण्याकरितां **भोपाळास** पाठविलें. पुढें ता० १९ जिल्हेद सन १२६१ रोजीं ईद असल्यानें सर्व सरकारी कामदार दरबारास बोलाविले गेले व त्यांनीं येऊन शिरस्त्याप्रमाणें नजर केली. व अत्तर पानसुपारी झाल्यानंतर दरबार बरखास्त झाला.

या सुमारास कप्तान **हेनरी ट्रिव्हेलियन** यांची बदली होऊन कप्तान **कनिंगहॅम** साहेब **लाहोराहून** त्यांच्या जागीं आले. ते येण्यापूर्वी कप्तान **ईडन** यांनींही काम पाहिलें. नबाब **शिकंदरबेगम** व **मीयासाहेब** यांचा राज्यांत अधिकार सारखाच होता. आमचे आजे मीया **अमीरमहंमदखान** यांनीं कांहीं लुच्चे लोकांच्या सांगण्यावरून पुष्कळसे रोहिले लोक आपल्या चाकरीस ठेविले होते. त्यांचा पगार येई तो ते आपल्या खर्चास लावीत. पोलिटिकल एजंट यांनीं दिवाणास या लोकांस काढून टाकून कर्ज काढून त्यांच्या पगाराची फेड करावी व या कर्जाच्या फेडीस **अमीरमहंमदखान** यांच्या जहागिरीचें उत्पन्न लावून द्यावें ह्मणून सांगितलें. ही गोष्ट **अमीरमहंमदखान** यांनीं कबूल न करितां, **भोपाळच्या** दक्षिणेस बारा कोसांवर **कलियाखेडी** येथें जाऊन बंड केलें. त्यावरून कप्तान **कनिंगहॅम** साहेब **सिहोर** येथून **कांटिंजंट** फौज व **भोपाळचीही** फौज बरोबर घेऊन त्याचें शासन करण्यास निघाले. व त्यांनीं ता० १४ सवाल सन १२६२ रोजीं आमचे आजे **अमीरमहंमदखान** व त्यांचे दोन मुलगे **शेखमहंमदखान** व **अकबर महंमदखान** आणि दोनशें अफगाण लोक यांस कैद केलें. तीन चारशें अफगाण लोक ठार मारले गेले. त्या तिघांसही **गव्हनर जनरल** यांच्या हुकुमावरून **अशीरगड** येथें कैदेंत ठेविलें. ते तेथेंच सन १२७० सालीं मरण पावले. त्यांचीं प्रेत आणून **नूरबागेंत**

पुरलीं आहेत. त्याच सालीं नबाब **मुनीर महंमदखान** हे रमजान महिन्यांत ता० २९ रोजीं वाख्यानें मरण पावले. **बासोद्याचे** जहागीरदार नबाब **असाद अल्लीखान** हे आमच्या वडिलांचे मामा असून त्यांचे दिवाणही होते. त्यांच्यावर इंग्रज सरकारांनीं नाराज होऊन त्यांना **बनारस** येथें दहा वर्षें कैदेंत ठेविलें आणि त्यांच्यापासून तीस हजार रुपये दंड घेऊन त्यांस सोडून दिलें. **कलियाखेडी** येथील झगड्यानंतर कप्तान **कनिंगहॅम** यांनीं सरकारांत रिपोर्ट केला कीं '**मीया फौजदार** व **शिकंदर बेगम** हीं उभयतां अगदीं स्वतंत्र रीतीनें कारभार चालवीत असल्यानें राज्याच्या कामांत फार गोंधळ होऊन नुकसान होतें. याकरितां मुख्य अधिकार एकाकडेच असणें जरूर आहे'. त्यावरून नबाब **शिकंदर बेगम** यांचा अधिक हक्क आहे एवढेंच नसून त्या दक्ष, मेहनती, व **इंग्रज** सरकारास झटून मदत करणाऱ्या आहेत असें पाहून, सरकारांनीं **कलकत्त्याहून** आमच्याकरितां राज्याच्या मालकीचीं वस्त्रें, व आमच्या मातोश्रीकरितां मुखत्यारीचीं वस्त्रें ता० १९ मोहरम सन १२६३ हि० रोजीं पाठविलीं. तेव्हां पोलिटिकल एजंट यांनीं **मीया फौजदार महंमदखान** यांचा राजीनामा कबूल करून आह्मांस वस्त्रें दिलीं.

नंतर नबाब **शिकंदर बेगम** यांनीं तारीख ६ सफर सन १२६३ हि० रोजीं राजा **खुषवख्तराय** जे नबाब **खुदासिया** बेगम यांच्या वेळीं दिवाण होते, त्यांनाच दिवाणगिरीचें काम सांगितलें. तसेंच त्यांनीं आपल्या प्रकृतीकडेही लक्ष न देतां जिवापाड मेहनत करून फौजेची व सरकारी कचेऱ्यांची सुधारणा केली; शहराची सुधारणा करून तें शोभिवंत करण्याचा उद्योग चालविला. तसेंच कर्जाची फेड करण्याची व्यवस्था लाविली. आबादी वाढविणें व शेतकरी लोकांची स्थिति सुधारणें यांकडेही त्यांचा वेळ गुंतलेला असे. त्यांनीं आपल्या राज्याचे पश्चिम, पूर्व व दक्षिण असे तीन विभाग केले. त्या प्रत्येक विभागावर एकेक मुख्य अधिकारी व एकेक नायब नेमून त्यास **नाजीम** अशी पदवी दिली. आणि त्यांच्या हाताखालीं अमील व ठाणेदार नेमून दिले. सन १२६४ हि०

पासून १२७३ हि० पावेतों त्यांनीं दक्षिण भागांत चार वेळ व पश्चिम आणि पूर्व भागांत तीन तीन वेळ दौरे करून प्रत्येक परगणा स्वतः समक्ष पाहून तपासणी केली. त्यांनीं सांखळीची पैमाष सुरू केली व जमीनदारांकडून जमा वसूल करण्याच्या बाबतींत नियम केले. व कामकाजांतील सर्व दोष काढून टाकिले. त्यांनीं प्रत्येक गांवच्या हद्दी ठरवून त्यांवर पक्के मिनारे बांधिले. तसेंच पूर्वींच्या कच्च्या जमाखर्चाच्या खतावण्या व पूर्वींचीं जमाबंदीचीं टिपणें तयार करविलीं. आणि दिवाणी, फौजदारी व मुलकी कायदे केले.

राजा **खुषवख्तराय** मृत्यू पावल्यावर मुनशी, **जमालउद्दीनखान** नांवाचे **दिल्लीच्या** सुभायतींतील **कोटाना** गांवचे राहणारे पोक्त व अनुभवशीर असे गृहस्थ **भोपाळास** नोकर होते, त्यांना खान व मदार उल्महाम या पदव्या देऊन त्यांनाच दिवाणगिरीचें मोठें मानाचें व महत्वाचें काम सांगितलें. व **शिरोंज** येथील राहणारे **लालाकिसनराम** हे दिवाणी व मुलकी काम पाहण्यालायख आहेत असें पाहून त्यांना, **राजा** असा किताब देऊन व नायब दिवाण नेमून मोतमीद उल्महाम ही पदवी दिली. सन १२७१ च्या जिल्काद महिन्याच्या ११ व्या तारखेस बक्षी **बहादर महंमदखान** यांचे चिरंजीव बक्षी **बाकीमहंमदखान नसरतजंग** यांजबरोबर मुसलमानी धर्माप्रमाणें विधियुक्त आमचें लग्न झालें. व त्यांना नबाब **नजिरउद्दवला उमरावदूला** बहादर हा किताब दिला. आमच्या वडिलांच्यावेळचें कर्ज सुमारें वीस लक्ष रुपये असून **मीया फौजदार महंमदखान** मुक्त्यार असल्यावेळीं आणखी सुमारें तीन चार लक्ष रुपये कर्ज झालें होतें तें मिळून एकंदर सुमारें चोवीस लक्ष रुपये कर्ज झालें होतें. इतक्या सर्व कर्जाची फेड करून त्यांनीं राज्यावरील बोजा कमी केला.

सन १२७३ हिजरी सालीं **इंग्रज** सरकाच्या फौजेनें बंड करून धामधूम केली, त्या वेळीं **इंग्रज** सरकारास मदत केल्याबद्दल ‘स्टार आफ इंडिया’ हा किताब व कांहीं मुलूख **महाराणी** सरकारांनीं आमच्या मातो-

श्रीस दिला. त्या वेळीं जबलपूर, अलाहाबाद व आग्रा येथें त्यांच्या व व्हाइसराय साहेबांच्या पुष्कळ भेटी झाल्या. व त्यांची सर्वतोमुखी फार तारीफ झाली. त्याचप्रमाणें त्यांनीं पुष्कळ चांगलीं चांगलीं शहरें पाहिलीं व पुष्कळ चांगल्या चांगल्या इमारती बांधिल्या. त्यांनीं मक्काशरीफची यात्रा करून पुण्य संपादिलें. त्यांचा आवाज स्पष्ट असून बोलण्याचालण्याची ढब मोहक होती. बांधा मध्यम व सडपातळ असा असून चालचलणूक टापटिपीची होती. त्यांना मनुष्याची पारख तेव्हांच करितां येत असे. जमाखर्चाच्या कामांत व फारशीविद्येंत त्या पूर्ण निष्णात होत्या. त्या हानीफा पंथाच्या होत्या. त्यांचा जन्म तारीख २८ सवाल सन १२३३ रोजीं होऊन तारीख १८ जिल्हेज सन १२५० रोजीं त्यांचें लग्न झालें व तारीख १९ मोहरम सन १२६३ रोजीं त्यांना राज्याचे मुखत्यार नेमिलें. आणि आमच्या संमतीनें व व्हाइसराय साहेबांच्या मंजुरीनें तारीख ९ सवाल सन १२७६ रोजीं त्यांना भोपाळच्या गादीवर बसविलें. तारीख १६ रजब सन १२८५ रोजीं त्या, या नश्वर अशा ऐहिक संपत्तीचा त्याग करून अक्षय्य सुखाचा अनुभव घेण्यास गेल्या.

## भाग २ रा.

### आमच्या लग्नाची हकीकत.

आह्मी वयांत आल्यावर नबाब शिकंदरबेगम यांनीं भोपाळांत असणाऱ्या आमच्या भाऊबंदांपैकीं पुष्कळ मुलगे समक्ष आणवून पाहिले व त्यांपैकीं कांहींजणांस पसंत करून त्यांना विद्या वगैरे शिकविण्याचा चांगला बंदोबस्त केला. परंतु त्यांत कोणांत कांहीं व कोणांत कांहीं व्यंग आढळून आल्यानें दुसऱ्या एखाद्या थोर घराण्यांतील मुलगा पसंत करण्याबद्दल व्हाइसराय साहेबांची परवानगी घेतली. मेजर ड्यूरंड, पोलिटिकल एजंट, यांच्या मार्फत भोपाळचे सरदार व इंग्रज सरकार यांच्या संमतीनें आह्मांस वर पसंत केला जावा असें पूर्वी एक वेळ लिहून आलें

असल्यानें ही मंजूरी घेण्याची जरूर पडली. या **गोष्टीस इंग्रज** सरकारांनीं संमति दिली. पुढें **बेगम** साहेबांनीं चांगले शहाणे अनुभविक असे कामगार लोक **हिंदुस्थानां**तील मोठमोठ्या शहरीं तपास करण्याकरितां पाठविले. त्यांनीं **दिल्ली**हून व इतर शहरांहून चांगल्या नामांकित व थोर घराण्यांतल्या पुष्कळ पुरुषांच्या तसबिरी व त्यांच्या घराण्यांची पूर्वींच्या व हल्लींच्या स्थितीविषयीं माहिती लिहून पाठविली. **दिल्लीच्या** बादशाही घराण्यांतीलही पुष्कळ राजपुत्र ही गोष्ट ऐकून चांगल्या इतमामानें **भोपाळास** येऊन कांहीं दिवस आनंदांत राहून परत गेले.

नंतर सर्व तऱ्हेनें योग्य अशा सहा इसमांस पसंत करून कप्तान **ईडन** पोलिटिकल एजंट यांजकडे त्यांच्याविषयीं लिहून कळविलें. तसेंच '**भोपाळ**च्या घराण्यांतील पुरुषांत नवाब **शहाजहान बेगम** यांच्याशीं लग्न होण्यायोग्य एकही मनुष्य नसून इतर कुळांतील मुलांशीं लग्न केल्यास पुढें कसा परिणाम होईल याविषयीं खात्रीनें सांगतां येत नाहीं, याकरितां नवाब **शहाजहान बेगम** यांच्या नवऱ्याच्या हातीं राज्यसत्ता देणें योग्य नाहीं. करितां सर्व अधिकार **शहाजहान बेगम** यांच्याकडेसच ठेवून त्यांच्या नवऱ्याचा राज्यकारभारांत अगदीं संबंध नसावा, व त्यांना नुसती नबाब ही पदवी व योग्य मानमरातब मिळावा आणि या उभयतांची संतति होईल तिचा राज्याधिकारावर हक्क समजला जावा'. असेंही लिहून कळविलें. पोलिटिकल एजंट साहेबांनीं उत्तर पाठविलें कीं, 'आपलें ह्मणणें इंग्रजी रीतीरिवाजास अनुकूलच आहे; कारण हल्लींच्या **महाराणी** साहेबांकडे राज्याचा पूर्ण अधिकार असून त्यांच्या नवऱ्याचा राज्यकारभारांत कांहींएक संबंध नव्हता. सबब आपलें पत्र **एजंट गव्हरनर जनरल** सेंट्रल इंडिया यांच्या मार्फत **हिंदुस्थान** सरकाराकडे रवाना करितों; तिकडून निकाल होऊन येईल त्याप्रमाणें कळविण्यांत येईल.' त्याप्रमाणें त्यांनीं सर **राबर्ट हॉमिल्टन** साहेबांकडे **बेगम** साहेबांचें पत्र पाठविलें. त्यांच्याकडून या पत्राचा जबाब तारीख ७ नवंबर रोजीं आला. त्यांत त्यांनीं लिहिलें होतें कीं 'आ-

पलेकडील पत्र पावलें व आह्मी **गव्हनर जनरल** साहेबांकडून याविषयीं काय निकाल होतो त्याची वाट पहात होतों. त्यांच्याकडून जबाब आला त्यांत नबाब **शहाजहान बेगम** यांना योग्य वर पहाण्याचें काम नबाब **शिकंदर बेगम** यांकडेसच सोंपविलें असून त्यांच्या ह्मणण्याप्रमाणें त्याला नुसती नांवाची नबाब अशी पदवी मिळेल व सर्व राज्याधिकार रीतीप्रमाणें नबाब **शहाजहान बेगम** वयांत आल्यावर त्यांच्याकडे दिला जाईल. असें लिहिलें असून आपल्या राज्यकारभाराची व विशेषतः आपण राज्यावरील कर्जाचा मोठा बोजा उतरल्याबद्दलची फार प्रशंसा केली आहे व ही व्यवस्था नबाब **शहाजहान बेगम** यांना चांगली नमुन्यादाखल झाली असल्याचें लिहिलें आहे.' तेव्हां **शिकंदर बेगम** साहेबांनीं लिहून कळविलें कीं 'आमचे सेनापती **बाकीमहंमदखान** यांना पसंत केल्याचें आह्मीं पोलिटिकल एजंट यांच्याकडे तारीख २४ आगष्ट सन १८५८ रोजीं कळविलें असून हल्लीं लग्नास शिरस्त्याचें निमंत्रण करण्यावांचून कांहीं बाकी राहिलें नाहीं, सबब **गव्हरनर जनरल, एजंट गव्हरनर जनरल** व क्यापटन **ईडन** यांना शिरस्त्याप्रमाणें निमंत्रणचिठ्या पाठविण्यांत येतील.' तसेंच 'पुढें सवडीनुरूप राज्याचा मुख्य अधिकार नबाब **शहाजहान बेगम** यांजकडे सोंपविला जाऊन त्यांनीं **शिकंदर बेगम** यांच्या सल्लयानें व मदतीनें काम करावें' ह्मणून **एजंट गव्हरनर जनरल**चे पत्रांत मजकूर होता. त्याविषयीं लिहिलें कीं, 'राज्यकारभार चालविण्याच्या कामांत नुसती सल्ला व मदत यांपासून विशेष उपयोग होतो असें नाहीं. सर्व अधिकार एकाच्याच हातांत असून त्याच्याच मर्जीनुरूप सर्वांनीं दक्षतेनें व बिनहरकत वागलें पाहिजे, तरच काम चालतें व याविषयीं आमचें ह्मणणें आहे, त्याप्रमाणें व्यवस्था करण्यास वरिष्ठ सरकारास विशेष कठिण जाण्यासारखें आहे असें नसून तशी व्यवस्था **हॉमिल्टन** साहेबांच्या हातून न झाल्यास पुढें ती होण्याविषयीं आशाच नको.' नंतर त्यांनीं तारीख ११ एप्रिल रोजीं पुनः दुसरें पत्र **एजंट गव्हरनर जनरल** यांना लिहिलें कीं, '**गव्हरनर जनरल**

साहेबांनीं आपल्या पत्रांत नबाब **शहाजहान बेगम** यांच्या लग्नासंबंधें सूचना लिहिल्या होत्या त्या अमलांत आणण्याची आतां संधि बरी आहे, व बक्षी **बाकीमहंमदखान नसरजंग** हे चांगल्या गुणांनीं युक्त, चांगले घरंदाज, **भोपाळचे** पिढीजाद राहणारे व राज्यांतील मोठे कामगार असून त्यांच्यांत सर्व चांगले गुण वास करीत आहेत, तेव्हां ते नबाब **शहाजहान बेगम** यांस योग्य वर आहेत. **एजंट गव्हरनर जनरल** यांनीं **गव्हरनर जनरल** साहेबांचा अभिप्राय लिहून आलेला कळविला कीं, '**शिकंदर बेगम** यांनीं **शहाजहान बेगम** एकवीस वर्षांच्या होईपर्यंत मुखत्यार रहावें आणि त्यानंतर जर **शहाजहान बेगम** मुखत्यारी मिळण्याविषयीं मागणें करतील तर त्यांना नाहीं म्हणण्यास फारशी जागा राहणार नाहीं.' त्यावर **बेगम** साहेबांनीं जबाब लिहिला कीं '**भोपाळच्या** राज्यावर आमच्यापेक्षां ज्यास्त हक्क दुसऱ्या कोणाचा नाहीं व आह्मीं राज्यकारभार सुधारण्याच्या संबंधानें केलेली सर्व व्यवस्था **इंडिया** सरकारांनीं व इतर **इंग्रजी** कामगारांनीं पसंत केली असल्यानें आह्मांस जीवमान पावेतों राज्याचे मुखत्यार सरकार बिनहरकत नेमतील अशी उमेद आहे.' शेवटीं तारीख ४ जुलई सन १८८९ रोजीं **पोलिटिकल एजंट**साहेब, **गव्हरनरजनरल**कडून आलेला खलिता घेऊन **भोपाळास** आले. त्या खलित्यांत, 'बक्षी **बाकीमहंमदखान** यांसच वर पसंत केल्याबद्दलचें पत्र पावलें. त्यांत त्यांनाच पसंत करण्याचीं कारणें लिहिलीं तीं योग्य असल्यानें आपलें ह्मणणें आह्मास मान्य आहे.' असें लिहिलें होतें.

याप्रमाणें मंजुरी आल्यावर तारीख २८ सवाल सन १२७१ रोजीं निमकचापीचा विधि झाला. तारीख २ जिलकाद रोजीं **पोलिटिकल एजंट** यांनीं, नबाब **शहाजहान बेगम** यांस राज्याचा मुख्य अधिकार दिला असून **शिकंदर बेगम** यांना **रीजंट** किंवा मुखत्यार नेमल्याबद्दल व नबाब **बाकीमहंमद** हे नुसते नांवाचे नबाब असल्याबद्दल जाहिरनामा प्रसिद्ध केला. तारीख ४ जिलकाद रोजीं वाग्दान होऊन **इंग्रज**

सरकारच्या संमतीनें, **बाकीमहंमदखान** यांना नवाब **वजीरउद्दवला अमरावदूला** बहादूर हा किताब दिला. तारीख ९ रोजीं **एजंट गव्हरनर जनरल** यांनीं **गव्हरनर जनरलच्या** वतीनें नबाबास आमच्या लग्नासंबंधें खिलत दिली. याबद्दल एकवीस तोफांची सलामी झाली. नबाबास हमेषा १७ तोफांची सलामी देण्याचा **इंग्रज** सरकारांतून ठराव झाला.

तारीख ११ रोजीं **अबदूलहाई** यांचे चिरंजीव मौलवी **अबदूलकयूम** यांनीं आमचा लग्नसंस्कार केला. आह्मांस दोन कोट रुपये आंदण देण्याचा ठराव झाला; परंतु त्यांतून एक पैसाही कधीं आह्मांस मिळाला नाहीं. तसेंच आमच्या खर्चाकरितां दरमहा ५०० रुपये देण्याचा ठराव झाला. ते रुपये किंवा नबाबाच्या उत्पन्नापैकीं कांहींएक रकम आह्मांस किंवा नबाब **सुलतान जहानबेगम** यांस मिळाली नाहीं. सर्व जहागीर व उत्पन्न नबाबाच्या मुलास मिळालें. **एजंट गव्हरनर जनरल** यांच्या संमतीनें नबाबास सन १२६३ सालापासून ६५००० रुपये सालीना उत्पन्नाची जहागीर दिली गेली. या लग्नसमारंभाकडे एकंदर सात लाख एकाहत्तर हजार तीनशें बासष्ट रुपये सवासात आणे खर्च झाला. त्याचा तपशील.

आंदणाकडे व दागदागिन्यांकडे ३९०६१७॥=।.
नबाबास सामान व जहागीर दिली त्याकडे २६६४६९।≡॥।
इतर खर्च ११४२७५।=।.

आमची ५७८६६॥।=॥. रुपये सालीना उत्पन्नाची खासगत जहागीर तेवढीच आमच्याकडे कायम राहिली. लग्नाच्या वेळीं ज्यास्त जहागीर आह्मांस मिळाली नाहीं.

# भाग ३ रा.

## बंडाच्या वेळची व्यवस्था व शिकंदर बेगम.

गादीवर बसून आह्मांस यौवराज्य मिळाल्याची हकीकतः—सन १२७३ सालीं **लंडन** येथील आर्सनलमधून नवीं काडतुसें **हिंदुस्थानांत** येऊन तीं सर्व लष्करी छावण्यांत वांटलीं गेलीं. तीं काडतुसें तेलकट दिसल्यानें त्यांना गुरांची चरबी लाविली असावी असा, हिंदु व मुसलमान, दोन्ही जातींच्या लोकांस संशय आला. गाईच्या चरबीस किंवा मांसास स्पर्श करण्याची हिंदु लोकांच्या धर्मांत मनाई असून डुकरांच्या व इतर घाणेरड्या प्राण्यांच्या मांसास व चरबीस स्पर्श करणें मुसलमानी धर्माप्रमाणें अयोग्य व अमंगळ आहे. या काडतुसांवरील कागद कवाइतीच्या वेळीं दांतांनीं तोडून, त्यांतील दारू बंदुकीच्या नळींत ओतावी, असा हुकूम होता. परंतु शिपायी लोकांस तसें करितां येईना. या प्रकरणाविषयीं वाद चालला होता, इतक्यांत रमजान महिन्यांत **मिरत** येथील फौजेनें, हीं काडतुसें वापरण्याचें नाकारिलें. तेव्हां शिपायांस दहशत बसण्याकरितां त्यांतील नेटिव आफिसर कैद केले गेले. त्यावरून तारीख १६ रोजीं स्वार व पायदळ लोकांनीं बंड करून आपल्या इंग्रजी आफिसर लोकांस व त्यांच्या बायकामुलांस ठार मारून त्यांचीं घरें जाळून टाकून **दिल्लीचा** रस्ता धरिला. तेथील शिपायांनींही बंड करून **दिल्लीचा** वृद्ध ९० वर्षांच्या वयाचा बादशहा, **बहादूरशहा** याला गादीवर बसविलें. तो **शहाजहानाबाद** येथील किल्ल्यांत रहात असून त्याला दरमहा एक लाख रुपये पेनशन **इंग्रज** सरकारांतून मिळत होतें.

इंग्रज सरकारांनीं **हिंदुस्थानाचे बंगाल, मुंबई, मद्रास** व **पंजाब** असे चार इलाखे केले होते. थोड्या दिवसांतच सर्व **बंगाल** इलाख्यांत बंडाचा फैलावा होऊन, सत्तर पायदळ पलटणी व पुष्कळशा स्वारांच्या पलटणींनीं बंड करून आपल्या कामगारांस ठार मारून खजीने

व अर्सनल लुटून रयतेची दुर्दशा केली, व **दिल्लीस** जाऊन तेथें आश्रय धरून राहून सरकाराशीं सामना केला. या युद्धास बंड असें नांव मिळालें. याविषयींची हकीकत चांगल्या चांगल्या युरोपियन व नेटिव ग्रंथकारांनीं इंग्रजींत व फारशींत लिहून ठेविली आहे. सबब ती येथें लिहिण्याचें प्रयोजन नाहीं. त्या दिवसांत झालेला रक्तपात व धामधूम यांची हकीकत 'तारिख महरब अजूम' नांवाच्या **लाहोर** व **लखनौ** येथें छापलेल्या ग्रंथांत आढळून येईल. **ग्वाल्हेर** व **इंदूर** येथील महाराज, त्यांच्या हाताखालीं पुष्कळ फौज व मुलूख असून ते बंडवाल्यांच्या भीतीनें व आपल्या फौजेच्या बेभरंवशामुळें **इंग्रज** सरकारास मदत द्यावयाची सोडून ते स्वस्थ राहिले. व खुद्द **ग्वाल्हेर** येथें व **मुरार** येथील छावणींत पुष्कळसा दंगा झाला. परंतु **शिकंदर बेगम** साहेबांनीं या गर्दीच्या वेळीं मोठ्या चातुर्यानें व शहाणपणानें आपली फौज व शहर दाबांत ठेवून आपल्या हातून होईल तितकी **इंग्रज** सरकारास मदत करून **काल्पी**पावेतों युरोपियन फौजेकरितां धान्य वगैरे सामान पाठवून दिलें. तसेंच त्यांनीं **सागर** व **बुंदेलखंडां**तील गांवाच्या बंदोबस्ताकरितां आपल्या फौजेच्या टोळ्या पाठविल्या. **भोपाळ**-शाईंतील कामगारांनीं अगदीं मनापासून व आपल्या हातून होईल तितकें **इंग्रज** सरकारच्या सांगण्याप्रमाणें वर्तन ठेविलें. त्या योगानें त्यांची फार तारिफ झाली. जो कोणी बेदिल आढळला त्यास तेव्हांच शासन करण्यांत आलें.

**अंबापाणी** येथील जहागीरदार **फाजीलमहंमदखान** व **अदीलमहंमदखान** यांनीं बंड केल्यावरून **बेगम** साहेबांनीं त्यांच्या जहागिरी जप्त केल्या. **फाजीलमहंमदखान** याणें **रहाटगड**च्या किल्ल्याच्या आश्रयानें त्याच्यावर **इंग्रजी** फौज गेली, तिच्याशीं सामना केला. तेव्हां पुढें त्याला पकडून फांशीं दिलें व **अदीलमहंमदखान** तेव्हांपासून नाहींसा झाला, त्याचा आजपर्यंत पत्ता नाहीं. **सिहोर** येथील कांटिंजंटीच्या लोकांनीं बंड केलें. तेव्हां **बेगम** साहेबांनीं त्यांच्या बंदोबस्ताकरितां फौज

पाठवून **सिहोर**ची छावणी त्यांच्या कडून मोठ्या युक्तीनें घेतली. पुढें युरोपियन लोकांनीं बंडवाल्यांस पकडून फांशीं दिलें. **रहाटगड**चा **सर्फराजखान** याच्या सल्ल्यानें ज्या लोकांनीं बंड करून **भोपाळाहून** जाऊन **भेरस्या** परगण्याच्या कामगारास ठार मारिलें होतें, ते लोक पुनः कधींही **भोपाळास** परत आले नाहींत.

बंडाची धामधूम आटपल्यावर युरोपियन कामगार **बेगम** साहेबांवर फार खूष झाले. तारीख ११ दिसेंबर सन १८५८ रोजीं **हामिल्टन** साहेब **एजंट गव्हरनर जनरल** यांणीं एक खलिता पाठविला तो येणेंप्रमाणें—" सर्व राज्यकारभार एकाच योग्य व धैर्यवान् मनुष्याच्या हातीं असणें हाच राज्याचा भक्कम पाया होय असें आपण मेहेरबानगी करून आपल्या भाऊबंदांच्या मनावर ठसवून द्यावें. " आपले चुलते नबाब **मोईजमहंमदखान** यांच्या स्वतंत्र अधिकारामुळें राज्यांत तंटे बखेडे होऊन बंड होण्याचा प्रसंग आला होता. 'राज्यकारभाराची उत्तम व्यवस्था करण्याच्या संबंधांत आपल्या भाऊबंदांच्या मनांस कांहीं दुःख झालें किंवा वाईट वाटलें तथापि तिकडे लक्ष देण्याची जरूर नाहीं व यासंबंधें विशेषतः आपल्या मातुश्री **खुदसिया** बेगम यांच्या जहागिरीची व्यवस्था एखाद्या चांगल्या मनुष्याच्या हातीं देऊन त्यांच्या नांवास बट्टा न लागे अशी व्यवस्था करणें जरूर आहे.' अशा तऱ्हेचा आधार हातीं आला असतांही **बेगम** साहेबांनीं **खुदसिया** बेगम यांच्या वयाकडे पाहून त्यांचें मन न दुखवितां मोठ्या अपराधाची चौकशी करण्याचा अधिकार मात्र त्यांजकडून काढून घेतला. **बेगम** साहेबांनीं या वेळीं आपल्यास **हिंदुस्थान** सरकार विशेष अनुकूल आहे असें पाहून, आपल्यास जन्मभरपर्यंत राज्याची मुखत्यारी असावी अशाबद्दल पुनः बोलणें लाविलें. 'याविषयीं प्रथम विचार आमच्या लग्नाच्या वेळीं निघाला होता. तारीख ३१ मार्च सन १८५९ रोजीं त्यांनीं **एजंट गव्हरनर जनरल** व **गव्हरनर जनरल** लार्ड **क्यानिंग** साहेब यांच्याकडे लिहून पाठविलें कीं, **हिंदुस्थान**देश पुनः **महाराणी** सरकारच्या पूर्णपणें ताब्यांत

आल्या दिवसापासून आमच्या निकालावांचून राहिलेल्या कित्येक गाऱ्हाण्यांची दाद लागावी ह्मणून अर्ज देण्याकरितां आह्मी संधि पहात होतों. येथील नबाबाच्या मागें त्याच्या मुलांस गादी मिळण्याची या संस्थानांत पूर्वींपासून वहिवाट आहे. तीस अनुसरून आमच्या वडिलांच्या मरणानंतर आह्मांस गादीचे अधिकारी केलें. ही गोष्ट तहास अनुसरून झाली हें आपल्यास माहीत आहेच. आह्मी वयांत येऊन आह्मांस बरें वाईट कळूं लागल्यावर नबाब **जहांगीर महंमदखान** यांना ते आमचे नवरे होते येवढ्याच कारणावरून राज्याचा मुख्य अधिकार दिला. परंतु राज्यावर खरा हक्क आमचा होता. ही गोष्ट तहाच्या विरुद्ध झाली. कारण आजवर आमचे वडील जिवंत असून आतां त्यांचा काळ होता व आह्मी, **जहांगीर महंमदखान** व आमची कन्या मागें राहतों तर आह्मां तिघांपैकीं कोणास राज्य मिळालें असतें? आह्मांस मिळालें तर तहाची शर्त पाळली असें होतें, परंतु आमच्या नवऱ्यास मिळतें तर ती गोष्ट तहाच्या विरुद्ध होती. तिसरी गोष्ट अशी कीं, जर एखाद्या राज्यकर्त्याच्या पाठीमागें त्याच्या मुलीस ती लहान असेल तोंपावेतों राज्याची अधिकारी केलें व ती वयांत येऊन तिला कळूं सवरूं लागलें तोंच दैवयोगानें जो कोणी तिचा नवरा होईल त्याच्या हातीं अधिकार दिला जावा अशीच वहिवाट असती व आमचे वडील, आह्मी उभयतांही पूर्ण वयांत येईपर्यंत जिवंत राहून नंतर मरण पावते तरीही आह्मांसच राज्याचा अधिकार मिळाला पाहिजे होता. असें न होतां, आमच्या नवऱ्यास त्याचें आमच्याशीं लग्न झालें येवढ्या कारणावरूनच राज्याचा अधिकार मिळाला तर ही गोष्ट सर्वन्यायी व थोर लोकांस कधीं मान्य झाली नसती. असें होऊं नये एवढ्याकरितांच आपल्या व **पोलिटिकल एजंटाच्या** मार्फत वरिष्ठ सरकाराकडे, आमच्या जांवयाचा कोणत्याही तऱ्हेनें गादीवर वारसा नसल्यानें त्याजकडे राज्याधिकार दिला जाऊं नये ह्मणून, आह्मीं अर्ज दिला होता. व हें आमचें ह्मणणें तहास अनुसरून असल्यामुळें **हिंदुस्थान** सरकारांनीं मंजूरही केलें. ज्यांच्याकडून

पूर्वीं असें हें नुकसान झालें होतें, त्यांच्याकडूनच त्याची दुरुस्ती झाली याबद्दल आह्मी **ईश्वरा**चे फार आभारी आहों. तशाच तऱ्हेचें नुकसान होण्याचा प्रसंग हल्लीं आला आहे. ह्मणून आमचे हक्क काय आहेत ते पुढें आणणें भाग पडलें आहे व **ईस्टइंडिया** कंपनीनें आमच्या अर्जाचा विचार करून आमच्या जांवयाच्या हातीं नाहक राज्याधिकार जावयाचें टाळिलें. त्याचप्रमाणें हल्लीं या आमच्या दुसऱ्या नुकसानाची व्यवस्था **महाराणी** सरकाराकडून होईल अशी आह्मांस पूर्ण उमेद आहे. आपण या संस्थानाच्या सर्व व्यवस्थेशीं, इतिहासाशीं व हक्कांशीं पूर्णपणें वाकबगार असून हल्लीं **विलायतेस** जाण्याच्या बेतांत आहांत. तर मेहेरबानगी करून आमचें पत्र **गव्हरनर जनरल**कडे पाठवून द्यावें, ह्मणजे आमच्या या संस्थानाचा पाया जो हल्लीं आपल्या मदतीनें व ईश्वराच्या कृपेनें चांगला पक्का झाला आहे त्याला कीड लागणार नाहीं.'

त्याच वेळीं **गव्हरनर जनरल**साहेबांकडे पत्र पाठविलें त्यांतील आशय येणेंप्रमाणेंः—'ज्या **परमेश्वरानें हिंदुस्थान** देश बदमाष लोकांच्या हातून सोडवून **इंग्रज** सरकारच्या अमलांत दिला व ज्या लबाड व मूर्ख लोकांनीं तंटा उपस्थित करून बंड उभारिलें त्यांना शिक्षा करण्याचें **इंग्रज** सरकारास सामर्थ्य दिलें, त्याचे आह्मी फार आभारी आहों. **व्हिक्टोरिया महाराणी** साहेबांनीं **हिंदुस्थान** देश **ईस्टइंडिया** कंपनीच्या हातून काढून आपल्या हातीं घेऊन, कोणाही मनुष्यास राज्यक्रांतीच्या वेळीं आपल्यावर अन्याय झालासें वाटत असेल त्याला खुद्द **राणी** सरकाराकडे अर्ज करून योग्य हक्क मिळवून घेतां यावे व सर्व लहान मोठ्या लोकांस त्यांच्या कृतीस अनुरूप न्याय व मोबदला मिळेल असें अभिवचन दिलें ह्मणूनच आह्मीं आमचे हक्क पुढें करण्याची ही संधि साधून त्याच्या पुष्टीकरणार्थ मजबूत व मुद्देशीर लेखी पुरावे दाखविले, तर आमचा अर्ज फुकट जाणार नाहीं अशी आमची खात्री आहे. **भोपाळ**च्या राज्याचा पाया मजबूत व स्थिर करण्याकरितां व उभयतांमध्यें झालेल्या तहाच्या शर्तीं बरोबर रीतीनें पाळल्या जाण्याविषयीं **राणी** सरकारांनीं

जाहीरनाम्यांत दिलेलें वचन पुरें होण्याकरितांच हा दावा आह्मी करीत आहों. याची हकीकत अशी आहे कीं, या संस्थानाशीं झालेल्या पूर्वींच्या तहनाम्याशीं विरुद्ध अशा दोन गोष्टी या राज्यक्रांतीच्या वेळीं आमच्या नजरेस येतात. एक तर राज्याच्या मालकिणीच्या नवऱ्यास राज्याचा मुख्य अधिकार दिला जात होता. व दुसरें आमचें वय ११ वर्षाचें असतांना आमचे वडील मरण पावले, त्या वेळीं तहनाम्यास अनुसरून आह्मांस राज्याचे मालक ठरविलें. परंतु आह्मी वयांत येऊन राज्य करण्यास योग्य होऊन आमची परीक्षा करण्याचे दिवस येतांच सर्व राज्यकारभार वास्तविकपणें वडिलोपार्जित हक्कानें आमचा असून आमची कांहीं परीक्षा न करितां व तहनाम्याकडे लक्ष न देतां आमच्या नवऱ्याकडे सोंपविला गेला व त्यांच्या मरणानंतरही त्याच्यावर आमचा हक्क असतांनाहि सर्व अधिकार माझ्या ७ वर्षांच्या कन्येकडे दिला व आह्मांस खलिता लिहून पाठविला कीं, 'ज्याप्रमाणें नबाब **नजरमहंमदखान** यांच्या मरणानंतर **भोपाळ**चे सरदार लोक व **इंग्रज** सरकार यांच्या मदतीनें आपल्यास अधिकार दिला गेला होता त्याचप्रमाणें माजी नबाब **जहांगीरखाना**ची व आपली कन्या **शहाजहान बेगम** यांना हल्लीं राज्याधिकार देण्याचा **इंग्रज** सरकार ठराव करीत आहे. व पुढें त्यांच्या लग्नाच्या वेळीं आपण, **भोपाळ**चे सरदार व **इंग्रज** सरकार यांच्या संमतीनें राज्यकारभाराचा बंदोबस्त केला जाईल व त्यांच्या नवऱ्यास राज्याचे मालक समजलें जाईल.' या पत्रांतील सर्व आशय नीटपणें ध्यानांत आणून आह्मीं आमच्या हातीं सत्ता येण्याबरोबर व नबाब **शहाजहान बेगम** यांचें लग्न होण्यापूर्वीं सरकारास विनंतिपत्र लिहिलें कीं, 'आमच्या कन्येचें ज्या दैवशाली पुरुषाशीं लग्न होईल त्याच्याकडे राज्याचा मुख्य अधिकार दिला जाऊं नये.' हें आमचें ह्मणणें योग्य व तहनाम्यास अनुसरून असल्यानें **हिंदुस्थान** सरकारांनीं मंजूर केलें. त्या योगानें जांवयाच्या हातीं राज्याधिकार जाऊन आमच्या हक्काची पायमल्ली झाली असती ती टळली. हल्लीं असाच दुसरा प्रसंग

उपस्थित झाला आहे. तहनाम्याच्या शर्ती पाळण्याच्या संबंधांत **महाराणी** साहेबांस इकडील सरदारांच्या किंवा राजघराण्यांतील इतर लोकांच्या मतांकडे विशेष लक्ष देण्याची अवश्यकताच आहे असें नाहीं व राज्याचा खरा मालक जिवंत असतांना त्याचे हक्क व अधिकार त्याच्या मुलाकडे जाणें योग्य होणार नाहीं. जर तहनाम्यांत लिहिलेल्या "वारसदार व संतति" या शब्दांचें खरें महत्त्व असेल तर, ज्या हुकुमावरून आमच्या वडिलांच्या मरणानंतर आह्मी राज्याचे मालक झालों, तो हुकूम आमच्या जीवमानपावेतों तहनाम्यास अनुसरून कायम मानिला पाहिजे. व असें केलें तर, आह्मी राज्यव्यवस्था सुधारण्याकरितां केलेल्या श्रमांत व्यत्यय येणार नाहीं. आह्मीं बंडाच्या सालीं कशी नोकरी बजाविली तें मेजर **रिकार्डीस—पोलिटिकल एजंट** व **कर्नल** ड्यूरंड—आक्टिंग **एजंट गव्हरनर जनरल** व सर **राबर्ट हामिल्टन** साहेब-**एजंट गव्हरनर जनरल** यांना माहित आहे. या पत्राचा जबाब, डिसेंबर १८५९ रोजीं **गव्हरनर जनरल** साहेबांनीं दिला कीं, सर **रिचमंड शेक्सपियर** साहेब **पोलिटिकल एजंट** यांणीं राज्यांतील मुख्य अधिकाराबद्दल आपण, **एजंट** व **शहाजहान बेगम** या त्रिवर्गांचें भाषण झालें त्याचा आशय कळविला कीं '**शहाजहान बेगम** या राज्याच्या हक्कदार मालक असून त्यांच्या मुलांस त्यांच्यामागें अधिकार मिळेल; परंतु त्यांणीं आपण होऊन कबूल केलें आहे कीं, 'राज्याचा मुख्य अधिकार, पदवी व राज्यसत्ता हीं सर्व आपल्या जीवमानपर्यंत आपल्या हातीं राहावीं.' यावरून आह्मी आपली विनंति मान्य करून आमच्या येथील **एजंटास**, आपल्यास गादीवर बसविलें असल्याबद्दल जाहीरनामा प्रसिद्ध करण्याविषयीं लिहिलें आहे.'

आपण केलेले ठराव व तहनामे पाळण्याच्या कामांत **इंग्रजसरकार** फार दक्ष असतें. व ह्मणूनच त्यांनींच मला प्रथम गादीवर बसविलें असल्याकारणानें माझें या बाबतींत काय ह्मणणें आहे तें कपतान **हाचीसन** साहेब **पोलिटिकल एजंट** यांनीं मला विचारिलें. तेव्हां,

आमच्या मातोश्रीच्या इच्छेप्रमाणें वागण्यास मी राजी असल्याचें कळविलें होतें, व ही गोष्ट त्यांनीं **एजंट गव्हरनर जनरल** सर. आर. **शेक्सपियर** साहेब यांस कळविली होती. त्यावरून त्यांनीं मला लिहून पाठविलें कीं, 'कपतान **हाचीसन** साहेब यांनीं' आपण एवढ्या शहाणपणानें व प्रांजलपणें केलेल्या ठरावाबद्दल आह्मांस लिहून कळविलें. या योगानें आपण खरोखर एका महत्त्वाच्या प्रकरणाचा फार उत्तम व समाधानकारक निकाल केलात. नबाब **शिकंदर बेगम** साहेब यांच्याकडे जीवमानपर्यंत राज्याचा मुख्य अधिकार राहील. त्यांनीं नुकत्याच झालेल्या बंडाच्या वेळीं सरकारची नोकरी बजाविली. त्याबद्दल **इंग्रज**-सरकार त्यांचें फार ऋणी आहे. व तें **बेगम** साहेबांस मदत देण्यास कधीं चुकणार नाहीं.' या प्रकरणाचा निकाल झाल्यावर **एजंट गव्हरनर जनरल** यांणीं नबाब **शिकंदर बेगम** यांस लिहून कळविलें कीं, 'नबाब **शहाजहान बेगम** यांस गादीवर बसवून त्या वयांत येई तोंपर्यंत, नबाब **शिकंदर बेगम** यांस इंग्रजसरकारांनीं राज्याचे मुखत्यार नेमिलें असल्याबद्दल, सन १८५९ सालीं, नबाब **शहाजहान बेगम** यांचें लग्न झाल्यावेळीं, कपतान **ईडन**साहेब यांणीं **भोपाळ**च्या सर्व रयतेस जाहीरनाम्यानें प्रसिद्ध केलें होतें. हल्लीं, तारीख २० जुलई रोजीं **शहाजहान बेगम** या वयांत आल्या असून त्यांनीं, राज्यांतील मुख्य अधिकार आपल्याकडेसच असावा, ह्मणून, कपतान **हाचीसन** साहेबांजवळ आपली इच्छा प्रगट केली तेव्हां ही गोष्ट **व्हाइसराय** साहेबांनीं मंजूर करून आपल्यास समारंभानें गादीवर बसविण्याविषयीं मला लिहिलें आहे. व आपल्या सर्व रयतेस व सरदारांस ही गोष्ट पुरतेपणीं व वेळेवर समजावी हें योग्य असल्यामुळें, आपल्याकडे एक जाहीरनाम्याची प्रत पाठविली आहे, ती राज्यांत प्रसिद्ध करावी. आपल्यास गादीवर बसविण्याचें ज्या दिवशीं ठरेल त्या दिवशीं आह्मी स्वतः **भोपाळास** येऊन आपल्यास शिरस्त्याप्रमाणें सर्व डामडौलानिशीं गादीवर बसवूं. आपण बंडाच्या सालीं नोकरी बजाविली ती **इंग्रज**सरकार कधींही विसरणार नाहीं.

तारीख ९ सवाल सन १२७६ या तारखेस गादीवर बसविण्याचा समारंभ होण्याचें ठरविलें होतें. **इंदुराहून एजंट गव्हरनर जनरल** व **सिहोराहून पोलिटिकल एजंट** यांणीं येऊन आमच्या मातोश्रीस गादीवर बसविलें. व मला **युवराज** ठरविलें. आणि मोत्यांचा कंठा, जडावाच्या पाटल्या, चांदीचें कलमदान, ढालतलवार, चार इंग्रजी तोफा, दोन सामानासहित घोडे आणि चांदीचा हौदा व किनखापी झुलीसह एक हत्ती, अशी खिलत दिली. आमच्या मातोश्रीनीं **गव्हरनर जनरल** साहेबांकरितां **एजंट गव्हरनर जनरल** यांस २२७ मोहरा नजर केल्या.

---

## भाग चौथा.

### जबलपुरास दरबार होऊन इंग्रजसरकाराकडून भैरस्या परगणा मिळविण्याची हकीकत.

सन १२७७ च्या जमादिलावल महिन्यांत मेजर **म्याकमुलीन पोलिटिकल एजंट भोपाळ** यांजकडून, **गव्हरनर जनरल** साहेब **जबलपुरास** येणार असून त्या जागीं या प्रदेशांतील सर्व राजे लोकांचा दरबार होणार आहे असें कळविल्यावरून, आमच्या मातोश्रीनीं तयारी करून त्याच महिन्याच्या २९ तारखेस, बक्षी **मरामत महंमदखान** याला बरोबर फौज देऊन **जबलपुरास** पाठविलें व आपण स्वतः मला व नबाब **अमरावदूला**, नबाब **खुदसिया बेगम**, नबाब **मोईज महंमदखान**, **मीया फौजदार महंमदखान**, **मदार उल्महाम**, **जमाल उद्दीखान** व दुसरे सरदार व गारदीचे स्वार यांस बरोबर घेऊन शनिवार तारीख १ जमादिलाखल रोजीं निघून मंगळवार तारीख २९ किंवा तारिख ७ जानेवारी सन १८६१ रोजीं **जबलपुरास** पोहोंचल्या. दुसरे दिवशीं **गव्हरनर जनरल** साहेबांची स्वारी आली.

मंगळवार तारीख १५ जानेवारी रोजीं दुपारीं ११ वाजतां दरबार झाला. त्या वेळीं **भोपाळचे** सर्व सरदार उत्तम पोषाख करून हत्तीवर स्वार होऊन **गव्हरनर जनरल** साहेबांच्या डेऱ्याजवळ आले. नेमल्या

जागीं आल्यावर स्वार व पायदळ मागें राहिलें व हत्ती गोटाबाहेर वाट पाहात राहिले. **एजंट गव्हरनर जनरल** व सरकारचे **फारेन सेक्रेटरी** हत्तीवर बसून **व्हाइसराय** साहेबांच्या गोटाबाहेर सामोरे आले. दरबारच्या डेऱ्यासमोर शामीआना लाविला होता. त्याजवळ येतांच **सेक्रेटरी** साहेबांनीं नबाब **शिकंदर बेगम** यांचा व **एजंट गव्हरनर जनरल** यांनीं **खुदसिया बेगम** यांचा हात धरून त्यांस नीटपणें त्यांच्या हौद्यांतून खालीं उतरून घेतलें. व **पोलिटिकल एजंट भोपाळ** हे नबाब **अमरावदूला** व **मोईज महंमदखान** वगैरेंच्या हत्तींजवळ आल्यावर सर्वजण खालीं उतरले. शामीआनांत जातांच गोरे शिपायांनीं आह्मांस सलामी दिली. व आह्मी दरबारच्या डेऱ्यांत जाऊन आमच्या नांवच्या चिठ्या लावलेल्या खुर्च्या **सेक्रेटरी** साहेबांनीं दाखविल्या त्यांवर जाऊन बसलों. दुसरे राजेरजवाडे दरबारांत यावयाचे होते ते येऊन व्यवस्थितपणानें कांहीं गोंधळ न होतां आपापल्या जाग्यांवर बसले. सर्व लोक जमल्यावर चार एडिक्यांपांसहित **गव्हरनर जनरल** आले. त्यांना गोऱ्या शिपायांनीं सलामी दिली. व त्यांच्या सन्मानार्थ सर्वजण उठून उभे राहिले. नंतर **गव्हरनर जनरल** आपल्या जागेवर बसले. त्यांच्या उजव्या बाजूस चौघे एडिक्यांप व डाव्या बाजूस राजेरजवाडे होते. गव्हरनर जनरलांच्या सन्मानार्थ तोफा वगैरे सुटल्यावर त्यांनीं उठून इंग्रजींत भाषण केलें तें सर्वांस समजावें ह्मणून **सेक्रेटरी** यांनीं त्याचें उर्दूंत भाषांतर करून दाखविलें तें—"**शिकंदर बेगम** साहेब, तुह्मी या दरबारांत आलां याबद्दल आह्मांस फार आनंद आहे. आपण **इंग्रज**सरकारची नोकरी बजाविलीत त्याबद्दल समक्ष आपले आभार मानण्याची आमच्या मनांत फार दिवसांपासून इच्छा होती. ज्या राज्याची **इंग्रज**सरकाराबरोबर कधींच लढाई झाली नाहीं, अशा राज्याचे आपण मालक आहां. त्या राज्यावर आमच्या शत्रूंनीं हल्ला करण्याची भीति घातली होती, अशा वेळीं आपण स्त्री असूनही, अशा धैर्यानें व शहाणपणानें यथास्थित बंदोबस्त केलात कीं, या गुणांच्या योगानें कोण-

च्याही शूर किंवा राज्यकारभारधुरंधर पुरुषाचें नांव झालें असतें. आपल्या आसपासचें बंड व दंगे मोडून टाकण्याची व **एजंट गव्हरनर जनरल**सुद्धां सर्व युरोपियन लोकांचे प्राण वांचविण्याची मोठी कामगिरी बजावून, शिवाय, आपण, **इंग्रज**सरकारच्या तुकड्या आपल्या आसपास आल्या त्यांना सर्व तऱ्हेची मदत करून, त्यांना ताबडतोब पुढें रवाना करण्याच्या कामीं मदत करण्यांत आपण केव्हांही कसर केली नाहीं.

"अशा कामगिऱ्यांस केव्हांही बक्षीस मिळाल्यावांचून राहतां कामा नये. याकरितां हल्लीं आह्मी तुह्मांस **भैरस्या** परगणा सर्व अधिकारांसह दिल्याची सनद तुमच्या हातीं देतों. हा परगणा पूर्वी **धार** संस्थानच्या ताब्यांत होता. परंतु **धारवाल्यां**नीं बंड केल्यामुळें त्यांचा त्यावरचा सर्व हक्क बुडाला. तुमच्या शहाणपणाच्या, धैर्याच्या व शौर्याच्या व्यवस्थेनें **भोपाळ** संस्थानाकडून जी राजनिष्ठा दाखविली गेली तिच्या सारकादाखल व बक्षिसादाखल हा परगणा हल्लीं **भोपाळ**च्या राज्यांत सामील केला जात आहे.

"हल्लीं येथें आपले सरदार, **जबलपूर** व **सागर** परगण्यांतील बडे लोक व **महाराणी** सरकारचे येथें जमलेले कामगार, या सर्वांच्या समक्ष ही सनद खुद्द आपल्या हातीं देण्याचा मला फार आनंद होत आहे."

**भैरस्या** परगणा तारीख २७ दिसेंबर १८६० रोजीं **भोपाळ**सरकारास मिळाला त्याबद्दलच्या सनदेचें भाषांतर.

'**भोपाळ**च्या मुखत्यार नबाब **शिकंदर बेगम** यांनीं बंडाच्या वेळीं राजनिष्ठेनें **इंग्रज**सरकारची चांगली नोकरी बजावून **भोपाळ**च्या राज्यांत व्यवस्था व शांतता राखिली. त्यावरून **सरकार** फार खुष होऊन, **भैरस्या** परगणा वंशपरंपरेनें सर्व अधिकारांसह **भोपाळ**सरकारास देत आहे. हल्लीं **भोपाळ**च्या संबंधांत ज्या ज्या शर्ती व करार अमलांत आहे ते ते सर्व या हल्लीं दिलेल्या परगण्यासही लागू राहतील.'

हें भाषण झाल्यावर, **गव्हरनर जनरल** साहेब आपल्या जागीं बसले. नंतर **बेगम** साहेबांनीं उठून भाषण केलें तें—'आपल्या हुकुमास अनु-

सरून वागण्याला आमच्या वडिलांपेक्षांही जास्त सामर्थ्य आह्मांस **परमेश्वरानें** दिलें, याबद्दल परम दयाळु **परमेश्वराचे** मी आभार मानतें. तसेंच आपण माझ्या वडिलांच्या मागून मला गादीवर बसविलें याबद्दल आपलेही मजवर फार उपकार आहेत. आपल्या हुकुमाप्रमाणें चालण्याचें मला मोठें गौरव वाटतें. आणि जन्मभर आपल्या इच्छेविरुद्ध मी कधींही वागणार नाहीं व माझ्या कन्येचीही वर्तणूक याच रीतीची राहील अशी माझी खात्री आहे.'

**फारेन सेक्रेटरी** यांनीं हें भाषण इंग्रजींत **गव्हरनर जनरल** साहेबांस समजून दिलें. नंतर त्यांनीं आपल्या हातांनीं **बेगम** साहेबांस खिलत व अत्तरपान दिलें. तसेंच त्यांनीं **भोपाळचे** वकील मुनशी **भगवान प्रसाद** यांना त्यांनीं बंडाच्या वेळीं राजनिष्ठेनें वर्तन केल्याबद्दल, एक घड्याळ, व एक खिलत बक्षिस देऊन तहाहयात शंभर रुपये दरमहा इंग्रजसरकारांतून पेनशन करून दिलें. नंतर **सागर** व **जबलपूर** येथील कांहीं लोकांस खिलती मिळाल्यावर दरबार बरखास्त झाला.

दरबार झाल्यानंतर **बेगम** साहेबांनीं **लेडी क्यानिंग** यांची भेट घेतली. व त्यांच्याबरोबर एका कोचावर बसल्या. त्यांचें यांचें चांगलें व प्रेमाचें भाषण झाल्यावर त्यांनीं यांना एक पुस्तक व फूलदानाची जोडी नजर केली. दुसरे दिवशीं ११ वाजतां **गव्हरनर जनरल** साहेब १३ साहेब लोकांसहित आमच्या डेऱ्यावर आमच्या भेटीस आले. आमच्या दरबारांत आप्तइष्ट व कामगार वगैरे मिळून १०८ लोक होते. प्रथम नबाब **मोईज महंमदखान** व नबाब **अमरावदूला** व **फौजदार महंमदखान** व **मदार उल्महाम** हे, **व्हाइसराय** साहेबांच्या गोटांत, त्यांना आमच्या डेऱ्यावर आणण्याकरितां सामोरे गेले व त्यांस तेथवर पोंचविण्यासही गेले होते. **बेगम** साहेब त्यांच्या गाडीपर्यंत सामोऱ्या गेल्या. आमच्या दरबारांतील मंडळींनीं आदबीनें सलाम केले. त्यांस २१ तोफांची सलामी झाली. नंतर २१ तबकें भरून त्यांच्यापुढें ठेवून **बेगम** साहेबांनीं त्यांचा स्वीकार करण्याविषयीं विनंति केली आणि बोलल्या कीं, 'काल आपण भरदरबारांत जी

आमची स्तुति केली ती आह्मी आजन्म विसरणार नाहीं. कारण तिच्या योगानें आमची व आमच्या राज्याची योग्यता पूर्वींपेक्षां अतिशय वाढली. आपण आमच्यावर जी मेहेरबानगी केली ती सर्व आह्मी पूर्णपणें जाणून आमच्या कन्येसही या बहुमानाची खरी योग्यता जाणून घेण्यास शिकवूं.'

हें भाषण झाल्यावर नजरेचीं तबकें त्यांच्यापुढें केलीं व **बेगम** साहेबांनीं आपल्या हातांनीं एक मोत्यांचा तुरा किंवा शिरपेंच त्यांस दिला. नंतर **खुदसिया बेगम** यांनीं नजर केलेलीं तबकें आणिलीं, व त्यांनीं-ही आपल्या हातांनीं त्यांस एक मोत्यांची कंठी दिली. **लार्ड** साहेबांस जातांनाही तोफांची सलामी झाली.

दुसरे दिवशीं **लेडी क्यानिंग** यांनीं परत भेट केली. त्यांच्या भेटीची व्यवस्थाही **व्हाइसराय** साहेबांच्या भेटीप्रमाणें ठेविली होती. त्यांनीं **बेगम** साहेबांची भेट झाल्यामुळें फार आनंद झाल्याचें बोलून दाखविलें. त्यावरून **बेगम** साहेबांनीं सांगितलें कीं, आपणच आमच्या महाराणी सरकार असून आपल्या भेटीनें आमची फार बडेजाव व बहुमान झाला असें आह्मी समजतों. नंतर आह्मी ज्या जागीं होतों तेथें येऊन त्यांनीं आमची भेट घेतली. आणि तेथून दरबारास जाऊन त्या लौकरच परत गेल्या.

आमच्यापूर्वींच आमचें लष्कर **भोपाळास** रवाना झालें. व तारीख २१ जानेवारी १८६१ रोजीं सोमवारीं आह्मी **भोपाळास** येण्यास निघून तारीख १२ फेब्रुवारी रोजीं तेथें पोहोंचलों. या स्वारींत **व्हाइसराय** साहेबांस नजरनजराण्यांकडे बत्तीस हजार व खुद्द स्वारीचा खर्च साडेतेवीस हजार मिळून सुमारें साडेपंचावन हजार रुपये खर्च झाला.

---

## भाग ५ वा.

## अलाहाबादची स्वारी, स्टार आफ इंडिया पदवी मिळणें, व उत्तर हिंदुस्थानांतील कांहीं शहरें पाहिलीं त्याविषयीं.

सन १२७८ च्या रबिलावल महिन्यांत **भोपाळच्या पोलिटिकल**

एजंटाकडून लिहून आलें कीं, 'गव्हरनर जनरल साहेब, महाराज ज- याजीराव शिंदे, भोपाळच्या बेगम साहेब, पतिआळा येथील राजे- साहेब, व रामपूरचे नवाब यांना महाराणीसरकारच्या हुकुमानें स्टार आफ इंडिया पदवी देण्याकरितां अलाहाबादेस जाऊन दरबार करणार आहेत. त्यावरून तिकडे जाण्याची तयारी करून तारीख १ अक्टोबर १८६१ रोजीं बेगम साहेब, आह्मी, खुदसिया बेगम, नवाब नाझीरउद्दवला, बाकीमहंमदखान व मीया फौजदार महंमद- खान, मदारउल्महाम व राज्यांतील मुख्य मुख्य सरदार, स्वार शिपाई व लवाजम्यासुद्धां एकंदर सुमारें दोन अडीच हजार लोक यांसह अलाहाबादेस जाण्यास निघालों. तारीख ८ रोजीं सागरास व तारीख २२ रोजीं रेव्यास पोहोंचलों. तेथील महाराज आह्मांस सामोरे येऊन आदरानें भेटीस आले. त्यांनीं आमचें आदरातिथ्य फारच उत्तम केलें. आह्मी तारीख २४ रोजीं मंगळवारीं निघून तारीख ३० रोजीं अला- हाबादेस पोहोंचलों.

त्याच दिवशीं दोनप्रहरां पूर्वींच व्हाइसराय साहेबांनीं तसदी घेऊन बेगम साहेबांची त्यांच्या डेऱ्यावर भेट घेतली. या मेहरबानगीमुळें त्यांस फार आनंद झाला. तिसरे प्रहरीं बेगम साहेब, खुदसिया बेगम, मीया फौजदार महंमदखान व मदारउल्महाम असे साहेबांच्या भेटीस जाऊन आले. त्यापासून त्यांना संतोष झाला. त्यांच्या सन्मानार्थ जाते येते वेळीं १९ तोफांची सलामी झाली.

दुसरे दिवशीं दुपारीं गव्हरनर जनरल साहेब, फारेन सेक्रेटरी क- र्नल ड्यूरंड व दुसऱ्या दोन साहेबांसहवर्तमान परत भेटीस आले. तारीख २६ रविवारर रोजीं शिकंदर बेगम यांणीं अलाहाबादचा किल्ला व म्यागझीन किंवा शस्त्रालय पाहिलें. हा प्रसिद्ध किल्ला, दिल्लीचा बा- दशहा जलालउद्दीनअकबर यानें गंगायमुनांच्या संगमावर बांधला आहे. त्यासच हिंदुलोक प्रयाग असें ह्मणतात.

शुक्रवार तारीख १ नवंबर१८६१ रोजीं शिकंदर बेगम व्हाइसराय

साहेबांच्या डेऱ्यावर गेल्या. तेथें त्यांस **स्टार आफ इंडिया** किताब मिळून त्यांचा बहुमान झाला. या दरबारची अशी व्यवस्था होती कीं, वर लिहिलेले चारी संस्थानिक, दुसरे निमंत्रण केलेले मुलकी, लष्करी इंग्रजी कामगार व इतर लोक दहा वाजण्याच्या सुमारास दरबारच्या डेऱ्यांत येऊन आपापल्या जाग्यांवर बसले. इंग्रजी कामगार लोक **व्हाइसराय** साहेबांच्या डाव्या बाजूस असून राजे लोक व त्यांचे **पोलिटिकल एजंट** उजव्या बाजूस होते. डेऱ्याजवळ गोऱ्या व काळया स्वारांच्या दोन पलटणी रस्त्याच्या दुतर्फा उभ्या केल्या होत्या. व शिपायांची एक कंपनी किल्ल्याच्या दाराशीं उभी केली होती. महाराज **शिंदे** व नबाब **शिकंदर बेगम** यांच्या सन्मानार्थ १९ व **पत्यालाचे** महाराज आणि **रामपूरचे** नबाब यांच्या सन्मानार्थ अनुक्रमानें १७ व १३ तोफांची सलामी झाली. अकरा वाजतां **व्हाइसराय** साहेब, सेक्रेटरी, अंडरसेक्रेटरी व ऑडिकॅाप यांच्यासह दरबारांत आले. तेव्हां २१ तोफांची सलामी झाली. ते गादीवर बसल्यानंतर **महाराणी** साहेबांनीं **स्टार आफ इंडियाची** आरडर केल्याबद्दलचा तारीख ९ जुलई १८६१ चा जाहीरनामा **सेक्रेटरींनीं** इंग्रजींत व उर्दूत वाचला. नंतर **हिंदुस्थानचे** कमांडर—इन—चीफ **सर ह्यू रोज** साहेब यांणीं महाराज **शिंदे** व **भोपाळ, पतियाळा** आणि **रामपूर** येथील संस्थानिकांस अनुक्रमें गादीजवळ नेलें. अंडर सेक्रेटरी व दुसरे सेक्रेटरी हातांत **स्टार आफ इंडियाचा** चांद घेऊन पुढें उभे होते. व **फारेन सेक्रेटरी** उजवे बाजूस उभे होते. **व्हाइसराय** साहेबांनीं उभें राहून चारही संस्थानिकांस इंग्रजींत सांगितलें कीं, '**महाराणी** सरकारांनीं आपणांस **नाइटची** पदवी दिली आहे. त्यांच्याच हुकुमानें मी आपणांस हा परम सन्मान्य चांद देतो.' नंतर त्यांणीं या **आर्डरचा** पट्टा त्यांच्या गळयांत घातला व चांद त्यांच्या हातांत दिले. **सेक्रेटरींनीं व्हाइसराय** साहेबांचें बोलणें हिंदुस्थानींत समजून सांगितल्यावर **कमांडर—इन्—चीफ** साहेबांनीं त्यांना त्यांच्या त्यांच्या जागेवर बसविलें. नंतर **गव्हरनर जनरल** साहेबांनीं पुनः उभें राहून

प्रत्येक संस्थानिकास **स्टार आफ इंडिया** मिळाल्याबद्दल आनंद झाल्याचें बोलून ते ह्मणाले कीं, 'आपणांस **स्टार आफ इंडियाचीं** चिन्हें देऊन **राणी** सरकारच्या हुकुमाची मीं बजावणी केली आहे. या परमपूज्य **आर्डरमध्यें** आपण आलां याबद्दल मला फार आनंद वाटतो. ही **आर्डर** हिंदुस्थानांतील राजेरजवाडे, संस्थानिक व इतर लोक यांच्याविषयीं प्रेमभाव व्यक्तपणें दाखविण्याकरितांच व **हिंदुस्थानांतील ब्रिटिश** राज्याचें स्वामित्व आपल्याकडे घेण्याच्या स्मारकादाखल उत्पन्न केली असल्याचें **महाराणी** सरकारांनीं सांगितलें आहे. व हा राज्यकारभार आपल्या हातीं घेतल्याबद्दल आज तीन वर्षांपूर्वी याच दिवशीं व याच स्थळीं जाहिरनाम्यानें प्रगट केलें होतें. ही **आर्डर,** बादशाही रीतीस अनुसरून, ढळढळीत व्यक्त झालेल्या गुणांचें चीज **महाराणी** सरकारांस करितां यावें ह्मणून उत्पन्न केली आहे. **महाराणी** सरकारची अशी इच्छा होती कीं, या संबंधानें त्यांचे हुकूम बजावण्याच्या कामांत जेणेंकरून आपल्याविषयींचें त्यांचें प्रेम उघडपणें व्यक्त होईल व या परमपूज्य **आर्डरचा** होईल तितका बहुमान होईल अशा कोणत्याही गोष्टी करण्याचें बाकी ठेवूं नये. आपली राजनिष्ठा, एकनिष्ठपणा व उत्तम प्रकारच्या नोकऱ्या, यांच्या योगानें **राणी** सरकारची आपल्यावर अशी मेहेरबानी होण्यास आपण पात्र झालां आहांत. आपल्याहातून या थोर **आर्डरची** योग्यता कायम राखण्यांत कोणच्याही तऱ्हेनें कसर होणार नाहीं अशी माझी खात्री आहे. व त्यांतही आपणांस या **आर्डरमध्यें** प्रथमतःच निवडून बहुमान मिळाला असल्याकारणानें आपण आपल्या देशबांधवांस **हिंदुस्थानांतील** मांडलिक व **इंग्लंडांतील** सार्वभौम सरकार यांच्यामध्यें असणाऱ्या स्नेहभावाचीं ढळढळीत उदाहरणें होणार आहां.'

हें संभाषण **सेक्रेटरींनीं** सर्व मंडळीस समजवून दिलें. नंतर **व्हाइसराय** साहेब प्रत्येक संस्थानिकाजवळ अनुक्रमानें स्वतः जाऊन त्यांच्याशीं "शेकह्यांड" करून ते आपल्या डेऱ्यांत गेल्यावर तोफांची सलामी झडली.

त्याच दिवशीं संध्याकाळीं आह्मीं पुनः निमंत्रण आल्यावरून **व्हाइसराय** साहेबांच्या डेऱ्यावर जाऊन तेथें दारूकाम पाहिलें. त्यांत तऱ्हेदार फुलें, पानें वगैरे, माणीक, पाच, पुष्कराज व हिरे याप्रमाणें दाखविलीं गेलीं होतीं. तारीख २ रोजीं लार्ड **क्यानिंग** साहेब **बंगाल्या**कडे रवाना झाले व इतर राजे लोक आपापल्या संस्थानीं गेले.

**स्टार आफ इंडिया** चांदाचे तीन तुकडे असतात. प्रथम एक सोन्याचा, सूर्याप्रमाणें हिरे जडविलेला तुकडा असतो त्यांत इंग्रजींत "हेव्हन्स लाइट अवर गाइड" (आह्मांस मार्ग दाखविणारी स्वर्गीची जोतच) अशीं अक्षरें असतात. दुसऱ्या तुकड्यांत एक **राणी** सरकारची तसबीर, तांबूस दगडावर खोदलेली फितीस लटकाविलेली असते. व तिसऱ्या तुकड्यांत एक सोन्याचा हार असून त्यावर मिन्याच्या कामांत **राणी** सरकारचें राजचिन्ह फारच सुंदर व कुशलतेनें बनविलेलें असतें. हे तिन्ही तुकडे पूर्वीच ठरल्याप्रमाणें **शिकंदर बेगम** साहेब मरण पावल्यावर तारीख ३ नवंबर १८६८ रोजीं **सिहोर** येथील **पोलिटिकल एजंट** यांच्याकडे पाठविले गेले.

**स्टार आफ इंडिया** पदवी मिळाल्यावर **शिकंदर बेगम** साहेबांनीं त्या चांदा बरोबरची तसबीर जिवंत मनुष्याची असल्यामुळें ती गळ्यांत घालावी न घालावी याविषयीं मोठमोठ्या विद्वानांस शास्त्रार्थ विचारिला. दरबारचे काजी **शेख झैनुल अबदीन** अरब यांनीं सांगितलें कीं, बायकांनीं सोन्या रुप्याचे दागिने घालणें शास्त्रसंमत आहे, परंतु दागिन्यांत राजे किंवा इतर लोकांच्या तसबिरा असल्यानें प्रार्थनेस व्यत्यय येतो. 'दुरा मुखत्यार' ग्रंथांत लिहिलें आहे कीं, शिक्क्यावर मनुष्यांच्या किंवा पक्ष्यांच्या तसबिरा खोदणें गैर आहे परंतु बायकांनीं जिवंत प्राण्यांच्या तसबिरा त्यांची पूजा किंवा प्रार्थना न करितां धारण केल्यास कांहीं प्रत्यवाय किंवा दोष नाहीं.

'बहार राईक' आणि 'फतवाई इब्रामशाही' या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, प्रार्थनेच्या वेळीं जर एखाद्या मनुष्याजवळ दुरून न ओळखतां येईल

असा राजपुरुषाचा चेहरा खोदलेलें नाणें असलें तरी त्यांत दोष नाहीं. व 'फतवाई तातारखानी' आणि 'तहतबी' या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, **'अबीहरेरा'** यांच्या शिक्कयावर दोन माशा खोदलेल्या होत्या व **उमार बोरी उल्खताब** या राजाच्या कारकिर्दीत **पैगंबर ड्यानियल** यांचा शिक्का सांपडला त्यावर एक सिंह व सिंहीण एका लहान मुलास खेळवीत असलेलीं कोरलीं होतीं, तीं पाहून **उमार** राजाच्या नेत्रांतून अश्रुपात झाला व त्यानें तो शिक्का **अबी मुसाउल् अषारी** यांला दिला. **ईदनअबास** यांच्या जवळ एक आंगठी होती. तिच्या सभोंवार लहान लहान तसबिरा होत्या. या उदाहरणांवरून असें दिसतें कीं, मूर्ति खोदलेले किंवा तसबिरा असलेले दागिने किंवा आंगठ्या घालणें धर्मविरुद्ध किंवा पाखंडपणाचें आहे असें नाहीं. परंतु त्यांवर धर्मविरुद्ध मूर्ति कोरलेल्या असल्यास मात्र त्या वापरूं नयेत व सर्व मुसलमानांनीं होईल तेथवर अशा मनोभंग करणाऱ्या गोष्टींपासून दूर रहावें, ह्मणजे त्यांच्या हातून धर्मविरुद्ध गोष्टी घडणार नाहींत. मौलवी **अबदुल करीम** व इतर विद्वान लोकांचेंही असेंच मत आहे.

दरबार होण्यापूर्वीं **बेगम** साहेबांनीं **हिंदुस्थानां**तील मोठमोठीं शहरें पहाण्यास जाण्याविषयीं **गव्हरनर जनरल** साहेबांस विचारिल्यावरून त्यांनीं त्याविषयीं परवानगी देऊन त्या त्या शहरांतील अम्मलदारांस नबाब **बेगम** साहेब यांचा त्यांच्या योग्यतेनुरूप योग्य बंदोबस्त व मान मरातब ठेवण्याविषयीं लिहिलें. त्याप्रमाणें तारीख १ जमादिलावल सन् १२८७ रोजीं, त्या **अलाहाबादेहून** निघून तारीख ८ रोजीं **बनारस** येथें पोहोंचल्या. तेथें राजा **ईसरीप्रसाद नारायणसिंग, रामनगरवाले;** ज्यांस **काशीचे महाराज** असें ह्मणतात त्यांच्याशीं भेटी व परतभेटी वगैरे झाल्या. त्यांचें आदरातिथ्य व प्रेम पाहून **बेगम** साहेबांस फार आनंद झाला.

**बनारस**ची लोकसंख्या फार मोठी असून हिंदुलोकांच्या मतें तें शहर फारच पवित्र आहे. परंतु तेथील हवा चांगली नाहीं. हिंदुलोक गंगेंत

प्रेतें टाकण्यांत मोठें पुण्य समजतात. तीं तेथेंच सडतात व गांवांतील सर्व मोऱ्यांचें पाणी नदींतच सुटलें असल्यामुळें मूळची पाण्याची स्वच्छता अगदीं नाहींशी होऊन त्यामुळें शहरांत सांथीचे ज्वर उत्पन्न होतात.

आह्मी तारीख चौदा रोजीं **बनारसेहून** निघून तारीख १७ रोजीं **जोनपुरास** आलों. **खान खानान बहिराम खान** याचा गुलाम, **फाहीम** यानें येथील नदीस फार मजबूत व मोठा पूल बांधिला आहे. 'सनत् मुस्तकीम' किंवा अखंड पूल या शब्दांवरून या पुलाची तारीख निघते. येथून निघून तारीख २६ रोजीं **औध** प्रांतांतील **फैजाबाद** शहरीं पोहोंचलों. हें शहर **सरयु** किंवा **गोग्रा** नदीच्या तीरीं आहे. या नदीचें पाणी फार चांगलें असून तींत मासे पुष्कळ आहेत. नदीचें पात्र फार खोल व रुंद आहे. हें शहर मध्यम प्रतीचें असून, हिंदुलोक त्यास फार पवित्र मानतात. येथून **लखनौस** जाण्यास निघालों. वाटेंत **दर्याबाद** येथें **सय्यद अमीर अल्ली** याच्या थडग्यावर प्रार्थना केली, व त्यानें धर्मकार्याकरितां कसा प्राण दिला त्याची माहिती करून घेतली. त्याची खरी हकीकत येणेंप्रमाणें आहे. फार प्राचीन काळापासून **अयोध्या** शहर हिंदुधर्मसंस्थापक **श्रीरामचंद्र** यांच्या वंशांतील राजांची राजधानी होतें. सन् ९१३ सालीं सय्यद **मुसा आष्कन** यानें **जहीर उद्दीन बाबर** बादशहाच्या हुकुमानें येथील राजवाड्याच्या भिंती व **सीते**ची पाकशाळा पाडून त्या ठिकाणीं एक मशीद बांधिली. तिची तारीख "खैरबाकी" या शब्दांवरून निघते. या शहरांतच **रामचंद्राचा** स्नेही **हनुमान** याचेंही एक देऊळ होतें. तें **मोहीउद्दीन औरंगजेब अलमगीर** बादशहा यानें पाडून, तेथें एक मशीद बांधिली. या दोन्ही मशीदी बांधून पुष्कळ दिवस झाले असल्यामुळें त्या जीर्ण झाल्या होत्या. **औध** येथील एक मोठा जमीदार राजा **दर्शनसिंग** यानें **बाबरच्या** वेळच्या मशीदीभोंवतीं कोट बांधून त्याला **हनुमानगढी** असें नांव दिलें व त्या ठिकाणीं बैरागी लोक ठेविले. त्यांनीं मशीदीची सर्व निशाणी हळू हळू नाहींशी करून त्या जागीं एक देऊळ

बांधिलें. त्यावरून गरीब बिचारे मुसलमान लोक एकत्र झाले परंतु बैराग्यांनीं **फैजाबाद** येथील कामगारांच्या सहाय्यानें त्या मुसलमानांवर हल्ला करून त्यांस मारून टाकिलें. व त्यांतील मुख्य मुख्य हिंदु महंतांनीं **लखनौ**चे बादशहा **वाजीदअल्लीशहा** यांचे वजीर नवाब **अल्ली नक्कीखान** व दिवाण **राजा बालकृष्ण** यांच्याशीं संधान बांधल्यामुळें हिंदुलोकांस कांहीं शिक्षा झाली नाहीं. यावरून **सय्यद अमीरअल्ली** यानें सूड उगविण्याचा निश्चय केला. त्याला पुष्कळ मुसलमान लोक मिळाले. त्यावरून **लखनौ** शहरांत गडबड होऊन गेली. व **वजीराच्या** सांगण्यावरून शहरांतील वजनदार गृहस्थांनीं पुष्कळ लोकांस **सय्यद अमीर अल्ली** याच्या पक्षांतून फोडिलें. तरी तो ४९० लोकांनिशीं **फैजाबादे**स चालता झाला. त्यावरून **वजीरानें बादशहाच्या** नौकरींत असलेला कपतान **बार्लो** साहेब याजबरोबर पुष्कळ फौज देऊन त्याच्यावर पाठविलें. तारीख २६ सफर सन १२७२ रोजीं **शुजाई** जवळील मैदानांत कपतान **बार्लो** यांनीं **सय्यद अमीर अल्ली** याजवर हल्ला केला. त्यांत **सय्यद अमीर अल्ली** व त्याजबरोबरचे सर्व लोक मारले गेले. याच ठिकाणीं पूर्वीं **साले** व **मसूदगाजी** यांची हिंदुलोकांबरोबर जबर लढाई झाली होती. पुढें तीन महिन्यांतच तारीख २६ जमादिलावल रोजीं हिंदुस्थान सरकारांनीं **औध**च्या राजास त्याच्या आळशी व अव्यवस्थित स्वभावाबद्दल पदच्युत करून **औधचें** राज्य खालसा करून त्याला सालीना नेमणूक करून दिली.

तारीख ६ जमादिलावल रोजीं आह्मीं सुखरूपपणें **लखनौ** येथें पोहोंचून बादशहाबागेंत तळ दिला. इंग्रजी अम्मलदारांनीं आह्मांस सामोरें येऊन शिरस्त्याप्रमाणें सर्व सलामीचा वगैरे बंदोबस्त ठेविला होता. बंडाच्या सालीं येथील लोकांचा सूड उगविण्याकरितां इंग्रज सरकारांनीं बहुतेक निम्में शहर उद्ध्वस्त करून मोठमोठ्या इमारती पाडून टाकिल्या होत्या. तरी हल्लीं अशा वैराण स्थितींतही हें शहर फार विस्तीर्ण अ-

सून येथील इमारती सुंदर आहेत व बाजारही चांगले असून सर्व जातीचा व सर्व ठिकाणचा माल येथें चांगला व पुष्कळ मिळतो.

या ठिकाणीं आह्मीं बादशाही इमारती पाहिल्या. त्या पाहून आह्मांस बरेंच वाईट वाटलें. त्यांची थोडीशी हकीकत पुढें दिली आहे.

१ **बादशहाबाग**—येथेंच आह्मी उतरलों होतों. ही जागा चांगली लांब रुंद असून ऐषआराम व सुखोपभोगाकरितां आहे. येथें एक संगमरवरी बारद्वारी इतकी प्रमाणांत व सुंदर बांधली आहे व तिच्यावरील नकशी, रंगी बेरंगी इतकी हुबेहूब केली आहे कीं, ती अस्सल गुलाबाच्या फुलपत्तीसही मागें सारिते.

२ **बाजीदअलीशहा** यांनीं बांधलेली **केसरबाग,** ही फार विस्तीर्ण व अद्वितीय आहे. तिच्यांत नाना तऱ्हेचीं व रंगांचीं फळझाडें व फुलझाडें असून मोठमोठ्या सोनेरी शिखरांच्या इमारती या जाग्यांत बांधिल्या आहेत. त्यांच्या दारांवर व भिंतींवर नाना तऱ्हेचीं चित्रें काढलीं आहेत. तीं आपणांस काढणाऱ्या चिताऱ्याबद्दल जणों शोकच करीत आहेतसें दिसतें. या बागेंत आह्मी फार वेळ राहिलों. सुमारें प्रहरभर आनंदानें फिरलों तरी बागेचा एक चौथा हिस्साच पाहण्यांत आला.

३ **हुसेनाबाद** हा **महंमद अल्लीशहा** यांनीं बांधिलेला एक सुंदर व संगमरवरी इमामवाडा आहे. त्यांत एक सोन्याचा व एक रुप्याचा असे दोन ताजिये आहेत. त्यांस लखनौचे लोक जरी ताजिये असें ह्मणतात. तेथें गालीचे व कांचेचीं झुंबरें पुष्कळ आहेत. याच्या दरवाज्यासमोर एक मोठा तलाव असून त्यांत खऱ्या घोड्यायेवढा घोडा असलेली एक नाव आहे. याचा दरवाजा भव्य असून तेथें एक संगमरवरी ऊन पाण्याची सुंदर नाहाणी आहे. या इमामवाड्याचें काम, नबाब **महसन उद्दवला गाजी उद्दीन हैदर** याच्या नातवाचा भाऊ **अहसन उद्दवला** याच्याकडे आहे. आह्मी येणार असें ऐकून त्यांनीं स्वतः हजर होऊन आमचें चांगलें आदरातिथ्य ठेविलें व परत जाते वेळीं आह्मांस विड्याचे व जरीचे हार दिले.

४ चांगले विद्वान् सुनी मुसलमान लोक राहतात त्या भागास **फरंगी महाल** असें नांव आहे. त्या ठिकाणीं मौलवी **अबदूल हकीम** यांच्याशीं ओळख करून घेतली. ते चांगले विद्वान् योग्य व विचक्षण असल्याचें दिसून आलें.

५ **मार्टिनेर** या जागेबद्दल आह्मीं पुष्कळ तारीफ ऐकिली होती परंतु ती जागा प्रत्यक्ष पाहून आह्मांस तिच्यांत कांहीं विशेष वाटलें नाहीं. तेथें कांहीं झुंबरें व उत्तम इंग्रजी गालीचे वगैरे सामान पाहण्यांत आलें.

६ माजी नबाब **असफ उद्दवला** यांनीं बांधिलेली **इमामवाडा मशीद** व **रूमी दरवाजा** आह्मीं पाहिला. या दोन्ही जागा आह्मांस वाटत होत्या तशा आढळून आल्या. अशा तऱ्हेचीं वीटचुन्याचीं दांडगीं व मजबूद कामें सर्व **हिंदुस्थानां**त क्वचितच सांपडतील.

या ठिकाणीं **गोमतीचें** पात्र बरेंच रुंद परंतु उथळ आहे. तिचें पाणी हलकें, पाचक व मधुर आहे. या ठिकाणीं निरनिराळ्या तऱ्हेच्या शेंकडों नावा फिरत असून एक लोखंडी पूल बांधलेला आहे.

७ **छतर मंजल** ही एक पाहण्याजोगी सुंदर इमारत असून तिला सोन्याचे कळस आहेत. व तिच्या दारावर व भिंतींवर चित्रें काढलेलीं आहेत.

८ सरकारी बाग फार मोठी असून तिच्यांत तऱ्हेतऱ्हेचीं इंग्रजी फळझाडें व फुलझाडें आहेत व एका मोठ्या इमारतींत शेंकडों सुंदर सुंदर पक्षी व क्वचित् पाहण्यांत येणारे पशुही ठेविले आहेत.

पूर्वीं **अयोध्येच्या** नबाबाजवळ असून हल्लीं आमच्याजवळ नौकरीस असलेला **खुरषेद** यानें सांगितलें कीं, वर लिहिलेल्या इमारतींशिवाय आणखीही पाहण्यालायक इमारती आहेत त्या येणेंप्रमाणेः—केसर फरतबक्ष, दिलखुषा, दिलआराम, दौलतपुरा, मूसाबाग, आल्यासबाग, महसन उद्दवला व मनवर उद्दवला यांचे बगीचे, अमीर उद्दवला व रोषन उद्दवला यांचे वाडे, नबाब यामीन उद्दवला सादत अलीखान याचा मुकबरा, मका दरजी याचा बगीचा, ऐषबाग, हजरत आबास यांचा नमूनादर्गा,

नजब अश्राफ यांचा शबीया, खुदाबक्षखान यांचा दर्गा, व आषकअल्ली व अजमु अल्लाखान यांचे दर्गे. आह्मांस वेळ थोडा असून **अकबराबाद** किंवा **आग्राशहर** पाहण्याची घाई असल्यामुळें आह्मी तारीख १२ जमा-दिलाखर रोजीं **लखनौहून** निघून तारीख १६ रोजीं **गंगाकिनाऱ्यावर कानपुरास** आलों.

**कानपूर** येथील मुख्य मुख्य अंमलदारांनीं तेथील नावांचा पूल दुरुस्त करून ते आह्मांस सामोरे आले. आह्मीं सर्व लोकांनिशीं सुखरूप नदी उतरून कवायतीच्या मैदानांत तळ दिला. प्रथम दिवशीं आह्मीं येथील कालवा पाहिला. हा **गंगेच्या** कालव्याचा एक फांटा आहे. कालव्यावरील लोकांनीं, कालव्यांत पाणी चालू करणें किंवा बंद करण्याकरितां दरवाजे उघडून नावा वर खालीं कशा जातात येतात तें व पाणचक्क्यांस पाणी कसें सोडिलें जातें वगैरे सर्व गोष्टींची माहिती करून दिली. हीं सर्व कामें फार जलद व अचूक केलीं जातात. पाण्याचा मनास वाटेल तसा यांत्रिक उपयोग करून घेणें हेंही विलक्षण आश्चर्याचें काम आहे. या लोकांस आह्मीं थोडेंसें बक्षीस देऊन संतुष्ट केलें. **कानपूर** येथील पुष्कळ गृहस्थांनीं आह्मांस फार आग्रहानें निमंत्रणें केलीं, परंतु **निजामी** छापखान्याचे व्यवस्थापक **अबदूल रहिमानखानशकर** यांचा आमचा फार दिवसांचा परिचय असल्यामुळें त्यांचें निमंत्रण मात्र मान्य केलें. दुसरे दिवशीं एक दरबार झाला. त्यांत सर्व सरकारी कामगार व सभ्य गृहस्थ हजर होते. त्यांना **बेगम** साहेबांनीं बहुमान केल्याबद्दल फार आनंद वाटला. दरबार आठ वाजल्यापासून अकरा वाजेपर्यंत होऊन शेवटीं अत्तरपान वगैरे दिलें गेलें. तिसरे प्रहरीं निमाज पढल्यावर तेथून कूच करून मजल दरमजल **अकबराबाद** येथें तारीख ३ रजब रोजीं पोहोंचलों व नूर आफशान् बागांत उतरून थोडासा उपहार केला. हा बाग **नुरुद्दीन जाहांगीर** बादशहाची बायको **नूरजहान बेगम** इचा होता. हल्लीं या ठिकाणीं पक्के रस्ते व दोन तीन हौद यांशिवाय एकही इमारत

नाहीं. **नूरजहान** इचें नांव इतकें प्रसिद्ध आहे कीं, तिची थोडीशी हकीगत या ठिकाणीं देणें वावगें होणार नाहीं.

**अकबर** बादशहाच्या पदरीं **ख्वाजा घियास** नांवाचा एक मनुष्य होता. त्याची मुलगी **मेहरुन्निसा** ही फारच सुंदर अप्सरेप्रमाणें होती. **ख्वाजानें बंगाल**च्या सुभ्यांतील **बरद्वान**चा जहागीरदार **अलीकुलीखान** याजबरोबर तिचें लग्न केलें होतें. **जहांगीर** यानें लहान असतांनाच या लावण्यवतीस कुवारपणीं पाहून, तो तिजवर एकदम मोहित होऊन गेला होता. परंतु ही गोष्ट त्यानें अगदीं मनांत ठेविली. तारीख २० जमादिलाखर सन् १०१४ रोजीं तो गादीवर बसल्यावर त्यानें **मेहरुन्नीसा**चा नवरा **अलीकुलीखान** याला गुप्तपणें मारून टाकविण्याचा विचार करून त्याजला त्यानें **बरद्वाना**हून हुजूर बोलाविलें. तो **इराण**चा राहणारा असून फार बळकट व शूर होता. एके दिवशीं **बादशहानें** एक बुभुक्षित दांडगा व भयंकर वाघ मोकळा सोडून, **अलीकुलीखाना**स तरवार किंवा तीरकमट्याशिवाय त्याच्याशीं सामना करण्यास सांगितलें. तेव्हां **खानानें** मोठ्या शौर्यानें सामना करून त्या वाघास जंबियानें मारिलें. त्यावरून **बादशहानें** फार संतोष झालासें दाखवून त्याला **शेरअफगाणखान** हा किताब दिला. परंतु पुढें पूर्वींच ठरल्याप्रमाणें एका माहुतानें आपला मस्त हत्ती त्याच्या अंगावर घातला. या वेळींही **खानानें** हत्तीस तरवारीनें मारून आपली सुटका करून घेतली. आणि रजा घेऊन तो **बरद्वानास** निघून गेला. सन १०१५ सालीं **बादशहानें** **कुतुबुद्दीनखान** याला वरकांती **बंगाल**चा सुभेदार नेमिलें. परंतु वास्तविकपणें त्यानें त्याला **शेरअफगाणखान** याला कशाही रीतीनें मारून टाकण्याकरितांच पाठविलें होतें. त्यावरून त्यानें आपल्या बरोबर कांहीं शूर लोक घेऊन **शेरअफगाणखान** याच्या भेटीस जाऊन त्याच्याशीं बोलणें चालणें लाविलें. या सुमारास तेथें दंगा होऊन **शेरअफगाणखान** व **कुतुबुद्दीन** वगैरे बरेच लोक मारले गेले.

ही गोष्ट **बादशहानें** ऐकतांच त्यानें **मेहरउन्निसा** हिला बोला-

वून घेऊन तिला **अशरफ्उन्निसा** असा किताब देऊन तिच्याशीं लग्न केलें. व तिजवर तो इतका मोहित झाला कीं, त्यानें सर्व राज्यकारभार तिच्या स्वाधीन केला. तो येथवर कीं, **बादशाही** हुकुमावर सुद्धां तिच्याच नांवाचे शिक्के होऊं लागले. तिच्या शिक्क्यावर "**नूरजहान** गष्त बफजलअल्ला हमदन व हमरा जहांगीरशहा" अशीं अक्षरें होतीं व **जहांगीर**च्या नाण्यावर एका बाजूस **नूरजहान** व **जहांगीर** यांच्या प्रतिमा असून दुसऱ्या बाजूस "बहुकुम शहाजहांगीर यफ्त सज्जेवर बनाम नूरजहान पादशहा बेगमजर" हीं अक्षरें होतीं. **नूरजहान** हिचा बाप **ख्वाजा घियास** याची बढती करून त्याला वजीरी दिली व त्याचा भाऊ **मिरझा अबुल हसन** यास **यामुनउद्दवला असफखान** ही पदवी दिली. व **असफखाना**ची मुलगी **अरजमंदबानू** इचें **शहाजहान** याच्याशीं लग्न केलें. इलाच **मुमताजमहाल** ह्मणतात. तिच्यावर **आग्र्याचा ताजमहाल** बांधलेला आहे. सन् १०९९ सालीं **नूरजहान बेगम लाहोर** येथें मृत्यु पावली. तिची कबर **लाहोर** येथील **शालिमार** बगीच्यांत **जहांगीर** बादशहाच्या कबरीजवळच आहे.

**अकबराबाद** या शहराचें पूर्वीचें नांव **आग्रा** असें होतें. या शब्दाचा अर्थ युनानी भाषेंत, किल्ला, असा होतो. **यमुने**च्या कांठीं किल्ला आहे तो **अकबर** बादशहानें बांधिला. इंग्रजांनीं तेथें बंदुका, तोफा, पिस्तुलें, गोळे वगैरे लढाईचें सामान फार व्यवस्थेनें ठेविलें आहे. या शहरांत आह्मी एक आठवडाभर राहिलों. तेथें ताज गंजांतील कबर व बगीचा अप्रतिम आहे. त्याचें जितकें वर्णन करावें तितकें थोडेंच. याच्या दरवाज्यावर 'सुरत व अल्फजार' हें **तोगरी** लिपींत कोरलें आहे. त्याचें सौंदर्य चांगलें ध्यानांत येण्यास तीं प्रत्यक्ष पाहिलींच पाहिजेत. बगीचा ४० बिघ्यांचा असून त्यांतील रस्ते संगमरवरी आहेत. व त्यांत एक मोठा तलाव पाण्यानें गच्च भरलेला असून त्यांत १२० कारंजीं आहेत. तलावाच्या पश्चिम बाजूस एक भव्य मशीद आहे व तिच्या मुकाबल्यास पूर्व बाजूस अशीच एक मशीद आहे. तिला '**दरबार आम**'

असें ह्मणतात. ती फार प्रमाणशीर असून सुंदर आहे. व तिला मोठमोठे मनोरे आहेत. खुद्द मशीदीची इमारत अष्टपैलू असून संगमरवराची आहे. तिच्या प्रत्येक कोनावर एकेक मनोरा असून मध्यभागीं एक भव्य घुमट आहे. मशीदीच्या आंतल्या अंगास चार लहान व चार मोठीं दालनें असून मध्यभागीं एक मोठी समचौरस कोठडी आहे. दरवाजावर व भिंतीवर आंतून व बाहेरून रंगी बेरंगी गारांनीं बनविलेलीं नकशीदार वेल व फुलें आहेत. **कुराणां**तील कविता इतक्या सुंदर रीतीनें वठविलेल्या आहेत कीं, त्याचें वर्णन करितां येत नाहीं. थडग्याच्या वरील शिळांवर निरनिराळ्या रंगांचे दगड बसवून नकशीदार काम केलें आहे. खरीं थडगीं भुयारांत असून एक **मुमताजमहाल** इचें व दुसरें **शहाजहान** बादशहाचें आहे. त्यांच्यावरील शिळांवर पुढील मजकूर खोदला आहे:—'हें पवित्र व प्रसिद्ध थडगें अति प्रसिद्ध व दैवशाली स्वर्गवासी **शहाजहान** बादशहा गाजी याचें आहे. हें चिरकालपर्यंत पवित्र मानलें जावो. व तो चिरकालपर्यंत स्वर्गसुखाचा उपभोग घेवो. तारीख २६ रजब सन् १०७६ रोजीं रात्रौ, तो, या नश्वर जीविताचा त्याग करून अक्षय्य सुख उपभोगण्यास स्वर्गास गेला.'

यानंतर आह्मी किल्ल्यांत गेलों व तेथील दिवाण आम, दिवाण खास, तक्त गाहमसामन, किंवा अष्टपैलू बुरूज, मोतीमशीद, चक्रव्यूह, खुषा, व सोशनमहाल, शीसामहाल, आरसेमहाल, व जनान्याचा बगीचा, हीं स्थळें पाहिलीं. तीं सर्व संगमरवरी व लाल पत्थरांचीं बांधलीं आहेत. सर्दखाना किंवा वसंतगृह याच्या दरवाज्यावर व भिंतीवर पूर्वीं हिरे जडलेले होते. परंतु हल्लीं त्या ठिकाणीं त्याचे नुसते खड्डे मात्र आहेत. **भरतपूरचा सुरजमल्ल जाट** या ठिकाणीं राहिल्या वेळीं त्याच्या शिपायांनीं हे हिरे काढून घेतले, असें सांगतात. मोती मशीदीचें सौंदर्य व रचना आश्चर्यकारक व अवर्णनीय आहे. तेथून आह्मी **शिकंदरा**बागेंत गेलों. हा बगीचा आग्र्याहून ६ मैल असून याचा एकंदर विस्तार २८४ बिघे आहे. त्याच्या सभोंवार बारा गज उंचीचा कोट आहे. तो वीट चु-

त्याचा असून त्याच्या प्रत्येक कोपऱ्यास उंच बुरूज आहेत. बागांतील रस्ते ६० फूट रुंद असून त्यांवर लाल फत्तरांची फरसबंदी आहे. व प्रत्येक तुकड्यांत निरनिराळा पाण्याचा नहर आहे. बागेच्या मध्यभागीं **अकबर** बादशहाची कबर असून तिच्या पुढें एक मोठा तलाव आहे. ही कबर फार सुंदर व मजबूत अशी असून ती लाल फत्थर, संगमरवर, कुरुंद, काळा व हिरवा फत्तर यांची बांधलेली आहे. घुमट अष्टपैलू असून आंतील व बाहेरील दिवालीवर धर्मग्रंथांतील वाक्यें कोरलेलीं आहेत व दरवाज्यांवर फारशींत कविता कोरलेल्या आहेत.

ताजगंजांतील कबरीप्रमाणें या कबरींतही वरील मजल्यांत दर्शनीं थडगें असून खरें थडगें खालीं भुयारांत आहे. तेथें **अकबर** बादशहाच्या थडग्याशिवाय **आराम बेगम, शकुन्निसा बेगम, असालतबानू** व **अकबराची** मुलगी **शहाजादाखानम्** व त्याची बायको **रबियासुलतान बेगम** यांचींही थडगीं असून शिवाय **सुलेमानशेखोचें** व आणखीही बरींच गैरमाहित अशीं थडगीं आहेत.

**आग्रा** शहर पाहून झाल्यानंतर तेथून ता० ९ रज्जब रोजीं निघून ११ तारखेस **मथुरेस** मुक्काम केला. तेथें आह्मीं शेंकडों देवालयें पाहिलीं, त्यांत **मणिराम शेट** याचें देवालय सर्वांत पसंत वाटलें. या देवळावरील कोरींव काम फारच उत्तम असून एकाद्या कलमांनीं काढल्यासारखें साफ आहे. **वृंदावन** येथील देवालयाचें कामही याच प्रकारचें आहे. आमच्या गाड्या येऊन पोहोंचल्या तों **मणिराम शेट** यांचे गुमास्ते हजर होते. त्यांनीं आह्मांस सर्व देवालय दाखविलें. या देवालयाचें महाद्वार फार भव्य आहे. दरवाज्यावर व भिंतीवर गाई, वाघ, माकडें, पुरुष, बायका, साप, मासे वगैरे आकृतींच्या देवतांचीं चित्रें काढलीं आहेत. व देवळाच्या आवारांत एक मोठा बगीच्या चांगल्या सुंदर रीतीनें तयार ठेवला आहे. यांत हौद व कारंजीं चांगलीं शोभिवंत व पुष्कळ आहेत. एक नहर काढून लहानशा तलावांत नेला आहे. त्याच्या सभोंवार लहान लहान संगमरवरी कमानी आहेत. हें स्थळ पाहून परत येत अस-

तांना वाटेंत एका रथावर एक काळी मूर्ति बसवून पुष्कळ लोक गात नाचत ओढून नेत असलेली आढळली. त्या देवाच्या दोन्ही बाजूंस दोन ब्राह्मण चालत होते. एकाच्या हातीं छत्र व दुसऱ्याच्या हातीं चवरी होती. यावरून आह्मी समजलों कीं, ही देवाची स्वारी बगीच्यांत हवा खाण्यास काढलेली असावी. छत्र थोडेंसें बाजूस करा ह्मणजे देवाचें तोंड आह्मांस नीट दिसेल असें कोणीं त्यांस सांगितलें, तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, देवास ऊन लागेल. पुढें त्यांनीं रथ उभा करून आमच्याजवळ देवाकरितां दक्षिणा मागितली. त्यावर **शिकंदर बेगम** साहेबांनीं जबाब दिला कीं, गांवच्या रहिवाशांनीं पाहुण्याचा आदरसत्कार करण्याची चाल आहे. तेव्हां तुमच्या देवानेंच आह्मांस कांहींतरी देणें योग्य आहे. नंतर आह्मी तेथून निघालों. ते तारीख २० रोजीं **शहाजहानाबाद** किंवा **दिल्ली** येथें पोहोंचलों. हें शहर प्राचीन काळापासून **हिंदुस्थान**ची राजधानी होतें. व त्याचा तपशीलवार इतिहास **हिंदुस्थान**च्या इतिहासांत दिलेला आहे. हें शहर पुष्कळ वेळां आबाद व उद्वस्त झालें व त्याचीं नांवेंही पुष्कळ बदललीं. त्याचें प्रथम नांव **हस्तनापूर** असून, नंतर **दिल्ली, तघलकाबाद, शेरमंडळ,** व शेवटीं **शहाजहानाबाद** अशीं नांवें त्यास मिळालीं. शहराच्या हल्लींच्या कोटाबाहेर पूर्वीं वस्ती असल्याची निशाणी प्रत्येक बाजूस कोसों गणती दिसून येते. उदाहरणार्थ—**फरीदाबाद** हें खेडें, शहरापासून बारा कोस आहे. तेथेंही पडकीं घरें अद्यापि दिसून येतात. 'आसार अन् सनादित्' किंवा—थोर पुरुषांचीं चरित्रें या ग्रंथांत या शहरची तपशीलवार हकीकत दिली आहे. येथें सुल्तान **निजामउद्दीन** आणि **ख्वाजा नासरुद्दीन** या पीरांच्या कबरी पवित्र मानल्या जातात. व त्यांच्या आवारांतच पुष्कळ धार्मिक लोक, सत्पुरुष, आणि राजपुरुष यांचीं थडगीं आहेत. या ठिकाणीं चालीप्रमाणें प्रार्थना करून, आह्मी **झिरणी** पहाण्यास गेलों. ही एक फार मनोरम जागा आहे. तेथें एक तलाव असून त्यांत किनाऱ्यावरच्या पहाडींतून येणाऱ्या पाण्याचा धबधबा आहे. व किनाऱ्यावरच तमास-

गीर लोकांच्या सोयीकरितां एक उद्यानमंडप बांधला आहे. व आसपास उत्तम आंबराई आहे.

तेथून **ख्वाजा कुतुबुद्दीन बखत्यार काकी** याची कबर पाहण्यास गेलों. तेथें सुल्तान **शमसुद्दिन अलतमाष** यानें बांधलेल्या **कुवत् उल इसलाम** या मशीदीचा उंच मनोरा होता. हल्लीं या उंच मनोऱ्यास **कुतुब साहेबकी लाट** असें ह्मणतात. त्यावर सर्व जागीं कोरींव लेख आहेत. **दिल्लीच्या** आसपास शेंकडों राजे व सरदार लोकांच्या मशीदी गगन भेदून गेलेल्या दिसतात. त्या सर्वांत **हुमायून** बादशहा व **मनसूर अलीखान** यांच्या मशीदी चांगल्या आहेत. आह्मीं **दिल्लींतील लाल किल्ला** पाहिला. हल्लीं त्यांतील दिवाण आम, दिवाण खास, तटबंदी व बुरूज मात्र कायम आहेत. बाकी सर्वत्र दगड, वीटा, चुना यांचा अस्ताव्यस्त ढीग पडलेला नजरेस येतो. तें पाहून आह्मांस फार वाईट वाटलें. तेथून **सेलीमगड** पहाण्यास गेलों. तसेंच आगगाडीकरितां **यमुना** नदीस बांधित असलेला पूलही पाहिला. व **जिनत् उल् मस्जीद**वरून **शहाजहाना**ची **जुमा मसीद** पाहण्यास गेलों. तिचे दरवाजे बंद होते. परंतु तेथील इंग्रजी अंमलदारांनीं ते आमच्याकरितां उघडले. व आह्मीं ती जागा पाहून आपल्या मुक्कामावर परत आलों.

तारीख २७ रज्जब रोजीं आह्मी **दिल्लीहून** निघून तारीख १९ साबान रोजीं सुखरूपपणें **जयपुरास** पोहोंचलों. **जयपूरच्या** महाराजांनीं आमच्या आदरातिथ्याची अशी व्यवस्था केली कीं, आमच्या स्वारींतील हत्ती व **भोपाळचे** पोलिटिकल एजंट, शहरच्या दरवाजाशीं जाऊन पोहोंचले, तोंच २०० स्वार व पायदळाची तुकडी, हातांत रंगीत काठ्या घेतलेली व पैस पैस असें आदबीनें ह्मणत सामोरी दाखल झाली. त्यांच्या मागें **महाराजांच्या** आप्तांपैकीं ३० असामी घोड्यावर बसलेले दरवाज्याच्या दोन्ही बाजूंस हारीनें उभे राहिले होते. व दरवाज्याबाहेर गोलंदाजांनीं सलामीच्या तोफा सोडिल्या. नंतर खुद्द **महाराज** हत्तीवर हिंदुस्थानी तऱ्हेच्या सोन्याच्या हौद्यांत व **पोलिटिकल एजंट** इंग्रजी त-

ऱ्हेच्या चांदीच्या हौद्यांत बसून आले. **महाराजांच्या** अंगांत पांढरा आंगरखा व डोकीस तांबडें पागोटें होतें. गळ्यांत पाचेचा कंठा असून कंबरबंदांत जंबिया होता. व खांद्यावरून गेलेल्या पट्ट्यास तलवार लटकाविलेली होती. व दुसरी एक जडावाची तलवार त्यांच्या पुढें हौद्यांत ठेविली होती.

आमच्या इकडे नवाब **शिकंदर बेगम** व **पोलिटिकल एजंट** यांनीं आपले हत्ती पुढें सरसावून **महाराजांशीं** "शेकह्यांड" केला. नंतर चालीप्रमाणें कुशल प्रश्न झाल्यावर उभयतांची स्वारी बरोबर चालली. स्वार व पायदळ या लोकांनीं नवीन तऱ्हेप्रमाणें सलामी दिली. शिपाई व तमासगीर लोकांची अतिशय गर्दी असल्यामुळें स्वारी वाड्याकडे फारच हळू हळू चालली. या वाड्यास पुष्कळ दरवाजे व चौक आहेत. या दरवाज्यांतून आंत जातांना शिपायांनीं सलामी दिली. व स्वारी चौथ्या दरवाज्याशीं जाऊन थांबली. तेथून **महाराज** साहेब उतरून हवादारींत बसून पांचव्या दरवाज्याकडे गेले. तिकडेच ते हमेशा राहात असत. आह्मी या ठिकाणीं गेलों तों नोकर चाकर लोकांची फारच गर्दी होती. सबब **महाराजांनीं** आह्मांस एका उद्यानमंडपांत नेलें. तेथें चांदीच्या खांबाच्या डेऱ्याच्या छायेखालीं दोन खुर्च्या ठेविल्या होत्या. त्यांत एकीवर राजेसाहेब व दुसरीवर त्यांच्या उजव्या बाजूस नवाब **शिकंदर बेगम** साहेब बसल्या. व डाव्या बाजूस **भोपाळ** व **जयपूर** येथील **पोलिटिकल एजंटांच्या** खुर्च्या असून त्यांखालीं एका हारीनें **महाराजांचे** आप्त बसले होते. या दरबारांत सुमारें तीनशें नामांकित लोक होते. **जयपूरचे** दिवाण **शिवदीन** हे **महाराजांच्या** अगदीं पाठीमागें बसले होते. **बेगम** साहेबांच्या उजव्या बाजूस **भोपाळचे** कामगार व आमचे आप्त लोक बसले होते. प्रथम कांहीं गवई येऊन गाऊन गेल्यावर पंचवीस रामजण्या सुंदर पोषाख केलेल्या येऊन एक पखवाज व दोन तंबुऱ्यांच्या साथांत नाचूं लागल्या. थोड्या वेळानें **महाराजांनीं** आपल्या हातांनीं **बेगम** साहेब, उभयतां **पोलिटिकल एजंट, मीया फौजदार**

**महंमदखां**, नबाब **अमरावदुला** व **मदारउल्महाम** यांस अत्तरपान व हार दिले. व बाकीच्यांना अत्तरपान दिवाणांनीं दिल्यावर आह्मी निरोप घेऊन मुक्कामावर आलों.

दुसरे दिवशीं **महाराजांनीं** परत भेट करण्याची इच्छा दर्शविली. **रामबागें**तील उद्यानमंडपांत त्यांचा आदरसत्कार करण्याचें ठरविलें. **मदारउल्महाम** हे शहरच्या कोटापर्यंत त्यांस सामोरे गेले. व त्यांची स्वारी **रामबागे**च्या दरवाज्याजवळ येऊन पोंचतांच तोफांची सलामी झाली. आह्मीं आमच्या बरोबर तोफा आणल्या नसल्यानें महाराजांनीं आह्मांस लागतील तितक्या तोफा देण्याविषयीं तोफखान्याकडे हुकूम दिला होता. व त्यांनीं **जयपूर**च्या मोठमोठ्या जहागीरदार लोकांसही आह्मी **जयपूर**च्या राज्यांत आल्या दिवसापासून आह्मांस सलामी देण्याविषयीं हुकूम दिले असून त्याप्रमाणें आह्मांस सलामी दिली जात होती. शिवाय **महाराजांच्या** खासगी जहागीरींतून जातांनाही तेथील नोकर लोकांनीं आह्मांस सलामी दिली.

महाराजांची स्वारी **रामबागे**जवळ आल्यावर दरवाज्याशीं **हाफीज महंमद हसनखान** नायब बक्षी व हुजूर चिटणीस हे सामोरे गेले. व दुसऱ्या उद्यानमंडपाजवळ **मीया फौजदार महंमदखान** व नबाब **अमरावदूला** यांनीं त्यांचें स्वागत केलें. व नबाब **शिकंदर बेगम** यांनीं बिछायतीच्या शेवटापर्यंत सामोरे येऊन त्यांचा सन्मान केला. बाकी सर्व व्यवस्था **महाराजांच्या** दरबाराप्रमाणेंच होती. डाल्यांची व नजरनजराण्यांचीं तबकें व हत्ती, घोडे, वगैरे **महाराज** साहेबांस दिल्या. पुढें ते थोड्या वेळानें परत गेले.

गुरुवार तारीख १३ साबान रोजीं **महाराज** साहेबांनीं आमच्या स्वारींतील सर्व लोकांकरितां शिधासामान पाठविलें. व आह्मांस वाड्यांत मेजवानीस बोलाविलें. त्यावरून आह्मी एकंदर १७ असामी संध्याकाळच्या सुमारास वाड्यांत गेलों. तेथें **महाराज** साहेब भेटले नाहींत. त्यांचे वकील मात्र हजर होते. **बेगम** साहेबांनीं **महाराज**

साहेबांस सलाम सांगून पाठविला. त्यावरून त्यांजकडूनही सलाम सांगून आला. ज्या वाड्यांत मेजवानीचा थाट केला होता त्यांत एक मोठा हौद पाण्यानें तुडुंब भरलेला असून त्या हौदाच्या मध्यभागीं एका चौऱ्यावर कारंजें होतें. हौदासभोंवार कमानी होत्या. त्यांत नाच चालले होते. थोड्या वेळानें नाच बंद होऊन खान्याची तयारी झाली. व आह्मी सर्व खान्यास बसलों. एकंदर १२० निरनिराळे रुचकर, मधुर व क्षुत्बोध करणारे पदार्थ होते. या वाड्याजवळच दुसरी एक कोठडी होती तींत **जयपूर** व **भोपाळ** येथील **पोलिटिकल एजंट** यांस इंग्रजी तऱ्हेची मेजवानी चालली होती. खाना होऊन हात धुतल्यावर आह्मी एका विस्तीर्ण कोठींत दारूकाम पाहाण्यास गेलों. या ठिकाणीं खुर्च्यांच्या रांगा लागल्या असून दिवाण पंडित **शिवदीन** हे हजर होते. त्यांनीं दुरून आह्मी येत असलेले पाहून मोठ्या आदबीनें व आदरातिथ्यानें आह्मांस आमच्या जागेवर नेऊन बसविलें. या कोठीच्या समोरच एक फार मोठा तलाव आहे. त्यांत ४०।५० कारंजीं उडत होतीं. या ठिकाणीं डाल्या व नजरनजराण्यांचीं तबकें लाविलीं होतीं. नंतर दारूकाम सोडण्यास आरंभ झाला. पुढें उभयतां **पोलिटिकल एजंट, महाराजांस** भेटण्यास गेले. या दरबारांत एकंदर अजमासें २०० लोक हजर असून कळवंतिणी भरगच्ची पोषाख करून नाचत होत्या. नेहमींप्रमाणें उपचाराचें बोलणें चालणें झाल्यावर थोडा वेळ बसून आह्मी परत जाण्यास निघालों. तेव्हां **महाराजांनीं** आह्मां प्रत्येकास एकेक मुकेसाचा व फुलांचा हार विडे चालीप्रमाणें दिले. **बेगम** साहेब **महाराजांस** बोलल्या कीं ‘थोर लोकांनीं थोर लोकांस जशा आदरसत्कारानें, मानमान्यतेनें व पाहुणचारानें वागवावें त्याप्रमाणें आपण आह्मांस वागविलें. यामुळें आह्मास फार संतोष झाला आहे.’ नंतर आह्मी आपल्या गोटांत परत आलों.

दुसरे दिवशीं पंडित **शिवदीन** आमच्या दरबारांत आले व महाराजांची भेट करविण्याच्या कामांत **महाराजांच्या** भाऊबंदांनीं पुष्कळ

हरकती आणिल्या, तरी त्यांनीं मेहनत केली. कारण दोघां थोर राजे लोकांच्या स्नेहाचा काय फायदा होतो याविषयीं त्याच्या मनांत पक्की खात्री झाली होती. पुढें बंडाच्या सालीं जी व्यवस्था केली तिच्या संबंधानें व कप्तान **ईडन** साहेब यांनीं **बेगम** साहेबांची वारंवार फारच तारीफ केल्याबद्दल ते बोलत होते. **बेगम** साहेबांनीं राज्याचा वसूल किती असून फौज किती आहे ह्मणून विचारिलें. तेव्हां वीस हजार फौज असून वसूल एक कोट रुपये आहे. पैकीं तेहतीस लक्ष जहागीरदारांकडे, तेहतीस लाख धर्मादायांत, व बाकीचे चौतीस लाख सरकारी कामाकडे खर्च होत असल्याचें त्यांनीं कळविलें.

**जयपूर**ची व त्याच्या आसपासची रचना सुंदर असून तेथील इमारती मनोवेधक, रस्ते रुंद, स्वच्छ व सरळ आणि बगीचे व्यवस्थित व आनंदकारक असे आहेत. सरदार लोकांचे वाडे संगमरवरी असून त्यांची बांधणी चांगली आहे. आणि ते दिसण्यांत सुंदर व भव्य आहेत.

आह्मी ता० ११ रोजीं **जयपुराहून** निघून २४ तारखेस **अजमीरास** आलों. व **ख्वाजा मोईनुद्दीन चिस्ती** यांच्या दरग्यांत प्रार्थना केली. या दरग्यांत पुष्कळ नोकर लोक असून ते मेलेल्या लोकांविषयीं शिरस्त्याविरुद्ध अतिशय प्रार्थना करून त्या पीराच्या आत्म्यास त्रास देतात. साबान महिन्याच्या शेवटल्या तारखेस आह्मी तेथून निघून रमजानच्या १२ व्या तारखेस **नीमच**च्या छावणींत, २० व्या तारखेस **आगर**च्या छावणींत, २९ व्या तारखेस **सिहोर** एथें व सवालच्या ३ तारखेस आपल्या घरीं **भोपाळास** येऊन दाखल झालों. एकंदर सव्वासहा महिन्यांत ८३९ कोसांचा प्रवास केला. या स्वारींत मामुली खर्चाशिवाय ६८१९४ रुपयांच्या रकमा नवीन खरेदी केल्या गेल्या.

---

## भाग ६ वा.

## आग्र्याच्या स्वारीची हकीकत.

यां स्वारीची हकीकत **बेगम** साहेबांनीं लिहिली आहे ती येणेंप्रमाणें.

मेजर **हचिनसन** साहेब **पोलिटिकल एजंट भोपाळ** यांजकडून आह्मांस कळलें कीं, सन १८६३ च्या फेब्रुवारी महिन्यांत **व्हाईसराय** साहेब **आग्र्यास** जाणार असून त्या ठिकाणीं **हिंदुस्थानां**तील मोठमोठ्या राजेरजवाड्यांची भेट घेणार आहेत. त्यावरून ता० ६ जमादिलाखर स० १२७९ रोजीं, राज्यांतील कामगार, भाऊबंद, व नौकर चाकर मिळून एकंदर २४७० मनुष्यांसह **भोपाळाहून भैरस्यास** आलों. व रज्जबच्या १ ल्या तारखेस **आग्र्यास** जाण्यास निघालों, ते ४ तारखेस **सिरोंज** येथें, **गूण्या**च्या छावणीस १२ तारखेस, **शिवपुरीस** १९ तारखेस, व सोमवार ता० २८ रोजीं **ग्वाल्हेरीस** दाखल होऊन फुलबागेच्या मैदानांत उतरलों. **महाराजांचे** चौघे पहिल्या प्रतीचे सरदार आह्मांस सामोरे आले होते व **महाराजांनीं** आमच्या बरोबरच्या सर्व लोकांस शिधासामग्री देवविली.

आह्मी आल्याचें ऐकून **महाराज झांशीस** गेले होते ते परत आले. ते आमची भेट घेण्याविषयीं फार उत्सुक होते ह्मणून ता० ९ साबान रोजीं सोमवारीं सकाळीं ८ वाजतां आह्मी, १८ मुख्य मुख्य कामगार व **सिहोर** येथील **पोलिटिकल एजंट** यांस बरोबर घेऊन **महाराजांच्या** वाड्यांत गेलों. तेव्हां १९ तोफांची सलामी झाली. व **शितोळे** साहेब आमच्या गाडीपर्यंत सामोरे आले. पायदळाच्या दोन कंपन्या सलामीकरितां हजर होत्या. वाड्यांत गेल्यावर आह्मांस एका फारच सुशोभित दालनांत नेलें. त्या ठिकाणीं समोर रुप्याच्या खांबावर एक किनखापी चांदणी दिलेली होती. **महाराजांनीं** १० पावलें पुढें येऊन आमच्याशीं "शेकह्यांड" करून आह्मांस बसण्याविषयीं आग्रह केला. या दरबारांत सुमारें ९० थोर थोर गृहस्थ होते. अशा ठिकाणीं होणारें शिरस्त्याचें बोलणें चालणें झाल्यावर **महाराजांनीं** आपल्या हातानें प्रथम आह्मांस व नंतर **पोलिटिकल एजंट, मिया फौजदार, महंमदखान, नबाब मोईज महंमदखान** व **नबाब अमरावदूला** यांस अत्तर दिलें. व त्यांनीं विडे फक्त आह्मांस व **पोलिटिकल** एजंट

यास दिले. बाकीच्यांस अत्तर, विडे, हार वगैरे दिवाणांनीं दिले. नंतर दोन हातरुमाल गुलाबपाण्यांत भिजवून आणले. त्यांतून एक आह्मांस व एक **पोलिटिकल एजंटांस महाराजांनीं** दिल्यावर आह्मीं परत आलों. **महाराज** बिछायतीच्या शेवटापर्यंत आह्मांस पोंचविण्यास आले होते.

दुसरे दिवशीं ह्मणजे मंगळवार तारीख २७ जानेवारी १८६३ रोजीं **महाराजांनीं** आमच्याकडे परत भेट केली. त्या वेळीं वरप्रमाणेंच व्यवस्था ठेविली गेली व ते आले व गेले त्या वेळीं २१ तोफांची सलामी देऊन स्वार व पायदळ लोक सलामी देण्यास उभे केले होते. **महाराजां**च्या स्वारीची व्यवस्था पुढें लिहिल्याप्रमाणें होतीः—प्रथम सर्वांत पुढें बिनीचे स्वार असून त्यांमागें मेवाती पायदळ पलटणी होत्या. व त्यांच्यामागें कडाबिनिवाल्यांची एक तुकडी होती. तिच्यामागून किनखापी झुली घातलेले चांदी सोन्याचें सामान घातलेले व सुंदर सुंदर हौदे कसलेले पुष्कळसे हत्ती व कोतवालघोडे चालले होते. त्यांच्या मागें सिंहाच्या तोंडाच्या काठ्या घेतलेले चोबदार व त्यांच्या मागें जासूद लोक होते. नंतर तीरकमटेवाले, बरचीवाले, व त्यान्सरच्या तीन टोळ्या व त्यांच्या पाठीमागून चार मुख्य मुख्य सरदार असून त्यांच्या पाठीमागून खुद्द **महाराज** एका सबजा घोड्यावर बसले होते. त्यांच्या पाठीमागें त्यांच्या फौजेंतील आफिसर लाल पोषाखानिशीं होते.

तारीख १ फेब्रुवारी रोजीं आह्मी **ग्वाल्हेरीहून अकबराबादे**कडे वळलों. व मंगळवार ता० १० रोजीं तेथें पोहोंचलों. तेव्हां **आग्र्या**चे कलेक्टर आह्मांस सामोरे आले. व रीतीप्रमाणें सलामी व मानमरातब झाले. तारीख १३ रोजीं कर्नल **ड्यूरंड फारेन सेक्रेटरी** हे कांहीं मोठमोठ्या कामगारांनिशीं **व्हाईसराय** साहेबांकडून आमच्या भेटीस आले. व त्यांच्या वतीं आह्मांस कुशल प्रश्न व आमच्या प्रकृतीची हालअहवाल वगैरे विचारून थोडा वेळ राहून अत्तर, पान वगैरे शिरस्त्याप्रमाणें दिल्यावर ते परत गेले.

सोमवार ता० १६ फेब्रुवारी रोजीं आह्मी ८ सरदार, भाईबंद व कामगार यांसह हत्तीवर स्वार होऊन **व्हाईसराय** साहेबांच्या खासगी दरबारास गेलों. **व्हाईसराय** साहेबांचे एक सेक्रेटरी व एक एडिक्यांप व **भोपाळचे पोलिटिकल एजंट** हे छावणीच्या हद्दीपासून ९०० कदम सामोरे आले. आणि **कर्नल** ड्यूरंड व **मीड** हे छावणीच्या रस्त्याच्या शेवटापर्यंत सामोरे आले. तेव्हां १९ तोफांची सलामी झाली. **गव्हर्नर जनरल** साहेब आह्मांस बिछायतीच्या शेवटापर्यंत सामोरे आले. **फारेन सेक्रेटरी** आह्मांस ह्मणाले कीं, **गव्हर्नर जनरल** साहेबांनीं आह्मांस आपल्यास कळविण्यास सांगितलें कीं, '**लार्ड क्यानिंग** साहेबांनीं **विलायते**स परत गेल्यावर **राणी** सरकाराजवळ आपली फार तारीफ केली. त्यावरून त्यांना फार संतोष झाला. व आपली भेट घेण्याची त्यांनीं इच्छा प्रदर्शित केली.' आह्मीं सांगितलें कीं, 'आह्मी **महाराणी** सरकारचे एक यःकश्चित् ताबेदार आहोंत. आमची त्यांना आठवण होणें ही त्यांची आमच्यावर मोठी मेहेरबानगी आहे.' नंतर ते **सेक्रेटरी** पुनः ह्मणाले कीं, 'आपला **मक्के**स जाण्याचा विचार आहे ही गोष्ट खरी का'? त्यावरून आह्मीं सांगितलें 'होय. जन्मांतून एक वेळ तेथें जाणें आमचें कर्तव्य कर्म आहे. व **ईश्वरा**च्या कृपेनें आह्मी तेथें जाऊं व याबद्दल आपणांस कळवूं. **शहाजहान बेगम** इचा संभाळ करणें आपल्यावर अवलंबून आहे.' **सेक्रेटरी** ह्मणाले, 'मला हमेषा त्यांची आठवण होते. आपला **फत्तेपूर, शिकरी,** वगैरेकडे जाण्याचा विचार आहे ना? **व्हाईसराय** साहेबांस याबद्दल फार संतोष आहे. कारण त्यांना स्वतः फिरत राहून मोठमोठीं शहरें पाहण्याची फार हौस आहे.' आह्मीं ह्मटलें कीं, 'त्यांचें फिरणें बादशाही असून आमचें फिरणें आमचें मन व विचार पोक्त व चांगले होण्याकरितां आहे. कारण प्रवासापासून अनुभविकपणा पुष्कळ येतो हें प्रसिद्ध आहे.' नंतर लौकरच आह्मी आपल्या डेऱ्यांत परत आलों. तारीख १७ रोजीं आह्मी **व्हाईसराय** साहेबांनीं भरविलेल्या दरबारास गेलों. त्या वेळीं त्यांनीं भाषण केलें तें—

'राजे लोक, व संस्थानिक हो, आपल्यास येथें आमच्या भेटीस बोलावण्यांत एकतर आपली सर्वांची समक्ष ओळख करून घ्यावी असा हेतु असून शिवाय **महाराणी** सरकारांनीं आह्मी **इंग्लंडाहून** निघतांना हुकूम फर्माविल्याप्रमाणें **महाराणी** सरकार आपल्या सर्वांच्या कल्याणाविषयीं जी कळकळ बाळगितात ती आपल्यास व्यक्त करून दाखवावी हा दुसरा हेतु आहे. आतां आपण आमच्या ह्मणण्यास मान देऊन मोठ्या उल्हासानें, कित्येक जण तर बऱ्याच लांबून, या ठिकाणीं आलां याबद्दल आह्मी आपले फार आभारी आहों. गेल्या थोड्या दिवसांतच आपल्यापैकीं, मुख्य मुख्य लोकांची खानगी दरबारांत भेट घेऊन त्या वेळीं विशेष हिताच्या व महत्वाच्या गोष्टींविषयीं आमचे अभिप्राय आह्मीं विशेष खुलाशानें कळविले असल्यानें हल्लीं पुष्कळसें बोलून आपला वेळ मोडण्याची जरूर नाहीं.

'तरी आपली रजा घेण्यापूर्वी आपणां सर्वत्रांस हल्लींच्या **हिंदुस्थानच्या** स्थितीविषयीं व त्या स्थितीच्या योगानें आह्मां सर्वांवर जीं कर्तव्य कर्मे करण्याचें जरूर आहे त्याविषयीं चार शब्द बोलण्याची इच्छा आहे.

'हल्लीं या मोठ्या व भव्य राज्यांत सर्वत्र सुदैवानें शांतता आहे. ही गोष्ट आह्मीं सांगावयास पाहिजे असें नाहीं. देशांतील राजद्रोह व फिसादी समूळ नाहींशा करून परशत्रूस **इंग्लंडच्या** शक्तीस योग्य मान देण्यास शिकविलें गेलें आहे. ह्या उत्तम प्रसंगीं **इंग्रज** सरकाराची आपलें राज्य वाढविण्याची इच्छा नसून, **हिंदुस्थान** देशांतील नैसर्गिक संपत्ति योग्य उद्यमानें फलद्रूप करून, राज्यकर्ते व प्रजाजन या दोघांचेंही सौख्य वाढविण्याची इच्छा आहे. या हेतूनें सुधारणेच्या व चांगुलपणाच्या पुष्कळ गोष्टींची सुरवात केली गेली असून त्यांत मुख्य व ठळक गोष्टी ह्मटल्या ह्मणजे आगगाडी व तारायंत्र या आहेत. या आलीकडच्या युक्ति मोठमोठ्या पाश्चात्य राज्यांची सत्ता व संपदा इतकी वाढण्यास कारण झाल्या आहेत.

'आपल्या सरदार व मानकरी वगैरे लोकांत विद्येचा फैलाव करून, शाळा स्थापन करून, चांगले रस्ते तयार करण्याच्या कामीं मदत करून व आपल्या सर्व अधिकाराच्या व वजनाच्या जोरानें बालहत्या, सती जाणें, ठगी, व दरवडेखोरी इत्यादि दुष्ट चाली व गुन्हे बंद करून या योगानें **इंग्रज** सरकारच्या या प्रयत्नांस योग्य पाठबळ केल्यासारखें होईल. व त्यामुळें आपल्यास व आपल्या प्रजेस वर सांगितलेल्या गोष्टींपासून होणाऱ्या फायद्यांचा पूर्ण वांटा खात्रीनें मिळेल. या संबंधांत आपल्यापैकीं पुष्कळांनीं जे यत्न चालविले आहेत, त्यांपासून आह्मांस फार समाधान वाटतें. त्यांत विशेषतः आपल्यांपैकीं ज्यांनीं आपल्या राज्यांतून मोकळेपणें व्यापार चालण्यास आयात निर्यात जकातीच्या वगैरे हरकती दूर केल्या आहेत त्यांचें वर्तन जास्त प्रशंसनीय आहे.

'**सार्वभौम** सरकारचे प्रतिनिधि या नात्यानें **हिंदुस्थानां**त शांतता राखण्याचें आमचें कर्तव्य आहे. व याकरितां **महाराणी** सरकारांनीं आमच्या ताब्यांत मोठी व शूर फौज दिली आहे. व जरूर पडेल तर जर कोणी अविचारानें शांतता मोडूं लागले तर त्याचें पारिपत्य करून त्याला योग्य शासन करण्यास्तव तिचा उपयोग करण्यास आह्मी कधीं सोडणार नाहीं. **हिंदुस्थान**च्या कल्याणाविषयीं परिश्रम करणाऱ्या प्रत्येक मनुष्यास स्नेहाच्या नात्यानें व उमेद येण्याकरितां योग्य मदत करणें हें आमचें काम आहे. व आपणां सर्वांस खात्रीनें एवढेंच सांगणें आहे कीं, जे संस्थानिक आपल्या प्रजेस तृप्त व भरभराटींत ठेवितात त्यांचा, **इंग्रज** सरकारावर प्रेमभाव व मदत राहण्यांत विशेष हक्क मानिला जाईल.

'आतां राजे व संस्थानिक लोक हो, आह्मी आपली रजा घेतों. व आपण आपल्या घरीं परत गेल्यावर पुष्कळ दिवसपर्यंत आरोग्यानें व सुखानें नांदाल अशी इच्छा करितों.'

या भाषणानंतर दरबार आटपला. ता० १८ रोजीं **गव्हर्नर जनरल** यांनीं शिरस्त्याप्रमाणें आह्मांस परत भेट केली. त्या वेळीं त्यांचा

ठरावाप्रमाणें मानमरातब राहिला. १९ तारखेस ते आग्र्याहून निघून गेले. व २८ तारखेस आह्मी **भोपाळास** येण्यास निघून मंगळवार ता० १ एप्रील रोजीं **भोपाळास** पोहोंचलों.

या स्वारींत थोडासा खर्च विशेष झाला. एकंदर खर्च ४८६३६८॥॥. आला. त्यांत **गव्हर्नर जनरल** यांस नजर केल्याबद्दल १९१७६॥॥. व वाटखर्च २९४९९॥ झाला. व त्यांचेकडून १७१०० रुपयांची खिलत आह्मांस मिळाली.

---

## भाग ७ वा.
## मक्केची यात्रा.

नबाब **शिकंदर बेगम** यांनीं राज्यकारभाराची नीट व्यवस्था करून कांहीं दिवस विश्रांति घेऊन **मक्केच्या** यात्रेस जाण्याचा निश्चय केला. नबाब **खुदसिया बेगम** व **मियाफौजदार महंमदखान** हे त्यांच्या बरोबर निघाले. ता० ९ नवंबर १८६३ इ० रोजीं गुरुवारीं त्यांनीं **भोपाळ** सोडून **फरहतअफजा** बागेंत शहराबाहेर तीन दिवस मुकाम केला. व बरोबरच्या एकंदर एक हजार नोकर चाकरांस पुढें **मुंबईच्या** रस्त्यानें रवाना करून आपण, स्वतः बरोबर खासगीचे हुजरे लोक व नबाब **खुदसिया बेगम** व **मियाफौजदार महंमदखान** यांसह तारीख ७ रोजीं निघून दर कूच दरमजल **बऱ्हाणपुराजवळ महाडगांव** या गांवापर्यंत त्या वेळीं आगगाडी झाली होती तेथें येऊन, आगगाडींत बसून ता० १९ रोजीं सुखरूप **मुंबईस** दाखल झाल्या. तेथें दोन गलबतें भाड्यानें केलीं होतीं. त्यांवर सर्व सामान व नोकर चाकर चढवून एक आगबोट भाड्यानें ठरली होती, त्यांत आपण स्वतः, त्यांची मातोश्री, चुलते, **भोपाळचे** दिवाण, व नेहमींचे बरोबर राहणारे हुजरे वगैरे लोक बसून तारीख ६ जानेवारी सन १८६४ रोजीं निघून ईश्वराच्या कृपेनें **जेद्दा** येथें तारीख २३ जानेवारी रोजीं सुखरूपपणें दाखल झाल्या. व तारीख २७ रोजीं संध्याकाळीं **मक्काशरीफ** एथें

पोहोंचून, ठरावाप्रमाणें तेथील विधि उरकून ता० ९ जिल्हेज—१६ मे-रोजीं, **हाजउलइसलाम**चे सर्व विधि पूर्ण झाले. **मदीना** शहरास जाण्याचा त्यांचा विचार वाटेंत **बेदोविन** लोकांचा उपद्रव असल्यानें रहित झाला. ता० २१ मे रोजीं त्या **जेद्दा** एथें परत येऊन तेथून सर्व मंडळीसह आगबोटींत बसून शुक्रवार ता० १० जून १८६४ रोजीं **मुंबईस** परत आल्या. या ठिकाणीं त्यांच्या व **गव्हर्नर** व इतर मोठमोठे लोक यांच्या भेटी झाल्या. तेथून ता० २१ जुलई रोजीं त्या रेल-मार्गें **मोहियाबादेस** किंवा **पुण्यास** गेल्या. तेथें कांहीं दिवस राहून शनिवार तारीख ३ सपटंबर १८६४ रोजीं बुधवारीं **भोपाळांत** दाखल झाल्या. त्यांना **शिकंदराबाद**पर्यंत लवाजमा पेशवाईकरितां पाठविला होता.

कोणत्याही इतिहासांत **हिंदुस्थान**चे कोणी **बादशहा** किंवा कोणी मुसलमान राजे यांनीं यापूर्वीं कधीं **हाज** किंवा **मक्का** ह्या यात्रा केल्याचें आढळत नाहीं. व यापुढें कोणी जाईल त्यानें **शिकंदर बेगम** यांचें अनुकरण केल्यासारखेंच होईल. या यात्रेंत **मक्केच्या शेरीफास** कपडे व जवाहीर वगैरे दिलें. त्यांच्या किमतीशिवाय व तेथील मेहजतींतील नोकर चाकर व भिकार व गरीब अशा लोकांस खैरात केली त्याशिवाय १९९८८२॥ एकंदर खर्च झाला. व **खुदसिया बेगम** यांनीही तितकाच खर्च केला.

नबाब **शिकंदर बेगम** यांनीं या यात्रेची रोजनिशी लिहून ठेविली आहे. तिचें भाषांतर **भोपाळ**चे **पोलिटिकल एजंट** डब्ल्यू आ-**स्बोर्न** साहेब यांच्या बायकोनें करून छापविलें आहे. त्यांतून पुढील हकीकत सारांश रूपानें दिली आहे.

**जेद्दा** शहर समुद्रकिनाऱ्यावर असून तेथील घरें सातमजली असल्यानें दुरून हें शहर चमत्कारिक दिसतें. येथील घरांचे पाये व भिंती वीटचुन्याच्या असून त्यांवर मातीचीं धाबीं आहेत. पक्क्या स्नानाच्या जागा व मुदपाकाच्या जागा घरांतच असतात. या शहरांत अरब, तुर्की व

शिद्दी लोकांची भेसळ वस्ती असून कांहीं थोडे हिंदुस्थानी व्यापारीही आहेत. लोकांचा पेहराव अरबी असून अरबी भाषाच प्रचारांत आहे. साधारण प्रतीचे लोक खाऊन पिऊन सुखी आहेत. येथील पाणी खारें असल्यानें पावसाचें पाणी शहराबाहेर मोठमोठ्या टाक्यांत सांठवून ठेवावें लागतें. त्यांतूनच सर्व लोकांस वर्षभर पिण्याच्या पाण्याचा पुरवठा होतो. तेथें ब्रिटिश, फ्रेंच व पर्शियन या सरकारांकडून कान्सल्स किंवा वकील राहतात. गांवाबाहेर **होलीईव्हचें** देऊळ आहे. या देवळाभोंवतीं सुमारें ३०० यार्ड लांब व छातीइतके उंच असे कोट आहेत. त्यांच्या दोन टोंकांस दोन लहान घुमट्या व या देवळाच्या आसपासच्या आवारांत पुष्कळशीं थडगीं आहेत. **मक्केचा** शेरीफ **सय्यदअबदुल्ला** व तेथील गव्हर्नर **इजत अहमद पादशाहा** यांनीं आह्मी आल्याचें ऐकून आह्मांस स्वागतपत्र पाठविलें. **जेद्दाहून** निघून फार लांब जाण्यापूर्वींच पादशाहाचा मुलगा **सुलेमानबेग** व **शेरीफाचा** धाकटा भाऊ, बरोबर ९०।९० तुर्की स्वार घेऊन आह्मांस सामोरे आले. व त्यांनीं शिरस्त्याप्रमाणें आमचा मान मरातब ठेविला. तारीख २७ जानेवारी रोजीं सायंकाळीं आह्मी मक्केस पोहोंचलों. पलटणीचे लोक व कांहीं स्वार **मक्केच्या शेरीफानें** आह्मांस सलामी देण्याकरितां पाठविले होते. त्यांनीं आह्मांस सलामी दिली. तों इकडे **मोअज्जन** याचा **ईश्वरप्रार्थनेस** बोलावण्याचा आवाज कानीं आला. आह्मी **बाबउल्सलाम** मधून **हमशरीफ** येथें गेलों. व तेथें **तुवाफइकदूम** व **सई** हे विधि उरकून **हाजी** लोकांना राहण्याकरितां बांधलेल्या जागेकडे जात होतों. तों **शेरीफाचे** गुलाम येऊन त्यांनीं कळविलें कीं, **शेरीफांनीं** आपल्या करितां आपल्या घरांतच निराळी जागा मोकळी करून ठेविली असून तिकडे आपण चलावें. त्यावरून आह्मी तिकडे गेलों. तेथें **शेरीफाच्या** भावानें आमचें आगतस्वागत करून आह्मांस एका प्रशस्त वाड्यांत नेलें. त्या वाड्यांतील सर्व ओसऱ्यांत जरीचें काम केलेलें नव्या मखमलीचे रूजामे टाकले होते. बिछा-

यतीच्या किनाऱ्यावर उभे असलेल्या कांहीं शिद्दी गुलामांनीं आह्मांस थोडा उपहार करण्याविषयीं विनंती केली. त्यावरून आह्मीं प्रथम थोडा अनमान केला. परंतु आमचा दुभाषी **जाफर एफेंडी** यानें कळविलें कीं, इकडे असें करण्याची चाल आहे. त्यावरून आह्मी भोजनास बसलों. सुमारें निरनिराळे ९०० तऱ्हेचे पदार्थ आह्मांस वाढले. भोजन झाल्यावर आह्मीं आराम केला. दुसरे दिवशीं सकाळीं व संध्याकाळीं **शेरीफानें** आमच्याकडे थाळे पाठविले. तिसरे दिवशीं आह्मीं **अमर बिन आकिल** याच्याजवळ निराळी जागा घेतली. **मक्का** हें फार मोठें शहर असून त्यांत पुष्कळ मोठमोठ्या सातमजली इमारती आहेत. पृथ्वींतील सर्व ठिकाणचे पदार्थ तेथें मिळतात. व एथें श्रीमान लोकही पुष्कळ आहेत. पण त्या सर्वांत **शेरीफ** फारच श्रीमान आहे. शहराच्या सभोंवार अगदीं वैराण टेंकड्या आहेत. त्यांवर झाडें, गवत, किंवा पाणी नाहीं. त्यामुळें शहरांत दिवसा अतिशय गरमी होते, व ऊन व वारा फार जोरानें वहात असतो. रात्रीं कांहीं थोडी थंडी असते. व चंद्र फार स्वच्छ व सतेज असतो. हमेषा अभ्रें येऊन गडगडाट होऊन विजा चमकतात. तथापि येथें पाऊस क्वचितच पडतो. येथें गाणें व नाचणें याचें नांव सुद्धां नाहीं. कोठें क्वचित स्थळीं असलें तर त्याला फार हलकट समजतात. तुर्की शिपाई इंग्रजी शिपायांप्रमाणेंच असतात. परंतु त्यांच्या कवायतींत व पेहरावांत फरक आहे. या ठिकाणीं खाण्याचे मुख्य जिन्नस ह्मणजे, उंटाचें व बकऱ्याचें मांस, काफी, चहा, व हुक्का पीण्याचा प्रचार सार्वत्रिक आहे. अरब लोक फार उद्योगी व मजबूत असून **हिंदुस्थानां**तील लोकांप्रमाणेंच काळे व सडपातळ आहेत. तथापि त्यांच्यांत पुष्कळ हमाल लोक दोन दोन मणांचें ओझें सहज उचलून खांद्यावर घेऊन दुमजल्यावर नेतांना आह्मीं पाहिलें आहे. या लोकांचे आवाज व केंस चांगले नाहींत. बायका पुरुषांपेक्षां मोठ्या आहेत. व एथें मुसलमानीशिवाय दुसरा धर्म नाहीं. भाषा अरबीचीच एक भेसळ शाखा आहे. **शेबियाच्या** घराण्याकडे

येथील देवळाचें काम आहे. त्याच्या शिवाय आणखी एक दोन घरें खेरीज करून येथें शुद्ध अरब घराणीं क्वचितच आहेत. एथील लोक हिंदुस्थानी, बुखारावाले, आफगाण, वगैरे असून इकडे फार दिवस दोन दोन पिढ्या राहिल्यानें दिसण्यांत अरब लोकांप्रमाणें दिसतात. शिवाय दरसाल निरनिराळ्या देशाचे निरनिराळी भाषा बोलणारे पुष्कळ लोक येतात यामुळें येथील भाषा मिश्र झाली आहे. आसपासच्या प्रदेशांतील लोक शुद्ध अरब असून त्यांची भाषाही जास्त शुद्ध आहे. येथें रोजमुरा देऊन नौकर ठेवण्याची चाल नाहीं. परंतु शिद्दी, जार्जियन व शिर्कासियन, बायका व पुरुष जातीचे गुलाम भरबाजारांत विकत मिळतात. त्यांच्या हातून घरू काम घेतात. व त्यांना पाहिजे तेव्हां विकून टाकतां येतें. शहराच्या प्रत्येक मोहोल्यांत बायका पुरुषांना अलग अलग स्नान करण्याकरितां चांगलीं सुंदर स्नानगृहें बांधलेलीं आहेत. **जबीदखातन** या कालव्यानें शहरांत चांगल्या पिण्याच्या पाण्याचा पुरावठा होतो. अंजीर, डाळिंबें, टरबुजें, व खरबुजें, **तईफ** येथून येतात. तीं फार उत्तम असतात. **अरबस्थानां**तील घोडे, तुर्की व इराणी घोडे यांच्या सामानाविषयीं लिहिण्याची तर जरूरच नाहीं. त्यांची योग्यता कळून येण्याला तीं प्रत्यक्ष पाहिलींच पाहिजेत. आठी प्रहर वाटेल तेव्हां बाजारांत सर्व प्रकारचें अन्न तयार मिळतें. परंतु त्यांत मीठ घातलेलें नसतें. कारण जेवतांना बारीक वांटलेलें मीठ जवळ ठेवून आपल्यास वाटेल तितकें पदार्थास लावून खाण्याची **तुर्की** लोकांची चाल आहे.

**मशीद अल्हराम** येथें पांच वेळां **ईश्वर**प्रार्थनेकरितां बोलावणें होतें. व मध्यरात्रीनंतर **तहज्द**करितां व सकाळीं **तहरीम**करितां व तिसरे प्रहरीं **तक्बीर**करितां बोलावणें होतें. या वेळीं सर्व प्रार्थना मोठ्यानें केली जाते. **तहरीम**च्या वेळीं एक मनुष्य अगदीं पहांटे एका उंच मिनाऱ्यावर चढून तेथें **कुराणां**तील **ईश्वरा**चा थोरपणा, महिमा, शक्ति व एकत्व, तसेंच त्याची दया व क्षमा इत्यादिकांचें वर्णन असलेलीं कांहीं

गीतें मोठ्यानें गातो. व **पैगंबर** व त्याचे वंशज यांच्यावर प्रसाद करण्याविषयीं प्रार्थना करितो. ही **तहरीम**ची प्रार्थना फार चांगली व मनास उल्हास देणारी आहे.

**पैगंबरा**च्या कबरेसभोंवतालच्या इमारतीस **मद्रसे** ह्मणतात. व तेथील कोठड्यांस, खलबत ह्मणतात. यांतच यात्रेकरू उतरतात.

ता० १६ रमजान सन १२८० रोजीं आह्मी सेरिफाच्या घरीं त्याच्या भेटीस गेलों. त्याच्या वाड्याजवळ जातांच शिरस्त्याप्रमाणें आगतस्वागत झाल्यावर तीन खोजांनीं आह्मांस पहिल्या मजल्यावर पोहोंचविलें. तेथून स्वच्छ पोषाख केलेल्या जार्जियन गुलामिणींनीं दुसऱ्या मजल्यापर्यंत पोहोंचविलें. त्या ठिकाणीं आमच्या स्वागताकरितां कांहीं **मिसर** देशांतील स्त्रिया हारीनें उभ्या होत्या. त्यांनीं आदबीनें आमचे हात धरून आह्मांस तिसऱ्या मजल्यावर नेलें. तेथें **शेरिफा**च्या दोघी बायका आह्मांस सामोऱ्या येऊन भेटल्या. व त्यांनीं आह्मांस दिवाणखान्यांत नेलें. आह्मांस पाहून **शेरिफा**च्या आईनें ताजीम देऊन बिछाइतीच्या टोंकापर्यंत सामोरी येऊन ती आह्मांस भेटली. **शेरिफा**च्या दोन्ही बायका आह्मांस कडकडून भेटल्या व त्यांनीं आमच्या मानेच्या दोन्ही बाजूंस, गालांस, ओंठावर व हनुवटीवर मुके घेऊन मोठ्या आदबीनें तेथील मुख्य आसनावर नेऊन बसविलें. घरांत सर्वत्र कांचेचे दिवे व सुंदर सुंदर जामे होते. **शेरिफा**च्या बायका तरुण असून फार सुंदर होत्या व केसांपासून कमरेपर्यंत हिऱ्यांनीं जशा लादलेल्या दिसत होत्या. त्यांच्या डोक्यावर रेशमी रुमाल ज्यांस अरबींत असबा ह्मणतात, ते बांधले होते. व त्या रुमालांवर लहान लहान वर्तुलाकार हिऱ्यांचे पुंज मुकुटाकृति बसविलेले होते. त्यांची शोभा व सौंदर्य अवर्णनीय होतें. त्यांच्या यत्किंचितही हलण्या बोलण्याबरोबर हे हिऱ्याचे तुरे हालून चमकत असत. सुमारें एक तासानंतर **शेरिफा**नें वर्दी देऊन आंत आल्यावर आमच्याशीं फार सभ्यपणानें भाषण केलें. **अरबी** लोकांच्या रीतीस अनुसरून काफी, डाळिंबाचें सरबत, गुलाबपाणी व धूप आमच्या पुढें आणून ठेविलें. त्यां-

तून काफी व सरबत पिऊन व आमचे कपडे व बाह्या त्या सुवासिक धूपानें सुगंधित करून आह्मी तेथून परत आलों. त्या बायका आह्मांस दरवाजापावेतों पोंचविण्यास आल्या होत्या.

तेथील **पादशहा**चा मुलगा **सुलेमानबेग** याच्या सांगण्यावरून कळलें कीं, प्रत्येक **तुर्की** शिपायास वीस करष किंवा साडे तीन रुपये दरमहा असून शिवाय त्याला रोज तीन वेळां जेवण, चहा काफी, पक्की वरदी, व इतर कपडे सरकारांतून मिळतात. असा एकंदर प्रत्येक शिपायामागें २१ रु० दरमहा खर्च पडतो. आमचा दुभाषी **महंमदहुसेन** यानें सांगितलें कीं **शेरिफास** कोणी सभ्य लोक भेटावयास जातात तेव्हां त्यांना बसण्यापूर्वीं त्याच्या हाताच्या पाठीचें चुंबन घ्यावें लागतें. व **बेदोईन** व इतर लोक भेटीस जातात तेव्हां ते त्याच्या आंगरख्याच्या टोंकांचें चुंबन घेतात. व नोकर आणि गुलाम लोक त्याच्या बिछायतीच्या टोंकाचें चुंबन घेतात. असें करण्यास शास्त्रांत आधार नाहीं, इतकेंच नाहीं, परंतु याबद्दल निषेध व मनाई केली आहे.

**अरफात्** नांवाची पवित्र टेंकटी **मक्के**पासून ९ कोस आहे. त्या ठिकाणीं ता० ८ जिल्हेज रोजीं यात्रेकरूंचा वेष घेतला जातो. व ९ वी तारीख '**हाज**'चा मुख्य दिवस आहे. या ठिकाणीं विरक्त वेष घेऊन उघड्या डोक्यानें 'लबेक अल्लहम' या शब्दांनीं सुरू होणाऱ्या प्रार्थनेचा जप करीत सर्व यात्रेकरू या ठिकाणीं जमतात (ती प्रार्थना येणेंप्रमाणें.— 'हे ईश्वरा, मी तुझ्या सेवेंत हजर आहें. मी हजर आहें, तूंच एक ईश्वर आहेस. मी तुझ्या सेवेंत हजर आहें. सर्व यश, महिमा, व शक्ति सत्य सत्य तुझी एकट्याचीच आहे. मी तुझ्या सेवेंत हजर आहें. हे जगत्पालका, मी हजर आहें. हे पापाची क्षमा करणाऱ्या मी तुझ्या सेवेंत हजर आहें. मी तुला तुझ्या कामांत मदत करितों. सर्व चांगुलपणा तुझ्यांतच आहे. व सर्व वस्तु तुझ्याकडेच वळतात'.) या वेळीं येथें खाण्यापिण्याची मनाई नाहीं. वाटेल त्यानें वाटेल तें खावें, परंतु त्यानें **आरफात्**च्या हद्दीबाहेर मात्र जाऊं नये. तिसरे प्रहरच्या प्रार्थनेच्या वेळीं **काजी** उंटावर बसून येऊन

**जिबल रहमत्**च्या शिखरावर चढतो व तेथें एक व्यासपीठ आहे त्यावर बसून तो संध्याकाळपर्यंत 'खुतबा' किंवा प्रार्थना वाचीत असतो. या काळास 'वकुफ' ह्मणतात. व हा 'वकुफ' नीट पाळलाच पाहिजे. परंतु टेंकडीवर चढून जाण्याला शास्त्राधार नाहीं. वाटेल त्यानें वाटेल तेथें उभें रहावें. संध्याकाळच्या सुमारास यात्रेकरूचे कांहीं थोफ सूर्यास्तानंतर **अरफात्** येथून निघून **मजदुलफा** येथें रात्रभर राहतात. तुर्की तोफा या ठिकाणीं मिसरी खेंचरांकडून ओढून आणतात. त्यांचे चालतां चालतांच बार काढितात. हा विधि शास्त्राप्रमाणें नवीन व चुकीचा आहे. जिल्हेजच्या १० व्या तारखेस पहांटे **मजदुलफा** येथून निघून 'मना' कडे जाण्यास यात्रेकरू निघतात. व तेथून **मक्केस** जाऊन **'तोफ'** ह्मणजे कबरेस प्रदक्षिणा करण्याचा विधि करितात. व त्याच दिवशीं **मना** येथें परत येऊन तेथेंच ३ दिवसपर्यंत 'रमी जुमर'चा विधि करीत राहतात. या तीन दिवसांस **'तशरीख'** असें ह्मणतात. यानंतर बाराव्या किंवा तेराव्या तारखेस यात्रेकरू **मक्केस** परत येऊन देवळाभोंवतीं शेवटची प्रदक्षिणा करून आपापल्या काफल्यांत मिळून आपल्या देशांस परत जाण्यास निघतात.

**'हाज'**च्या दिवशीं फारच अद्भुत व चमत्कारिक देखावा दृष्टीस पडतो. सहस्रशः स्त्री पुरुष, वृद्ध तरुण, विद्वान् अविद्वान्, धनाढ्य दरिद्री, लहान मोठे, दूरच्या व जवळच्या देशाहून एकत्र होऊन एक तऱ्हेचा विरक्तीद्योतक पोषाख करून, दीनवत् आचरण करून, क्षमा होण्याबद्दल **ईश्वरा**ची प्रार्थना करीत असतात. निरनिराळ्या रंगांचे तंबू कोसों गणति लागलेले असून बाजारांत हरतऱ्हेचे चमत्कारिक जिन्नस आढळतात. व अगणित उंट, व बकरीं मारलीं जातात. दरवर्षीं **टर्कीच्या सुलताना**कडून **काबावर** झांकण्याकरितां काळ्या रेशमाची पोशीस येते. ती **मिसर** देशांतील **काफल्या**बरोबर एका उंटावर मोठ्या इतमामानें येते. त्याच्या बरोबर जाण्याकरितां व सन्मानाकरितां **तुर्की** शिपाई असतात. हा उंट फार सुंदर असून त्याच्यावर भरगची हिरव्या मखमलीची झूल

घातलेली असते. त्याच्या बरोबर वाटेंत कांहीं प्रसंगविशेषीं हरकत न व्हावी ह्याकरितां असेच सजविलेले पुष्कळ उंट पोशीस वाहण्यास तयार ठेविलेले असतात. **'हाज'**च्या दिवशीं हे पोशीस **जिबल रहमत** टेंकडीच्या पायथ्याशीं आणून ठेवितात. व पोशीस **'हाज'**च्या नंतर **मक्केस** नेतात, व पूर्वीचें काढून त्याच्या जागीं हें नवें पोशीस घालतात. जुन्यापैकीं अर्धें **शेबी** किंवा **काबा** येथील दरवान याला मिळतें. बाकीचें अर्धें पोशीस तेथील मुजावर व नोकर लोकांत वांटलें जातें. ते लोक त्याचे लहान लहान तुकडे करून यात्रेकरू लोकांस प्रसाद ह्मणून विकतात. दारावरील पडदा व भरगच्ची कमरबंद **शेरीफ** साहेबांच्या वांट्यास जातो. या कबरेच्या आंतील पोशीस तांबड्या रेशमी कपड्याचें आहे तें दरसाल बदलीत नाहींत. **तुर्कस्तान**च्या गादीवर जेव्हां एखादा नवीन **सुल्तान** बसतो त्या वेळीं नवीन पोशीस पाठविलें जातें. **जलाल उद्दीन सेवती** यानें आपल्या ग्रंथांत लिहिलें आहे कीं, ज्या बारदानांतून **काबा**वर घालण्याकरितां पोशीस येतें तें शुभकारक जाणून **इजिप्त** देशांत परत पाठविलें जातें. व तें तेथें ज्या दिवशीं जाऊन पोंचतें तो दिवस **ईद**च्या दिवसाप्रमाणें मोठ्या सणाचा मानितात व त्या दिवशीं मोठा उत्सव होतो. ही शास्त्रविरुद्ध चाल सन ६७९ हिजरीपासून पडली आहे. पूर्वी **काब्यावर** पांढरी चादर घातलेली असे. पण **आबासी खालिफ नसुरुद्दिन** यानें रंगीत चादर घालण्याचा पाठ पाडला. तेव्हांपासून तशीच चाल पडली आहे.

तारीख ८।१०।१४ जिल्हेद रोजीं **शेरिफा**च्या इतमामानें स्वाऱ्या निघतात. त्यांत सर्वांत पुढें सोन्याचांदीचें व जडावाचें सामान व अलंकार घातलेले २२ अरबी घोडे असतात. त्यांच्या मागें भरगच्ची झुली घातलेल्या व फार जलद चालणाऱ्या सांडणी असतात. त्यांत दोन खुद्द **शेरीफ** साहेब यांच्या स्वारीच्या असून त्यांच्या गळ्यांत मोत्यांचे कंठे असतात. त्यांची किंमत चारलक्ष रुपयांहून कमी नसावी. त्यांच्या मागून दोन तीनशें **तुर्की** पोषाख केलेले स्वार व एक **तुर्की** पलटण असते.

त्यांच्या मागून ४०० **शेरीफा**चे उत्तम पोषाख केलेले व हत्यारबंद गुलाम असून त्यांच्या मागून **शेरीफा**चे मुलगे व सोयरे धायरे सोन्याचीं खोगिरें घातलेल्या घोड्यांवर बसून असतात. त्यांच्यामागें तेथील वृद्ध लोक अरबीशेख, तुर्की अफीसर व शिद्दी व जार्जियन गुलाम असे असतात. त्यांच्या मागून निरनिराळ्या जातीचे अरब व फकीर सुमारें हजारपर्यंत उंटावर बसलेले असतात या सर्वांच्या पाठीमागून **शेरीफ** साहेब स्वतः जडावाचें सामान घातलेल्या घोड्यावर बसून येतात. या स्वारीबरोबर वाद्यांचा गजरही असतो. '**हाज**'च्या नंतर तीन दिवसपर्यंत **शेरीफा**च्या येथें मुक्तद्वार असून आल्यागेल्यास भोजन मिळतें.

**यल्मलम** नांवाची एक समुद्रकिनाऱ्यावर टेंकडी आहे. तिच्या पायथ्याशीं हिंदुस्थानी व आरबी यात्रेकरू विरक्ति-द्योतक पेहराव करितात. तो पेहराव खालीं लिहिल्याप्रमाणें:—

यात्रेकरू प्रथम स्नान करून एक पांढरें वस्त्र नेसतात. व दुसरा एक पांढरा दुपट्टा एका खांद्यावरून टाकतात. बायकांनीं कपडे बदलण्याची गरज नाहीं परंतु त्यांनीं रेशीम अंगावर ठेवूं नये, जागृत असतांना तोंडावरून बुरखा घेऊं नये, सुगंधी द्रव्य किंवा सुरम्याचा उपयोग करूं नये, दागिने घालूं नयेत व पुरुषांत मिसळूं नये. केंसांस सुवासिक तेलें लावून विंचरणेंही मना आहे. तसेंच '**तोआफ**' किंवा **काबा** या सभोंवतीं प्रदक्षिणाविधि व **साई** किंवा **सफा** व **मरवा** यांच्या मध्यें, दवडणें व **कोरबानी** व **हल्क** हे विधि होईपावेतों कोणतेंही जनावर मारणें याची मनाई आहे. **हल्क** ह्मणजे सर्व क्षौर, व कांहीं थोडे केंस कातरणें याला कसर ह्मणतात. बायकांनीं मूठभर लांब केंस कातरण्याची चाल आहे. **कोरबानी** ह्मणजे उंट, बकरा, किंवा मेंढरूं याचा बळी देऊन त्याच्या वरील चामडें व वस्त्र दान देऊन त्याचें मांस येतील त्यांस खाऊं घालणें हा विधि होय.

**मक्के**पासून ६ मैलांवर डोंगरांत **तुनाईम** नांवाची जागा आहे. तेथचीही यात्रा करावी लागते. वरच्या प्रमाणें पेहराव करून दोन

जास्ती प्रार्थना ह्मणून वाटेंत **लबेक**चा जप करीत यात्रेकरू **मक्केस** येतात व 'तुवाफ'चा विधि उरकून **अब्राहाम**च्या मंदिरांत आणखी दोन प्रार्थना ह्मणून **सफा** व **मरवा** यांमधील दौड करून नंतर क्षौर करून हा यात्रेकरूंचा पेहराव सोडून देतात.

**बरजदी तुई** नांवाची, **मक्का** शहराबाहेर, परंतु पवित्र भूमीच्या हद्दींत, एक विहीर आहे. तींत सर्व यात्रेकरू **मक्केंत** जाण्यापूर्वीं स्नान करितात. येथें सर्वांनीं स्नान केलेंच पाहिजे. हल्लीं या ठिकाणीं एक मशीद बांधली आहे.

**मशीद जाराना** हें स्थळ **मक्के**पासून १८ मैल असून येथूनही कांहीं लोक यात्रेस आरंभ करितात. तिला मोठी यात्रा ह्मणतात.

**जिबल्नूर** किंवा **प्रकाशगिरी** व **हर** किंवा **हरा**ची गुंफा हीं पवित्र भूमीच्या हद्दींतच परंतु शहराबाहेर आहेत. याच ठिकाणीं **पैगंबर** यांस प्रथम **ईश्वरी** साक्षात्कार झाला. हा पहाड सुमारें दोन मैल उंच आहे. **हराच्या** गुहेच्या तोंडाशीं एक कमानी दरवाजा आहे. या ठिकाणीं यात्रेकरूस दोन जास्ती प्रार्थना ह्मणाव्या लागतात. या पहाडावर एक मशीदही आहे.

**जिब्लसूर** ही टेंकडी **हरम** ( पवित्र भूमीच्या ) हद्दींत परंतु शहराबाहेर आहे. त्या ठिकाणीं **पैगंबर, ईश्वरा**ची प्रार्थना करीत असत. यात्रेकरूंस या ठिकाणींही दोन प्रार्थना ह्मणाव्या लागतात. परंतु एथें गेलेंच पाहिजे असें नाहीं.

**जिन्नात् अल्मा अल्ला** हें **मक्का** शहरांतील कबरस्थान आहे. तेथें मुसलमानी धर्मांतील थोर थोर लोकांचीं थडगीं आहेत. त्यांचेंही यात्रेकरू दर्शन घेतात. मेलेल्यांस सन्मान देण्याविषयीं शास्त्राज्ञा आहे. तशांतही या ठिकाणीं पुरलेल्या साधु व पवित्र लोकांस मान देणें सशास्त्र आहे.

**जिन** लोकांची मशीद शहराबाहेर आहे. या ठिकाणींच त्या लो-

कांनीं येऊन **पैगंबरावर** आपला विश्वास असल्याचें कबूल केलें. यात्रेकरू **शजर** मशिदींतही दोन जास्ती प्रार्थना ह्मणतात.

**बुकबीस** नांवाची पहाडी, पवित्र भूमीजवळच आहे. त्या ठिकाणीं **पैगंबर** पूजन करीत असत. हल्लीं तेथें वस्ती झाली आहे.

**सफा** आणि **मरवा** या दोन टेंकड्या असून हल्लीं त्यांच्या मध्यें बाजार वसला आहे. **काब्याच्या** एका कोंपऱ्यावर एक कमानी दरवाजा **सफा** नांवाचा आहे. त्याच्या समोर अडीचशें पावलांवर **मरवा** नांवाची टेंकडी आहे. या दोहोंमध्यें प्रार्थना करीत ७ फेरे करावे लागतात.

वाटेंत दोन मनोरे आहेत. त्यांस मैलाचे मनोरे ह्मणतात. पुरुषांना या ठिकाणीं पळावें लागतें. बायकांनीं मात्र आपल्या शक्तीप्रमाणें चालावें. या दौडीला **सई** ह्मणतात.

**काब्याच्या** आवारास २२ देवड्या आहेत. त्यांत कांहींना एकेक, दोनदोन, तीनतीन, दरवाजे आहेत. त्यांचीं नांवें खालीं लिहिल्या प्रमाणें:—

१ बाब ईउम्र, २ अल् अब्राहाम, ३ अलबिदा, या पश्चिमेस आहेत. दक्षिणेस—४ अलमहानी, ५ हकीमउल् जदीद, ६ शरीफ, ७ अल् अक्द, ८ अल् सफा, ९ अल् बग्ल, १० अल् रग किंवा अल् नौष. पूर्वेस—११ अली, १२ अबास, १३ नत्र, १४ सलम्स. उत्तरेस—१५ दरेब, १६ मद्रसा सुलेमानी, १७ महाकमा, १८ झियद, १९ कुतबी, २० बस्ती, २१ मद्रसा जम्निया, व २२ अतीक अशा आहेत.

**झमझमची** बावडी पवित्र भूमींत आहे. तिचें पाणी खारट आहे. तिच्यांतून रात्रंदिवस हजारों डोल पाणी काढलें जातें. तथापि कधींही पाणी कमी होत नाहीं. हें पाणी पवित्र जाणून लोक पुष्कळ लांब वर नेतात. तें, लोक उभ्यानें पितात. तें पाणी स्नानास किंवा हात तोंड धुण्यास घेण्यापेक्षां दुसऱ्या हलक्या कामीं लावणें शास्त्रोक्त नाहीं.

**मक्केच्या** चारी भागांत चार मतांच्या प्रार्थना चालतात. तेथें चार पीठें आहेत. हनफी, शफई, मलिक आणि ज्ञनबली, हीं पीठें **अबासी**

खलिफांच्या वेळीं बांधलीं गेलीं. पूर्वीं सर्वत्र एकच मत होतें. हल्लींची **काब्या**वरील इमारत **अहंमद हजाज** बिन **यूसफ षक्फी** यानें बांधिली. मकाम **अब्रहम** हे स्थळ **काब्या**च्या समोर आहे. त्या ठिकाणीं 'तुवाफ' झाल्यानंतर जास्ती प्रार्थना ह्मणतात. या पीठावर प्रत्येक शुक्रवारीं व **ईद उल् फित्र** या दिवशीं **काजी** बसून खुतबा ह्मणतात.

पुस्तकालयांत नाना विषयांवर हजारों ग्रंथ कपाटांत लावून ठेविले आहेत. तेथें हमेषा विद्वान् लोक जाऊन वाचीत व पठण करीत बसतात. त्यांना हीं पुस्तकें बाहेर नेऊं देत नाहींत.

घंटाघरांत लहान मोठीं तुर्की व युरोपियन सुंदर सुंदर घड्याळें ठेविलेलीं आहेत. या ठिकाणीं जाणते लोक जाऊन बसून प्रार्थनेची वेळ बरोबर शोधून काढितात. हें एक आलीकडील थोतांड आहे. **हर**मच्या कोटास एकंदर १९२ मुलामा केलेले लहान लहान मनोरे आहेत.

**तोअफ** किंवा एक काळा दगड **काब्या**च्या कोठडीच्या एका कोंपऱ्यांत आहे. त्याचें, यात्रेकरू जाऊन चुंबन घेतात. व नंतर त्या मंदिरास सात प्रदक्षिणा घालतात. प्रत्येक प्रदक्षिणेस **शवत** ह्मणतात. सात प्रदक्षिणा मिळून एक **तोअफ** होतो. 'रकूनयमनी' हा एक **काबा**च्या कोठडीचा कोंपरा आहे. त्याला यात्रेकरू हातांनीं स्पर्श करून नंतर हाताचें चुंबन घेतात.

**हातीम**च्या सभोंवार संगमरवराची एक धनुष्याकृति भिंत आहे. ती पूर्वीं **काब्यांत**च सामील होती. परंतु हल्लीं निराळी आहे. एथेंही निराळी प्रार्थना करितात. व कांहीं लोक येथेंच यात्रिक वेष घेऊन येथूनच **अफति** येथील यात्रेस जातात. **'मीजा रहमत'** नांवाचा एक पाण्याचा नळ आहे. त्यांतून मशिदीवरील गच्चीवर पडलेलें पावसाचें पाणी **हातीम**मध्यें वाहतें. या नळाचें तोंड सोन्याचें आहे. प्रतिवर्षीं मोहरमच्या १० तारखेस सर्व पुरुष व रमजानच्या ११ तारखेस सर्व बायका कबरीच्या कोठडींत पहांटेपासून ९ वाजेपर्यंत जमतात. रबिलावलच्या १२ व्या तारखेस, रज्जब महिन्यांतील पहिल्या शुक्रवारीं व

२७ व्या तारखेस, साबानच्या १९ व्या तारखेस, रमजानांतील पहिल्या शुक्रवारीं, जिल्कादच्या १९ व २७ तारखेस, फक्त पुरुषांस मात्र **काबांत** जाण्याची परवानगी असते. व बायकांकरितां निराळे दिवस नेमिलेले असतात. प्रतिवर्षी ता० २० रबिलावल, २० जिल्काद, व १२ वी मोहरम रोजीं मिळून तीन वेळां तेथील **शेरीफ** व **पादशहा** हे स्वतः व दरवान द्वारपाळ व आणखी २।३ नौकर मिळून **काबा** दोन वेळ नुसत्या पाण्यानें व शेवटीं गुलाबपाण्यानें आपल्या हातानें धुतात. व भिंतीस व दरवाज्यास गुलाबाचें अत्तर व चंदनाची पूड चोळतात. असें करण्यास शास्त्राधार आहे, असें नाहीं. परंतु स्वच्छता राखण्याकरितां ते असें करितात. प्रतिवर्षी जिल्कादच्या २९ व्या तारखेस या **ईश्वराच्या** सिंहासनावरचें कफन एक पुरुषभर सुमार उचलून त्याच्यावर पांढरी चादर बांधतात. याला गांवढळ लोक **काबाचा** “अहरम” समजतात. या पवित्र स्थानांत एकंदर २६० नौकर आहेत. व २२ देवड्या, १२ मोठे घुमट, १७२ सोन्याचे लहान मनोरे असून येथील एकंदर खर्च दरसाल ३० लाख तुर्की रुपयांचा आहे.

---

## भाग ८ वा.

## अकबराबादची ( आग्र्याची ) दुसरी स्वारी, निरनिराळीं शहरें पहाणें व नबाब शिकंदर बेगम यांचें मरण.

कर्नल **रिचर्ड-जान मीड एजंट गव्हर्नर जनरल सेंट्रल इंडिया** यांनीं **इंदुराहून** ता० १४ आगष्ट स० १८६६ रोजीं आमच्या मातोश्रीस पत्र पाठविलें कीं, **व्हाईसराय** व **गव्हर्नर जनरल ग्र्यांड मास्टर आफ धी मोस्ट एक्झाल्टेड् आर्डर आफ धी स्टार आफ इंडिया** हे ता० १० नवंबर रोजीं **आग्रा** येथें दरबार भरवून वरील **आर्डरच्या** कांहीं **नाईट** लोकांना पदव्या देण्यांत येणार आहेत, असें लिहून आलें आहे. व आपणांसही दरबारास येण्याचें निमंत्रण आहे. करितां आपण **व्हाईसराय** साहेबांची भेट दरबारांत घ्यावी व शिवाय आपण या **आर्डरचे**

**ग्र्यांड कमांडर** असल्यानें **ग्र्यांड मास्टर** यांच्या बरोबर अशा दरबारांत हजर राहणें फार योग्य व भूषणास्पद होणार आहे. याच्या जबाबांत, दरबारांत हजर राहण्यास आह्मी फार खुषी आहोंत, ह्मणून लिहून पाठवून चालीप्रमाणें **भोपाळचे पोलिटिकल एजंट** मेजर **आस्बोर्न** यांच्या सल्ल्यानें **आग्र्यास** जाण्याची तयारी केली. ता० १९ जमादिलावल सन १२८३ रोजीं डेरे राहुट्या पुढें रवाना करून ता० २१ रोजीं आपले कारभारी व आप्त इष्ट बरोबर घेऊन **बेगम** साहेब स्वतः रवाना झाल्या. त्या ता० २१ जमादिलाखर रोजीं **आग्र्यास** पोंचल्या. ता० १० नवंबर रोजीं शनिवारीं सायंकाळीं **गव्हर्नर जनरल** साहेब **कलकत्याहून** आगगाडींतून आले. व १२ व्या तारखेस प्रत्येक संस्थानिकाची खानगी दरबारांत भेट घेऊन सर्वांना ता० १९ नवंबर रोजीं होणाऱ्या दरबारास निमंत्रण केलें. त्या दिवशीं सर्व राजेलोक जमल्यावर **गव्हर्नर जनरल** साहेब स्वतः आले, व त्यांनीं सर्वत्रांस उद्देशून भाषण केलें तें:—

"महाराज, राजे, व सरदार लोकहो, आपण आज येथें मजपुढें एकत्र "जमलेले पाहून मला फार समाधान वाटतें. या **ताजमहाला**विषयीं "प्रसिद्ध असलेल्या नामांकित शहरांत आपण आलां आहांत, याबद्दल "मी फार खुषी आहें. शिवाय ज्या थोर **बादशहा**वरून याला **अ-** "**कबराबाद** असें नांव पडलें त्याची हें शहर पूर्वीं राजधानी होतें.

"आपण असें एकत्र जमणें हें आपल्यास फार चांगलें आहे. एथें "जमलेल्या इतक्या दरजाबदरजाच्या राजे व संस्थानिक लोकांस प्रत्यक्ष "पाहून त्यांची ओळख करून घेणें **महाराणी** सरकारचा **प्रतिनिधि** "या नात्यानें मला फार फार फायद्याचें आहे. व आपणां सर्वांस मा- "झ्याशीं समक्ष बोलण्यास संधि सांपडावी व आपापल्या राज्याच्या व्यवस्थे- "संबंधानें माझे विचार व हेतु काय आहेत ते तुह्मांस समक्ष कळावे हें- "ही रास्त आहे.

"शहाणपणानें व चांगल्या प्रकारें राज्य करण्याची कला कठिण "आहे. ती पुष्कळ विचार, काळजी, व श्रम केल्यानेंच साध्य होणारी

"आहे. **हिंदुस्थानां**तील थोड्याच राजे व संस्थानिकांच्या अंगीं हे
"अवश्य गुण सांपडतील. कारण त्यांनीं लहानपणीं शिकण्याची, अ-
"भ्यास करण्याची, व कोणतीही गोष्ट स्वतः करण्याची काळजी घेतली
"नसते, इतकेंच नव्हे, तर आपल्या पाठीमागून गादीवर येणाऱ्या आ-
"पल्या मुलांनाही योग्य शिक्षण व माहिती देण्याची व्यवस्था ते करीत
"नाहींत. यामुळें एखादा संस्थानिक मरण पावल्यावर त्याच्या विषयीं
"तो शहाणा व चांगला असल्याबद्दल क्वचितच उद्गार ऐकूं येतात.
"थोर लोक जिवंत आहेत तोंपर्यंत त्यांचे स्नेही व आश्रित त्यांची, त्यांच्या
"अंगीं नसल्या गुणांबद्दल तारीफ करितात. परंतु मेल्यावर खरी स्थिति
"बाहेर पडते. अशा लोकांची तारीफ लोक करतील त्या सर्वांत न्यायी व
"लोकहितकारी राज्यकर्त्यांची जी तारीफ होते, तीच योग्य व मिळव-
"ण्यालायक तारीफ समजली पाहिजे. मोठमोठीं राज्यें काबीज कर-
"णाऱ्या व शूर राजांच्या नांवांचा विसर पडून गेला असून सद्गुणी व
"शाहाण्या राजे लोकांचीं नांवें मात्र चिरकाल राहिलीं आहेत.

"हिंदुस्थानांतून लढायांचे व दंग्याधोप्याचे दिवस पार नाहींसे झाले.
"ते पुनः परत न येवोत. अशी उमेद आहे. परंतु ते दिवस हल्लीं एथें
"जमलेल्या संस्थानिकांतून कित्येकांस स्वतः पाहिल्याचें आठवत असेल.
"व सर्वांनीं त्या काळच्या गोष्टी ऐकिल्या असतील कीं, पूर्वीं हिंदुस्थानांत
"राजाचा राजवाडा किंवा गरिबाची झोंपडी, व हिंदूंचीं अति पवित्र दे-
"वालयें, किंवा मुसलमानांच्या मशिदी यांतून एकही स्थळ लुटारू व वि-
"ध्वंस करणाऱ्या लोकांच्या तडाक्यांतून सुरक्षित नव्हतें. त्या दिवसांत
"सबंध प्रदेशाचे प्रदेश एकसारखे उध्वस्त व दुःखग्रस्त असत, व मोठ-
"मोठ्या प्रदेशभर, एखाद्या खेड्यांतही क्वचितच दिवा लागलेला आ-
"ढळून येई. इंग्रज सरकारानें हें सर्व नाहींसें केलें आहे. आतां उ-
"जाड किंवा वैराण देश, जंगली जनावरांच्या वस्तीस मात्र योग्य असा
"देखील राहिला नाहीं. आतां पुष्कळ अंशीं देशभर गजबजलेलीं खेडीं
"झालीं आहेत. व शेतकीच्या योगानें संपन्नताही आली आहे. व इं-

"ग्रज सरकाराच्या आश्रयाखालीं हल्लीं सर्व लोक बऱ्याच अंशीं स्वस्थ-
"पणानें राहत आहेत.

"पुष्कळ अंशीं हिंदुस्थानाची अशी स्थिति निःसंशय आहे ही गोष्ट
"खरी आहे. तथापि या देशांतील निरनिराळ्या भागांची स्थिति आ-
"पण बारकाईनें पाहूं गेलों असतां अद्याप पुष्कळ जुलूम व अन्याय होत
"असल्याचें, कांहीं व्यक्तिमात्रांस विशेष दुःख असल्याचें, व पुष्कळ
"गुन्हेगारांस शिक्षा मिळत नसल्याचें दिसून आल्यावांचून राहणार
"नाहीं. **इंग्रज** सरकारापासून आपल्या संस्थानास बाह्य उपसर्गापा-
"सून जी शांतता व स्वस्थता मिळाली आहे, तिचा आपण आपल्या प्र-
"जेंत प्रसार केला पाहिजे. आपल्या राज्याचें काम स्वतः पाहणाऱ्यावां-
"चून दुसऱ्याच्या हातून ही गोष्ट होणार नाहीं. व त्यांनाही हें क-
"रण्यास हमेषा काळजी बाळगून देखरेख ठेविली पाहिजे. खरोखर म-
"नावर घेतील तर तसें करण्यास त्यांना पुष्कळ वेळ सांपडणार आहे.
"संस्थानिकांना त्यांच्या ख्यालीखुशाली व आरामाकरितां पाहिजे ति-
"तका वेळ सांपडतो. व पुष्कळांना तर इतकी फुरसत आहे कीं त्यांना
"काय करावें हें सुचत नाहीं. कांहीं आपल्या शेजाऱ्याबरोबर भांडण्यांत
"किंवा आपल्या मांडलिकाबरोबर भांडण्यांत किंवा याहीपेक्षां कमी
"उपयोगी कामांत वेळ व्यर्थ गमवितात.

"जर एखाद्या संस्थानिकानें आपल्या राज्याची लक्षपूर्वक स्वतः व्य-
"वस्था ठेवण्याचें काम आळसावर टाकलें तर त्याचे नायब तें काम ब-
"राबर करतील अशी उमेद त्यांस कशी धरतां येईल? राज्यव्यवस्था
"चांगली चालण्याला चांगले कायदे, व चांगले पसंत केलेले कामगार,
"व त्यांच्यावर लक्षपूर्वक देखरेख, इतक्या गोष्टी अवश्य आहेत. त-
"सेंच दक्ष पोलीस, व व्यवस्थित वसुलाचा बंदोबस्त, हेंही असलें पा-
"हिजे. ह्मणजे प्रजा निर्धास्त राहून त्यांना त्यांच्या उद्योगाचें फल उ-
"पभोगण्यास सांपडतें. कांहीं संस्थानिकांना कर्ज असल्यानें मीं सांगितल्या-
"प्रमाणें वागण्यास कदाचित् जड जाईल. परंतु दुसऱ्यांना पुष्कळ उ-

“त्पन्न आहे. प्रत्येकास माझें सांगणें ह्मणून इतकेंच कीं, त्यानें आपल्या
“शक्तीप्रमाणें व्यवस्था करण्यास झटावें. आपणांतील कांहीं संस्थानिक
“एकमेकांपुढें आपली जागा असावी अशाबद्दल झटतात. हल्लीं मि-
“ळालेल्या दरजामुळें आपणास वाईट वाटतें, परंतु यापेक्षां सर्वांत श-
“हाणपणानें आपल्या राज्याची व्यवस्था कोण चांगली ठेवितो, तें दाख-
“विण्याविषयीं चुरशीनें झटला तर किती बरें होईल? यामध्यें सर्वांस
“आपली योग्यता दाखविण्यास साधन आहे. जो संस्थानिक आपल्या प्र-
“जेचें सर्वांत उत्तम तऱ्हेनें पालन करील, जो आपल्या राज्यांत गुन्हे न
“होऊं देण्याविषयीं व देशाची स्थिति सुधारण्याविषयीं झटेल, त्याचाच
“इंग्रज सरकार जास्त मान ठेवील. या दरबारांतही अशा तऱ्हेनें ज्यांनीं
“कीर्ति मिळविली आहे, असे संस्थानिक आहेत. **महाराज शिंदे** व
“**भोपाळच्या बेगम** हे त्यांतच नांव घेण्यासारखे आहेत. **जावऱ्याचे**
“**नबाब गोष महंमदखान,** हे शहाणे व दयाळू स्वभावाचे अस-
“ल्याचें आह्मीं ऐकिलें आहे. त्यावरून, ते नुकतेच वारल्याची खबर
“ऐकून आह्मांस वाईट वाटलें. **माळव्यांत सीतामहू** येथील राजा ९०
“वर्षांचा असूनही त्यानें आपल्या संस्थानाची व्यवस्था चांगली ठेविली
“आहे, असें समजतें. **जयपूर** प्रांतांतील **खेत्री** एथील राजानें आपल्या
“संस्थानाची शहाणपणानें व्यवस्था ठेवल्यानें त्याबद्दल त्याचा प्रसिद्ध-
“पणानें बहुमान केला गेला आहे. एखाद्या संस्थानिकाचा चांगुलपणा
“माझ्या कानीं येतो त्या वेळीं मला मोठा आनंद होतो. व इतर संस्था-
“निकांनीं त्याचें अनुकरण करावें, ह्या हेतूनें मी ही गोष्ट सर्वत्र जाहीर
“होण्याविषयीं खटपट करितों.

“पूर्वी राजे व संस्थानिक लोकांस, आपल्या देशाच्या उन्नतीच्या आड
“येणारे प्रतिबंध नाहींसे करण्याची कल्पनाच नव्हती. ते बहुधा दु-
“र्गम व कठीण अशा जागीं आपल्या राजवाड्याभोंवतीं तऱ्हतऱ्हेचे
“किल्ले, कोट, बांधून राहत होते. व त्यांतून ते क्वचितच बाहेर पडत
“असत. व बाहेर पडत तेव्हां बरोबर जमवतील तितके शिपाई व ह-

"त्यारबंद लोक बाळगीत. इतर ठिकाणच्या वर्णनीय गोष्टी पाहण्याक-
"रितां प्रवास करण्याची कल्पनाच त्यांच्या मनांत येत नव्हती. व
"आलीच तर ती अगदीं दुःसाध्य समजून सोडून देत. हल्लीं **हिंदुस्था-**
"**नां**तील राजे लोकांस आपल्या देशापासून पुष्कळ लांब इकडे तिकडे
"फिरण्यास अगदीं शंका नाहीं. व कांहीं संस्थानिक तर आपल्या रा-
"ज्यांत सर्वत्र चांगले रस्ते तयार करण्याइतके समजदार व दूरदर्शी
"झाले आहेत, व कांहीं याकरितां सालीना नेमणूकही देताहेत. इ-
"तर संस्थानिक त्यांचें उदाहरण घेतील, व रस्ते, कालवे, व विहिरी
"वगैरे तयार करून आपले व आपल्या प्रजेचे फायदे करण्यास झटतील
"अशी मला उमेद आहे.

"आतां पुनः एकवार आपले सर्वांचे **आग्र्यास** आल्याबद्दल आभार
"मानून व आपण जें कांहीं पाहिलें, व ऐकिलें आहे, व एथें जो आपला
"मानमरातब ठेवला गेला आहे त्यावरून हा दरबार आपल्या फार
"दिवस ध्यानांत राहील अशी उमेद बाळगून मी आपलें बोलणें पुरें क-
"रितों. माझा एकच हेतु आहे, तो हा कीं, आपण आपल्या प्रजेचें चां-
"गलें पाळण करून आपलें सुयश व प्रजेचें सुख वाढवावें."

नंतर दरबार खलास झाला. व ता० २२ नोव्हेंबर रोजीं **गव्हर्नर जनरल आग्र्याहून ग्वाल्हेरीस** जाण्यास निघाले. व सर्व संस्थानिक लोक परत गेले. ता० २३ नोव्हेंबर रोजीं आमच्या मातोश्री आगगाडींतून **शहाजहानाबाद** पहाण्यास गेल्या. ता० १ दिसेंबर रोजीं **आ-ग्र्यास** परत येऊन ४ थ्या तारखेस **फत्तेपूर शिक्री** येथें येऊन, तेथून ८ वे तारखेस **भरतपूर** एथें जाण्यास निघाल्या. व १० व्या तारखेस **दीग,** १२ व्या तारखेस **गोवर्धन,** व १९ वीस **मथुरा** एथें राहून, १९ वे तारखेस **आग्रा** एथें परत आल्या व २२ व्या तारखेस तेथून निघून २४ व्या तारखेस **धोलपूर** व २८ सावीस **ग्वाल्हेर.** २ ऱ्या तारखेस **दतिया,** ९ वीस **झांशी,** व २३ वे तारखेस **भोपाळ** इलाख्यां-

तील **सेंवास** या गांवीं येऊन ता० ९ फेब्रु० सन १८६७ रोजीं **भो-पाळास** सुखरूप पोंहचल्या.

या स्वारींत हमेषापेक्षां जास्ती खर्च झाला. **गव्हर्नर जनरल** यांना नजर २७१३९ रुपये किंमतीची केली. व एकंदर वाटखर्च ७९०७० मिळून १०२२०९ रु० खर्च झाला.

**फत्तेपूर आग्र्या**पासून १२ कोस व **दीग**पासून २९ कोस आहे. व **दीग**पासून **गोवर्धन** ६ कोस आहे. या स्थळांविषयीं थोडीशी माहिती येणेंप्रमाणें:—

**फत्तेपूर शिक्री** येथील दगडाच्या इमारती फार सुंदर असून **अकबर** बादशहाच्या वेळच्या आहेत. किल्ल्यांत एक दगडी मशीद आहे. तिच्या आंगणांत (चौकांत) **शेख सलीम चिस्ती** याची कबर आहे. तींत एक जाळीदार संगमरवरी पडदा नाजूक व फारच सुंदर आहे. व आंतल्या बाजूस मोत्यांच्या शिंपांच्या तुकड्यांचें नक्षीदार काम केलें आहे. आंगणांत पाण्याचा एक हौद आहे. व आंगणाच्या दक्षिण बाजूस एक फार उंच व भव्य कमानी दरवाजा आहे. त्यावरून **आग्र्याचा ताजमहाल** दिसतो. या दरवाज्याबाहेर आणखी एक हौद आहे. याशिवाय **अकबराच्या** दरबारांतील राजा **बीरबल,** वगैरे लोकांच्या पुष्कळ इमारती आहेत. परंतु त्या पडलेल्या व बेमरामत आहेत. जागजागीं पुष्कळ पाण्याच्या नाळी व टांकीं आहेत. या मशिदीवर व कबरीवर पुढील लेख लिहिला आहे:—

"आपलें राज्य भरभराटीस आणणाऱ्या **अकबर** बादशहाच्या कारकिर्दींत **शेख उल् इसलाम** यानें ही मशीद बांधली. ती **काबा**-प्रमाणेंच सुंदर आहे. ही मशीद ज्या वर्षीं पुरी झाली त्या वर्षानें जणों एक दुसरी **मेहजत् उल् हरम**च तयार झालेली पाहिली." "धर्माचा वकील व पवित्र गुरु **शेख सलीम,** ज्याचा चांगुलपणा व पवित्रपणा **जनेद** व **तैफूर** यांच्याप्रमाणें आहे तो, **चिस्त**च्या कुलांत कुलदीपक असून **फरीद गनषकर** याचा तो परम प्रिय पुत्र आहे." "डोळ्या-

वर धूर येऊं देऊं नकोस. स्वतःविषयींच विचार करूं नकोस, परंतु ईश्वराच्या ठिकाणीं दृढ भाव ठेव." यावरून त्याच्या मरणाचें साल सर्वांस कळेल.

**दीग, भरतपूरवाल्याच्या** अमलाखालीं आहे. तेथील दगडी इमारती व रमणीय पुष्पवनें फार सुंदर आहेत. तेथें एक पांढरी संगमरवरी इमारत आहे. तिच्यांत शेंकडों कारंजीं आहेत. या कारंज्यांस पाण्याचा पुरवठा एका मोठ्या तलावांतून होतो. त्याच्या चारी कोंपऱ्यांत चार विहिरी आहेत. तेथून मादग्यांत पाणी येतें. सर्व कारंज्यांतून पाणी उडत असतांना सूर्याचे किरण पाण्यांतून चमकतात त्या वेळीं लहानसें मजेदार इंद्रधनुष्य दिसतें. येथील इमारती पाहण्यासारख्या आहेत. परंतु त्या हिंदु तऱ्हेच्या आहेत. व त्यांतील कोठड्या लहान लहान व ठेंगण्या आहेत.

**गोवर्धन** नांवाची एक टेंकडी आहे. तिला प्रदक्षिणा करणें हिंदुधर्माप्रमाणें मोठें पुण्यकारक मानिलें आहे. या टेंकडीसभोंवतीं रस्ता आहे. कांहीं लोक या प्रदक्षिणा, पायानें चालत, कांहीं नमस्कार घालीत व कांहीं हात जोडून अशा करितात. या टेंकडीवर एक लहानसें पक्कें टाकें आहे. त्याच्या कांठीं सुमारें पुरुषभर उंचीचा दगड पुरलेला आहे. त्याला या टेंकडीचा शिखामणी समजतात. व त्याची पूजा करितात.

या स्वारींतून परत आल्यावर आमच्या मातोश्रीची प्रकृति बिघडत चालली. त्यांना गुल्मरोग झाला होता. त्याच्यावर इंग्रजी व युनानी दोन्ही वैद्यांनीं पुष्कळ उपाय केले. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. रोग बळावतच चालला. त्यांची प्रकृति क्षीण होत जाऊन शेवटीं ता० १३ रज्जब सन १२८९ रोजीं सायंकाळीं या नश्वर भूलोकांतून त्यांनीं प्रयाण केलें! त्या वेळी त्यांचें वय ९१ वर्षें ८ महिने व १९ दिवसांचें होतें. दुसरे दिवशीं सकाळीं ८ वाजतां त्यांना, त्यांनींच तयार केलेल्या **फरहत् अफजा** नांवाच्या बगीच्यांत पुरलें. त्यांच्या इच्छेस अनुसरून त्यांचें दफन अगदीं शास्त्रमताप्रमाणें केलें. त्यांच्या थडग्यावर घुमट बांधला नाहीं. त्याच्या भोंवतीं पांढरा

संगमरवरी जाळीचा कठडा मात्र उभा केला आहे. **महाराणी** सरकारांनीं आह्मांस दुखवट्याचें पत्र पाठविलें. व आह्मी गादीवर बसल्याबद्दल **इंग्लंडाहून** आनंदप्रदर्शक पत्रेंही आलीं. त्यावरून आमचा फार बहुमान झाला.

आमच्या मातोश्रींनीं आमच्या राज्यांतील सरदार लोकांशीं इमान ठेवून त्यांच्याकडे त्यांच्या जहागिरी चालविल्या. राजनिष्ठ लोकांचा बहुमान करून त्यांना पदव्या दिल्या. आमच्या आप्तवर्गाशीं त्यांचें वर्तन प्रेमाचें होतें. मोठ्या दूरदर्शीपणानें त्यांनीं आपल्या सनदांत पुस्त दरपुस्त असें लिहिण्याचा पूर्वीचा पाठ होता तो मोडून ताहायात हीं अक्षरें लिहिण्याचा पाठ घातला. आमच्या मातोश्री वारल्या त्याच सालीं **दिल्ली**चा घलीष किंवा कवि **असदउल्लाखान,** ज्याच्या वरून **अरफी** व **नजीरी** यांच्या काळचें स्मरण होई, तो तारीख २ जिल्काद रोजीं, व इतर प्रसिद्ध विद्वान लोक याच सालीं वारले. त्याचप्रमाणें **अफजुल उद्दवला, थनियत अलीखान, हैदराबाद**चे निजाम, हेही त्याच महिन्याच्या १४ व्या तारखेसपरलोकवासी झाले. हा एक चमत्कारिक मेळच ह्मणावयाचा.

---

## प्रकरण ३.

### भाग १ ला.

आमचा जन्म तारीख २० जुलई सन १८३८ इसवी रोजीं **इस्लामनगर**च्या किल्ल्यांत झाला. तारीख ४ जानेवारी सन १८४७ इसवी रोजीं आह्मांस गादीवर बसविलें. तारीख २९ एप्रील रोजीं आमच्या मातोश्रींनीं आमचे कान टोंचविण्याचा समारंभ मोठ्या थाटानें व आनंदानें ला. तारीख २४ मे सन १८९० रोजीं शुक्रवारीं आह्मीं सर्व **कुराण** वाचण्याचें संपविल्याबद्दल मोठा उत्साह होऊन पुष्कळ मेजवान्या दिल्या गेल्या. नेहमींच्या परिपाठांतील फारशी पुस्तकें आह्मीं सर्व वा-

चलीं, व लिहिणें, वाचणें, जमाखर्च व राज्याच्या हक्कासंबंधी माहिती करून घेतली.

पूर्वी वर्णन केल्याप्रमाणें आमच्या लग्नाचा समारंभ झाला. व तारीख ९ जुलई सन १८५८ इसवी रोजीं नबाब **सुलतान जहान बेगम** इचा जन्म झाला. तारीख १ मे सन १८६० इसवी रोजीं आह्मीं खुषीनें राज्याधिकार सोडून आमच्या मातोश्रीकडे सोंपविला. व युवराजत्व पत्करिलें. इ० स० १८६१ त **मान जहान बेगम** इचा जन्म झाला. ती इ० स० १८६६ त दुर्दैवानें मरण पावली. तिची कबर **नूर बागें**त आहे. **सुलेमानी** शाळा व मशीद तिचें नांव राहण्याकरितां बांधल्या आहेत.

तारीख २१ सफर सन १२८४ हिजरी रोजीं नबाब **बाकी महंमदखान** मरण पावले. ते **मक्केस**च आजारी पडले, व तशा स्थितींतच **भोपाळास** परत आले. त्यांना युनानी व इंग्रजी वैद्यांपासून कांहीं आराम झाला नाहीं. त्यांना त्यांच्या बागेंत पुरलें आहे. तारीख १३ रज्जब सन १२८९ हिजरी रोजीं आमच्या परम पूज्य मातोश्री स्वर्गवासी झाल्यावर त्यांच्या करितां तीन दिवसपर्यंत सर्व सरकारी कामकाज बंद ठेवलें होतें. याबद्दल इंग्रज कामगारांनींही फार दुःख प्रदर्शित केलें. **झिहोरास पोलिटिकल एजंट** असतात त्या ठिकाणीं व इंदूर येथें **एजंट गव्हरनर जनरल** राहतात त्या ठिकाणीं इंग्रजी रिवाजाप्रमाणें दुकानें व कचेऱ्या वगैरे बंद ठेवून दुःख प्रदर्शित केलें गेलें. प्रत्येक मनुष्यास असा शेवटचा दिवस कधीं तरी एकवार येणारच आहे. व **ईश्वर** आपल्यास ठेवील तसें राहणें योग्य आहे. असा विचार करून तीन दिवस झाल्यावर तारीख १७ रज्जब रोजीं सर्व राज्याचा कारभार आह्मीं आपल्या शिरावर घेतला.

तारीख १६ नवंबर सन १८६८ इसवी रोजीं मंगळवारीं कर्नल **आस्बोर्न**, सी. बी. **पोलिटिकल एजंट भोपाळ** व कर्नल **मीड एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांनीं **भोपाळास** मेहरबानगीनें स-

काळचे सात वाजतां आह्मांस गादीवर बसवून **गव्हरनर जनरल** यांच्या कडून आह्मांस मालक कबूल केल्याबद्दलचा व नबाब **सुलतान जहान बेगम** इजला युवराजत्व कबूल केल्याबद्दलचा खलिता माझ्या हातीं दिला. नंतर तोफांची सलामी उडाली. राज्यांतील कामगारांनीं व आमच्या कुटुंबांतील मंडळींनीं मला नजरा केल्या. आणि मी व **सुलतान जहान बेगम** यांनीं दरबारांत संभाषणें केलीं. त्या वेळीं जे इंग्लिश गृहस्थ हजर होते त्यांनीं मला अधिकार मिळाल्यामुळें आपल्यास फार आनंद झाल्याचें बोलून दाखविलें. **भोपाळास** मला गादीवर बसविल्याबद्दल जाहिरनामे प्रगट केल्यानंतर, **एजंट साहेब** निरोप घेऊन **शिहोरास** व **इंदुरास** परत गेले. मीं दरबारांत भाषण केलें तें येणेंप्रमाणेंः—

ज्यानें मला नबाब **सिकंदर बेगम** यांच्या पोटीं जन्मास घातलें, त्या **ईश्वराची** मी फार आभारी आहें. **सिकंदर बेगम** साहेब राज्यनिष्ठ, दृढनिश्चयी, दूरदर्शी, राज्यकारभारांत फार दक्ष व हुषार असल्याबद्दल **इंग्रज** सरकारांनीं खात्री करून घेतली आहे. **इंग्लंड** व **हिंदुस्थान** देशाची सार्वभौम स्वामिणी **व्हिक्टोरिया** व त्यांचें मंत्रीमंडळ यांनीं नबाब **सिकंदर बेगम** यांस प्रथम त्यांचे वडील **नजीर उद्दवला** नबाब **नजर महंमदखान** यांच्या मागें गादीवर बसवून राज्याचे मालक केलें. दुसरें, त्यांची योग्यता, राजनिष्ठा, व विश्वास, पूर्णपणें कसोटीस लागलेला पाहून त्यांना **भेरसिया** परगणा व **स्टार आफ इंडिया** हा किताब देऊन त्यांचें नांव पहिल्या प्रतीच्या मांडलिकांत घालून त्यांची योग्यता वाढविली. तसेंच नबाब **सिकंदर बेगम** यांनीं होईल तेथवर राज्यकारभार उत्तम चालवून आपल्या कन्येचें कल्याण केल्याबद्दल **व्हाइसराय** साहेबांनीं त्यांची फार तारीफ केली आहे. व **आग्रा** येथील दरबारांत जमलेल्या सर्व मोठमोठ्या राजेलोकांसमक्ष **व्हाइसराय** साहेबांनीं त्यांची राज्यकारभार करण्याची शैली इतर सर्वत्रांस कित्ता घेण्याजोगी असल्याबद्दल बोलून दाखविलें. व सर्वांपेक्षां त्यांचा मान मरातब

जास्त ठेविला. याबद्दलही माझ्यावर त्यांचे फार उपकार आहेत. **व्हाइसराय** साहेबांनीं मला त्या जागीं गादीवर कायम केलें आहे.

'कर्नल **मीड एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांनीं आमच्या विनंतीस मान देऊन **भोपाळास** स्वतः येऊन ज्याप्रमाणें **सर रिचमंड शेक्सपियर** साहेबांनीं नबाब **सिकंदर बेगम** यांस गादीवर बसवून मला युवराज कबूल केलें त्याचप्रमाणें नबाब **सुलतान जहान बेगम** यांस युवराजत्व देण्याचा समारंभ केल्याबद्दल मी त्यांची फार आभारी आहें. तसेंच **भोपाळचे पोलिटिकल एजंट** कर्नल **आस्बोर्न** साहेब यांनीं नबाब **सिकंदर बेगम** आजारी असल्यावेळीं फार परिश्रम घेऊन उत्तम वैद्य लोक त्यांच्याकरितां जमा केले, व त्या मृत्यु पावल्यानंतर लागलीच **हिंदुस्थान** सरकारास त्याबद्दल शिरस्त्याप्रमाणें खबर दिली याबद्दल व त्यांनीं **सिकंदर बेगम** यांना ज्याप्रमाणें हमेषा मदत दिली, त्याचप्रमाणें मलाही देण्याचा क्रम चालू ठेविला. व पूर्वीप्रमाणें सर्व मानमरातब कायम ठेवल्याबद्दल मी त्यांचे फार आभार मानतें. आमचे सार्वभौम **राणीसरकार** व त्यांचे मंत्री यांनींही मजवर जी मोठी मेहरबानी केली ती मी जन्मभर लक्षांत ठेवीन. आतां परम दयाळू **परमेश्वरा**जवळ माझी येवढीच प्रार्थना आहे कीं, माझ्या मातोश्रीप्रमाणेंच माझेंही सर्व आयुष्य, **इंग्रज** सरकाराशीं राज्यनिष्ठेनें वागण्यांत, राज्यकारभार सुधारण्यांत व माझ्या प्रजेचें कल्याण करण्यांत जावो.

माझ्या नेत्रांस आनंद देणारी कन्या चिरंजीव **सुलतान जहान बेगम** इनें दरबारांत संभाषण वाचलें तें—मला इतक्या महत्वास व योग्यतेस ज्यानें चढविलें त्या परम दयाळू **परमेश्वराचे** मजवर अनंत उपकार आहेत. **व्हाइसराय** व **गव्हरनर जनरल** साहेब व **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** व **पोलिटिकल एजंट भोपाळ** यांनीं मला युवराज करून नबाब **शहाजहान बेगम** यांस **भोपाळचे** नबाब केलें. याबद्दल मी या सर्वत्रांचे फार आभार मानतें व जन्मभर

परम उदार **परमेश्वर** मला **इंग्रज** सरकाराशीं राज्यनिष्ठपणानेंच वागवो, अशी माझी त्यास प्रार्थना आहे.

कर्नल **आर. जे. मीड.** सी. एस्. आय. **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांनीं **भोपाळ**च्या राज्यांतील सर्व प्रजा व सरदार लोकांस जाहिरनामा प्रसिद्ध केला तो—' सर्व लोकांस जाहीर व्हावें कीं, नबाब **जहानगीर महंमदखान** यांच्या मरणानंतर तारीख ४ डिसेंबर सन १८४६ इसवी रोजीं नबाब **शहाजहान** बेगम यांना **भोपाळ**च्या गादीवर बसविलें जाऊन, त्या वयांत येत तोंपर्यंत त्यांच्या मातोश्री नबाब **सिकंदर** बेगम यांना **रीजंट** नेमिलें व तारीख २० सन १८५९ इसवी रोजीं नबाब **शहाजहान** बेगम वयांत आल्यावर राज्याचा कुलकारभार त्या स्वतः करूं चाहतात किंवा नाहीं याबद्दल त्यांना समक्ष विचारण्याविषयीं **भोपाळचे पोलिटिकल एजंट** मेजर **हचिन्सन्**साहेब यांच्याकडे लिहून गेल्यावर **बेगम** साहेबांनीं कळविलें कीं, आह्मी राज्याचा कुलअधिकार नबाब **सिकंदर** बेगम यांच्या जीवमानपर्यंत त्यांच्याकडे खुषीनें सोंपवून दिला आहे. पुढें या संबंधांत त्यांनीं एक शिरस्त्याचें पत्र तारीख १३ डिसेंबर सन १८५९ रोजीं **सर रिचमंड शेक्सपियर एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांच्याकडे पाठविलें कीं, **इंग्रज** सरकारांनीं नबाब **सिकंदर** बेगम यांच्यावर मेहरबानी करून त्यांना **रीजंट**पणाचा योग्य मानमरातब देणें, व दुसरें त्यांस राज्याचे मुख्य अधिकारी करणें या दोन गोष्टी मान्य कराव्या. त्यावरून त्या पत्राचा आशय **गव्हरनर जनरल** साहेबांकडे लिहून पाठविल्यावरून त्यांनीं **एजंट गव्हरनर जनरल** यांना नबाब **सिकंदर** बेगम यांस त्यांच्या जीवमानपर्यंत राज्याचे मुख्य अधिकारी मान्य करून **भोपाळ**च्या राज्यांतील प्रजा, कामगार, व सरदारलोक यांत ही गोष्ट जाहिरनाम्यानें प्रसिद्ध करावी. नबाब **शहाजहान** बेगम यांना **युवराज** ठरवून त्यांच्या संततीसच पुढें गादी मिळावी असें ठरविलें असूनही व्यवस्था कायम ठेवण्याची **इंग्रज** सरकार हमी घेत आहे. याप्रमाणें तारीख **१७ डिसेंबर** सन १८५९

इसवी रोजीं **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांच्याकडून एक जाहिरनामा प्रसिद्ध केला गेला व तारीख १ मे सन १८६० इसवी रोजीं नवाब **शहाजहान** बेगम यांच्या लेखी कबुलायतीप्रमाणें **सरकाराच्या** मंजुरीनें नवाब **सिकंदर** बेगम यांना **भोपाळ**च्या गादीवर बसविलें. त्यांनीं शेवटपर्यंत राज्यकारभारांत पूर्ण दक्षतेचें व न्यायी असेंच वर्तन कायम ठेविलें. हल्लीं नवाब **सिकंदर** बेगम स्वर्गवासी झाल्याचें **सरकारास** समजल्यावरून नवाब **शहाजहान** बेगम यांस पुनः दुसऱ्यानें राज्याचे मालक करून त्यांची कन्या नवाब **सुलतान जहान**-बेगम यांस **युवराज** व त्यांच्याच संततीचा पुढें गादीवर हक्क असल्याचें ठरविण्यांत आलें आहे. सबब आज या भरदरबारांत, कामगार, मोठे लोक, सरदार, व भाऊबंद यांच्या व **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** व **भोपाळचे पोलिटिकल एजंट** यांच्या समक्ष **शहाजहान** बेगम यांस गादीवर बसवून नवाब **सुलतान जहान** बेगम यांस **युवराज** ठरविलें आहे. याकरितां या जाहिरनाम्यानें **भोपाळ** संस्थानांतील सर्व प्रजा, सरदार, भाऊबंद, जहागीरदार, व कामगार लोक यांस ही गोष्ट जाहीर करून त्यांनीं नवाब **शहाजहान** बेगम यांनाच गादीचे मालक समजून त्यांचे हुकूम राज्यनिष्ठेनें, तत्परतेनें व उत्साहानें बजावीत जाण्याबद्दल समज दिली जात आहे.'

गादीवर बसण्याच्या संबंधाचे सर्व विधि उरकल्यावर मी राज्याचें रोजचें चालू काम व कुलअधिकार आपल्याकडे घेऊन काम चालवूं लागलें. रमजान महिन्यांत रीतीप्रमाणें उपास व प्रार्थना वगैरे केल्या, शावाल महिन्यांत इंग्रजी साहेब लोकांस व आमचे भाईबंद, आप्त, इष्ट, सरदार व राज्यांतील मोठमोठे लोक यांस गादीवर बसल्याबद्दलची मेजवानी दिली, त्या संबंधी तपशील लिहिण्यांत हांशील नाहीं.

नंतर खजीन्याची तपासणी केली व नवाब **सिकंदर** बेगम यांच्या तोषाखान्यांतील जवाहीर व कपडे वगैरेंची गणती केली. सुमारें ७३००० रुपये किंमतीचे जडावाचे दागिने आमच्या मातोश्रींनीं पसंत करून ठेवून

घेतले होते. परंतु त्यांची प्रकृति बिघडल्यामुळें त्यांच्या किंमतीचा ठराव झाला नव्हता. ते विकत घेण्याची जरूर न दिसल्यामुळें परत केले, व त्यांच्या जहागिरीस १८७७०० व दवलतीस ५५२७५० रुपयांचें मिळून एकंदर ७४०४५० रुपये इतक्या रुपयांचें कर्ज होतें, तें हप्तेबंदीनें फेडण्याची व्यवस्था केली.

**सिकंदर** बेगम साहेबांच्या कारकिर्दीच्या शेवटच्या चवदा वर्षांत उत्तर हिंदुस्थानांत फिरायास गेल्यामुळें, व मक्केच्या यात्रेमुळें व प्रकृति नीट न राहिल्यामुळें, चौकशी करून निकाल करण्यास सवड न सांपडल्यामुळें, मुलकी, दिवाणी व फौजदारी खटल्यासंबंधीं व वकीलकचेरीकडील व जिल्हांच्या **नाजिमा**कडील व **भोपाळ**च्या सायरीकडील रिपोर्ट, अर्ज्या, व पत्रें, मिळून एकंदर ४०८६ कागद शिलक होते. यामुळें पक्षकार लोक फार बोभाट करीत होते. हे सर्व कागद नीटपणें स्वतः पाहून त्यांजवर निकाली हुकूम दिले. शिवाय मागील कारकिर्दींत पंचांकडे (कौन्सिलाकडे) पाठविलेल्या मोकदम्यांचाही निकाल केला.

निरनिराळ्या कोर्टांत पुष्कळ जुने मोकदमे शिल्लक राहिले असल्याबद्दल बराच बोभाट होता त्यावरून **मदार् उल्महाम** साहेब बहादूर व अव्वल व दुय्यम नायब दिवाणसाहेब व तिन्ही जिल्ह्याचे नाजीम व सायर व दिवाणी व फौजदारी अदालतीचे कामगार यांजकडून शिलकी प्रकरणांच्या यादी तयार करविल्या. त्यावरून एकंदर १६६३१ प्रकरणें शिल्लक असल्याचें कळून आलें. या सर्व प्रकरणांचा अमुक दिवसांत निकाल करावा किंवा अधिकाराबाहेरील असल्यास हुजूर पाठवावीं. ह्मणून मुख्य कामगारांकडे तीं सोंपवून समज दिली गेली. व कांहीं कांहीं कचेऱ्यांत फार दिवसांचे शिलकी मोकदमे पुष्कळ आढळून आल्यामुळें त्यांच्या निकालाकरितां थोडा जास्ती आमलाही वाढवून दिला.

पूर्वी **सिकंदर** बेगम साहेबांच्या कारकिर्दीच्या अव्वलीपर्यंत **भोपाळ** शहरांत पुष्कळ धान्य, जमीनदार लोक आणून विकीत असत.

परंतु **ब्रिटिश** छावणींतील लोकांच्या उपयोगाकरितां येणाऱ्या धान्यावर निमी जकात माफ करण्याचा ठराव अमलांत येऊन **भोपाळ** शहरांत येणाऱ्या मालावर याप्रमाणें जकातीची माफी न दिल्यानें शहरांत माल कमी येऊं लागून महाग विकूं लागला. यामुळें शहरांतील गरीब लोकांनीं फार गिल्ला केला.

या ठरावापासून आमच्या प्रजेस पुरा महसूल द्यावा लागल्यामुळें नुकसान लागून परकीय लोकांस मात्र यापासून फायदा होत होता. अशी आमची खात्री झाल्यावरून तारीख १० फेब्रुवारी सन १८६९ इसवी रोजीं सायरीच्या मुख्य कामगाराच्या नांवें हुकूम जारी केला कीं, 'आह्मांस परकी लोकांपेक्षां **भोपाळांत** राहणाऱ्या आमच्या प्रजालोकांची जास्ती काळजी करणें अवश्य आहे. ह्मणून गरीबलोकांची अडचण दूर करण्याकरितां **भोपाळ** शहरांत धान्य, चणे वगैरे माल बाहेरून येइल त्यावर सायरचा महसूल तारीख १४ एप्रिल सन १८६९ इसवी पासून माफ करण्यांत आला आहे.'

स्वार व पायदळ यांचे नवे पोषाख तयार केले व **मदार् उल्महाम** व वकील यांच्या तैनातीच्या काळ्या पोषाखांच्या स्वारांना शिबंदीच्या लोकांपेक्षां काम फार पडतें व घोडे व कपडे चांगले ठेवण्यास जास्त खर्च लागतो असें असून दोघांचाही पगार सारखाच आहे, हें गैर आहे, अशी कुरकुर होती. त्यावरून वरील तारखेसच त्यांचा पगार वाढवून १८७८० रुपये ज्यास्त खर्च करण्याची मंजुरी दिली.

माजी **बेगम** साहेबांना वेळोवेळीं अनेक कारणांमुळें आपल्या राज्यांतील जिल्ह्यांत फिरण्यास सवड झाली नाहीं. व रयत, किरसान वगैरे लोक, काळीकडील लोकांकडून जुलूम होत असल्याबद्दल अतिशय बोभाट करीत होते. व कामगार लोकांनीं लांच घेतल्याबद्दल व लोकांकडून जुलुमानें पैसा घेतल्याबद्दल हमेषा आमच्या कानावर बोभाटा येत असे. सबब आपल्या त्रस्त प्रजेस जाचांतून सोडवून, लबाड कामगारांस योग्य सजा करणें अगदीं जरूर होतें. याकरितां, हिंवाळा संपून बाहेर

फिरण्याचे दिवस बहुतेक निघून गेले होते, तथापि आह्मी तारीख १८ फेब्रुवारी सन १८६९ इसवी रोजीं **भोपाळाहून दक्षिण** जिल्ह्यांत फिरण्याकरितां निघालों. या जिल्ह्यांत ८ आठ परगणे आहेत. त्यांत आह्मी प्रथम **चिपानेरास** गेलों.

**दक्षिणे**कडील दवऱ्याची हकीकतः—तारीख १८ फेब्रुवारी रोजीं आह्मी **चिपानेरास** पोहोंचलों, तेथें गांवचे मालगुजार, पटवारी (कुलकर्णी) इनामदार व जहागीरदार, सावकार, व गांवचे रखवालदार वगैरे सर्व लोकांस बोलावून आणून त्यांना पुढील जाहीरनामा वाचून दाखविलाः— '**बेगमसाहेब** या परगण्यांत आल्यास १७ सतरा वर्षे झालीं, परंतु प्रत्येक वर्षीं **नाजीम** व प्रतितिसऱ्या वर्षीं **मदार् उल्महाम** यांचे नायब इकडे येत असतात, हें खरें; तथापि तुह्मां लोकांस इतक्या वर्षांत कोणीही सरकारी कामगारांनीं तुमच्यावर जुलूम करून त्रास दिला असल्यास, ते लहान मोठे कसेही असोत, त्यांची योग्य चौकशी करून त्या लोकांस त्यांच्या लबाडीबद्दल व लांच रुषवत देण्याबद्दल योग्य शिक्षा देण्याचा हल्लीं आह्मीं ठराव केला आहे. याकरितां माजी किंवा हल्लींच्या तहसीलदार व ठाणेदार यांपैकीं कोणीही कोणास त्रास दिला असल्यास किंवा कोणाचें नुकसान केलें असल्यास, तसेंच **नाजीम** किंवा त्यांच्या हाताखालचे कामगार किंवा **मदार् उल्महाम** यांचे नायब व त्यांच्या हाताखालचे लोक किंवा कोणच्याही प्रतीचे सायरीकडील कामगार यांनीं दुःख व त्रास देऊन नुकसान केलें असेल तर, निर्भयपणें येऊन फिर्याद द्यावी. त्या फिर्यादीच्या खरेपणाविषयींची चौकशी हुजूर समक्ष केली जाईल. तुह्मांस या लबाड कामगाऱ्यांची भीति असल्यामुळें जर तुह्मी खरी फिर्याद देणार नाहीं तर पुढें ही गोष्ट मुद्देशीर रीतीनें शाबीत झाल्यास त्या लबाड कामदारांस व त्यांच्या भीतीनें त्यांची लबाडी उघडकीस न आणणाऱ्या अशा लोकांसही शिक्षा केली जाईल.'

तसेंच दुसरा एक जाहीरनामा प्रसिद्ध केला गेला तोः—'माजी किंवा हल्लींच्या कामगारांनीं कोणापासूनही सरकारच्या ठरावाबाहेर किंवा सरकारांत

मंजूर नाहींत, अशा तऱ्हेचे, लग्नावरील वगैरे कर जुलमानें घेतले असतील तर ज्यांपासून ते घेतले गेले असतील त्या लोकांनीं जाहीर करावें. म्हणजे त्या त्या जुलमी कामगारांस योग्य शिक्षा देऊन दिलेली रकम परत देवविली जाईल.' याचप्रमाणें तिसराही एक जाहीरनामा दिला गेला कीं, **भोपाळ** सरकारांतील कोणी नोकरानें किंवा कामगारानें लांच घेतल्याचें सरकारांत जाहीर होऊन त्याबद्दलची शाबिती झाली तर त्याला योग्य शिक्षा दिली जाईल व शाबिती न झाली तरी मुखबीर लोकांस शिक्षा होणार नाहीं. या नंतर तहसीली, ठाणीं, चौक्या, सायर वगैरे ठिकाणच्या नोकर लोकांची हजिरी घेऊन, त्यांची छावणी करून शरीरानें दुर्बल व निरुपयोगी किंवा कोणच्याही गुन्ह्यांत सांपडलेले लोक होते. त्यांना वजा करून त्यांच्या जागीं दुसरे लोक भरती केले. ज्या कारकून व शिपायांचे चेहरे तहसिलदाराच्या सुस्तीनें होणें राहिले होते, परंतु ज्यांनीं त्यांजकडे सोपविलेलीं कामें चांगल्या रीतीनें केलीं होतीं त्या लोकांचीं नांवें ठरावांत लागूं करून घेतलीं. जमाबंदी, पोलीस व सायरखात्यांतील कारकून वगैरे **चिपानेरास** होते, त्यांजकडून व **भोपाळ**-शहरांतील कारकून व बाहेरील वगैरे लोकांकडून **भोपाळ**च्या राज्याशीं राज्यनिष्ठेनें राहूं अशी शपथ वाहून घेतली. त्याचप्रमाणें **चिपानेर** येथील मुलकी, पोलीस व सायर येथील कचेऱ्यांची तपासणी करून ज्या ठिकाणीं कांहीं न्यूनता दिसून आली ती दूर करण्याबद्दल लेखी टिपणें करून दिलीं.

यानंतर कामगार लोकांनीं लांच घेतल्याबद्दल किंवा सरकारी पैसा खाल्ल्याबद्दल किंवा इजारदार लोकांनीं जुलूम केल्याबद्दल समक्ष चौकशी चालविली व कांहीं प्रकरणांचा निकाल करून कित्येकांस तात्काळ शिक्षा दिली. व ज्या प्रकरणांची चौकशी होण्यास उशीर लागण्यासारखा होता तीं **भोपाळास** जाईपर्यंत तहकूब ठेविलीं. दिवाणी, फौजदारी व मुलकी, मुकदम्यासंबंधीं अर्ज्या, शिरस्त्याप्रमाणें नाजीम, तहसीलदार व पोलीस कामगार सायर कामगार व **मदार् उल्महाम** यां-

जकडे निकालाकरितां पाठविल्या; व तहसीलदार किंवा इजारदार लोकांनीं रयतेपासून जुलमानें व लबाडीनें घेतलेले सर्व रुपये रयतेस परत दिले. तसेंच धान्य व इतर माल तोलण्याचीं वजनें तपासून एकसारखीं करविलीं. अदालत, कचेऱ्या, ठाणीं, तहसील व सायरकचेऱ्या वगैरेंची जरूर होती त्या ठिकाणीं त्या नव्या बांधण्याची व दुरुस्त करण्याची मंजुरी दिली. व पडावाच्या जागीं उतारकरू लोकांस सुख व्हावें ह्मणून झाडें लावण्याविषयीं हुकूम दिला.

यानंतर **भयरोंदा, मर्दानपूर, चेचली, बरेली** आणि **उदेपूर** या परगण्यांत दौरा केला. **उदेपूर** परगण्यांत लंबरदार लोकांनीं सरकारांतून ठरलेल्या जमेपेक्षां अधिक वसूल रयतेकडून घेतला होता. तो त्यांजकडून रयतेस परत देववून शिवाय त्या लोकांस दंडही केले. **चांदपुर**चा व **चौकीगड**चा किल्ला पाहिल्यावर आह्मी **दक्षिण** भागाचें मुख्य ठिकाण **कलिकाखेडी** या शहरीं आलों. प्रत्येक परगण्यांत गेल्यावर एकंदर कामाची व्यवस्था **चिपानेर** परगण्यांतल्या प्रमाणेंच केली. व तारीख २७ मोहोरम रोजीं आह्मीं सुखरूप **भोपाळा**स परत आलों. या **दक्षिण** भागांतील आठ परगण्यांतील दौऱ्यांत एकंदर ४३६० प्रकरणांची चौकशी करून निकाल केले. व दौऱ्याच्या हकीकतीचा तपसिलवार रपोट तयार करून त्याची एक प्रत शिरस्त्याप्रमाणें **भोपाळचे पोलिटिकल एजंट** यांजकडे माहितीकरितां पाठविली.

तारीख ४ अकटोंबर सन १८६९ इसवी रोजीं करनल **एडवर्ड टामसन** साहेब आफिशियेटिंग **पोलिटिकल एजंट भोपाळ** यांनीं आमच्याकडे एक खलीता पाठविला. त्यांतील मजकूर—‘आपली उत्तम व्यवस्था, करतबगारी, व राज्यकारभार फार चांगल्या रीतीनें, उत्साहानें, व मेहनतीनें चालविण्याची शैली व कळकळ, तसेंच उन्हाळ्याच्या गर्मीची पर्वा न करितां राज्यव्यवस्था सुधारून आपल्या प्रजेचें हित व सौख्य वाढविण्याकरितां आपण मेहनत घेतल्याबद्दल रपोट व त्याबरोबर आपल्याकडून आपण **दक्षिण** भागांत आपल्या रयतेची स्थिति सुधारण्याकरितां

दौरा करून व्यवस्था लावली, त्याविषयींच्या हकीकतीच्या रपोटाच्या भाषांतरासुद्धां **एजंट गव्हरनर जनरल** यांच्या मार्फत **हिंदुस्थान** सरकाराकडे आह्मीं रपोट केला. त्याच्या जबाबांत **हिंदुस्थान** सरकारचे **सेक्रेटरी** यांजकडून तारीख २१ सपटंबरचें पत्र **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांच्या नांवें आलें. त्यांत लिहिलें आहे कीं '**बेगम** साहेबांनीं आपल्या राज्यांतील कामगार लोकांच्या लबाड्या व जुलूम समूळ नाहींसे करून रयतेस सुखावह अशा नवीन सुधारणा अमलांत आणल्याबद्दलच्या हकीकतीचा रपोट वाचून **व्हाइसराय** साहेब फार खुषी झाले. त्या रपोटावरून **बेगम** साहेब आपल्या राज्याची व्यवस्था चांगल्या सुधारलेल्या रीतीनें करण्याच्या कामांत व लबाडी व जुलूम समूळ नाहींसा करून आपल्या सर्व प्रजेचें कल्याण व आबादी होईल अशा गोष्टी अमलांत आणण्याच्या कामांत आपल्या मातोश्रीवर ताण करण्याची उमेद ठेवतात असें दिसून येतें. **बेगम** साहेबांनीं या हेतूनें जो क्रम आरंभिला आहे तो मोठमोठ्या शहाण्या व पोक्त राज्यकर्त्यांसही भूषण देणारा आहे. याकरितां हा रपोट प्रसिद्ध करविण्यांत **व्हाइसराय** साहेबांस फार आनंद वाटत आहे. त्याच्या प्रती लौकरच **स्टेट सेक्रेटरी** साहेबांकडेही पाठविल्या जातील.

योग्य व तात्कालिक बक्षीसच मिळालें असें मला वाटतें. आपण स्वीकारिलेल्या सुधारणेचा व राजनिष्ठेचा क्रम तसाच पुढें चालू ठेवण्याविषयीं **इंग्रज** सरकारांनीं आपली जी तारीफ व प्रशंसा केली तिच्या योगानें आपल्यास पुष्कळ उत्तेजन येईल अशी मला उमेद आहे. व परमेश्वर आपले वर्णनीय सद्गुण, व आपलें शहाणपण व योग्यता उत्तरोत्तर जास्त वाढवो.'

पुढें तारीख ७ फेब्रुवारी सन १८७० इसवी रोजीं कर्नल **ऊसले** साहेब बहादर **पोलिटिकल एजंट** यांनीं **स्टेट सेक्रेटरी ड्यूक आफ आरगाईल** यांजकडून **व्हाइसराय** साहेबांकडे खलिता आल्याचें कळविलें. त्यांत लिहिलें होतें कीं, त्यांची सुधारलेली व चांगल्या रीतीनें

राज्यकारभार करण्याची पद्धत व सर्व प्रजेस हितावह झालेली पुष्कळ वर्षांची वहिवाट त्यांमुळें **सिकंदर** बेगम यांची वाखाणणी झाली. तिला अनुसरून राज्यव्यवस्था चालविण्याचा आपला मनोदय असल्याचें **शहाजहान** बेगम यांनीं सिद्ध करून दिलें आहे. यापासून आह्मांस फार खुषी आहे. व **महाराणी** सरकारास **शहाजहान** बेगम यांनीं राज्यांत चांगली सुधारणा करण्याचें सुरू केल्याबद्दल आपल्यास फार खुषी झाल्याचें **महाराणी** सरकारास कळविण्याविषयीं आपण लिहिलें तें आह्मांस अगदीं मान्य आहे.

---

## भाग २ रा.

**महाराणी सरकाराकडून एक फरमान आल्याची व कलकत्त्याच्या स्वारीची व भोपाळच्या पश्चिम भागांत दौरा करून सुधारणा चालू केल्याबद्दलची हकीकत.**

तारीख २ सपटंबर सन १८६९ इसवी रोजीं कर्नल **एडवर्ड टामसन** साहेब अ० पो० ए० **भोपाळ** यांजकडून आमच्याकडे एक खलिता आला त्याबरोबर **ड्यूक आफ आरगाईल सेक्रेटरी आफ स्टेट** यांजकडून आमच्या नांवचें आलेलें एक इंग्रजी पत्र होतें त्याचें भाषांतर खालीं लिहिल्याप्रमाणें:—

नबाब **शहाजहान** बेगम **भोपाळ** यांस—**महाराणी** सरकारची मला आपल्यास असें लिहून कळविण्याबद्दल आज्ञा झाली कीं, त्यांना आपल्या मातोश्री नबाब **सिकंदर** बेगम या मरण पावल्याचें ऐकून खरोखर फार वाईट वाटत आहे. या दुःखकारक गोष्टीबद्दल त्या आपलें सांत्वन प्रेमपुरःसर करूं चाहतात. असें आपल्यास लिहून कळविण्याबद्दल **महाराणी** सरकारचा मला हुकूम झाला आहे. तसेंच आपल्या पूज्य व योग्य मातोश्री माजी **सिकंदर** बेगम साहेब यांच्याप्रमाणें आपणही आपल्या ताब्यांत असलेल्या राज्याचें शहाणपणानें व उदारपणानें परिपालन करून उत्तम व्यवस्था ठेवाल अशी **महाराणी** सरकारास खात्री आहे.

आपण पुष्कळ दिवसपर्यंत आनंदानें राहून आपली उत्तरोत्तर वृद्धि व भरभराटी होत जाईल.

अशी उमेद धरून असणारा आपला शुभचिंतक व स्नेही,

तारीख ३१ जुलई सन १८६९. **आरगाईल.**

आह्मीं **स्टेट सेक्रेटरी** यांना या पत्राचा जबाब लिहिला व त्यासोबत **महाराणी व्हिक्टोरिया** कैसरे हिंद यांच्या नांवाचें एक विनंति पत्र **पोलिटिकल एजंट** यांच्याकडे एका खलित्याबरोबर पाठविलें तें:—

'आमच्या न्यायी, दीनवत्सल, व सन्मार्गगामी यांस आधार अशा **व्हिक्टोरिया** महाराणी साहेब व यांच्या परमपूज्य आज्ञा, राइट आनरेबल **सेक्रेटरी आफ स्टेट फार इंडिया** व हिज एक्सलेन्सि **व्हाइसराय** व गव्हरनर जनरल व **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** व **अ० पो० एजंट भोपाळ** यांच्या मार्फत पाठवून देवविल्या, याजबद्दल त्या सर्वशक्तिमान **परमेश्वरा**ची मी फार उपकारी व आभारी आहें. आपल्या या दीन नोकरास गादीवर बसवून **सुलतान जहान** इजला माझ्या मागें वारीस ठरविणें, ह्या गोष्टी आपल्या नोकर कामगारांनीं बरेच दिवसांपूर्वींच केल्या आहेत. तथापि आपल्या स्वतःच्या आज्ञापत्रानें हल्लीं या आमच्या हक्कास विशेष योग्यता व बळकटी आली आहे. या योगानें माझ्या बरोबरच्या इतर सर्व राजेरजवाड्यांपेक्षां माझा मान व प्रसिद्धि विशेष झाली. नवाब **सिकंदर** बेगम यांनीं मरेपर्यंत आपली **इंग्रज** सरकाराशीं राजनिष्ठा व विश्वास कायम ठेवला. त्यांनींच मला व **सुलतान जहान** बेगम इजला आपल्या ओठ्यांत घातलें आहे. **परमेश्वरा**च्या कृपेनें आह्मी उभयतांही आपल्याशीं राजनिष्ठेनें व विश्वासानें राहण्यांत नवाब **सिकंदर** बेगम यांची बरोबरी किंवा होईल तेथवर त्यांच्याहून ज्यास्तीही करूं अशी उमेद आहे. **परमेश्वर** आह्मांस आपल्या विमल यशप्रकाशाचे भागीदार करो.

गादीवर बसल्या दिवसापासून आह्मीं आमच्या ताब्यांत दिलेल्या प्रजाजनांस न्याय देण्याचा व राज्यरीति सुधारण्याचा यत्न चालविला आहे. आमच्या पूर्वींच्या दौऱ्याच्या व राज्यकारभाराच्या हकीकतीचा रपोट आह्मीं **गव्हरनर जनरल** साहेबांकडे पाठविला तो आपल्या पाहण्यांत बहुधा आला असेल. राज्यकारभार सुधारून सर्वत्र चांगली व्यवस्था चालू करून आपल्या प्रजेची स्थिति सुधारण्याचा व **इंग्रज** सरकाराशीं इमानानें व राजनिष्ठेनें वागण्याचा क्रम असाच हमेषा चालू ठेवून तारीख २२ सपटंबर सन १८६९ इसवी रोजीं **सेक्रेटरी आफ स्टेट** यांच्याकडे पत्र पाठविलें त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें:—आपल्या तारीख ३१ जुलई सन १८६९ इसवीच्या शिरसामान्य आज्ञापत्राचें मीं आदरानें ग्रहण केलें. त्यांत आपण **महाराणी** सरकार—**ईश्वर** त्यांस चिरकाल आमच्यावर राज्य करूं देवो—यांनीं आमच्या मातोश्री **सिकंदर** बेगम यांच्या मरणाबद्दल दुःख प्रदर्शित केलें असें लिहिलें आहे. अशा तऱ्हेनें आह्मांसच निवडून अशा तऱ्हेची मेहरबानगी करून आमची योग्यता व प्रतिष्ठा आमच्या सर्व बरोबरीच्या लोकांहून ज्यास्त केली. याचें आह्मांस मोठें भूषण वाटतें. नबाब **सिकंदर** बेगम यांच्या मरणानें आपल्यास फार दुःख झाल्याचें स्वतः कैसरे हिंद **महाराणी** साहेबांनीं सर्व जगासमोर व्यक्त करून दाखविल्यानें त्यांनीं केलेले परिश्रम व उद्योग, तसेंच त्यांची राजनिष्ठा व खरेपणा या सर्वांबद्दलचें योग्य बक्षीस त्यांस मिळून चुकलें आहे व या योगानें त्यांच्या प्रमाणेंच एकनिष्ठेनें, शहाणपणानें, धैर्यानें व मन लावून आपल्या प्रजेच्या कल्याणाकडे लक्ष देऊन राज्यकारभार चालविण्यास आह्मांस उत्तेजनच मिळालें आहे. ज्या अशा गुणांनीं नबाब **सिकंदर** बेगम यांची इतकी प्रख्याति विशेष वाढली असें इंग्रज सरकार समजतें त्या गुणांचें त्यांच्यापेक्षांही ज्यास्त तत्परतेनें अवलंबन करून या सर्व गोष्टी करण्याच्या कामीं आमची सक्त मेहनत चालू आहे. माझी **ईश्वरा**जवळ येवढीच प्रार्थना आहे कीं, आह्मां उभयतांस व **सुलतान जहान** बेगम व आमची पुढील संतति यांस

खरेपणानें **इंग्रज** सरकाराशीं राजनिष्ठा व प्रजेस योग्य न्याय देण्याची शक्ति कायम ठेवून **सार्वभौम** सरकाराकडून मान्यता व बक्षीस मिळेल अशा सुधारणा चालू करण्याच्या मार्गांत आह्मांस सदैव मदत व्हावी.' तारीख ९ नवंबर सन १८६९ इसवी.

वरील पत्राचा जबाब **पोलिटिकल एजंट** यांनीं पाठविला त्यांत लिहिलें होतें कीं, 'हा आपला अर्ज **एजंट गव्हरनर जनरल** साहेबांनीं **लंडनास** पाठविला त्याचा त्यांना **हिंदुस्थान** सरकारच्या मार्फत **सेक्रेटरी आफ स्टेट** यांच्याकडून इंग्रजींत जबाब तारीख २७ जानेवारी सन १८७० इसवीचा आला कीं, हें विनंति पत्र **महाराणी** सरकारांनीं मेहरबानगीनें व आनंदानें घेतलें. तसेंच **स्टेट सेक्रेटरी** यांसही आपल्या नांवाचें पत्र आल्याबद्दल फार संतोष झाला. **हिंदुस्थान** सरकारच्या **फारेन सेक्रेटरी**च्या व **स्टेट सेक्रेटरी** यांनीं पाठविलेल्या पत्राची नक्कल खलित्याबरोबर आली तीः—

इंडिया आफीस लंडन तारीख २७ जानेवारी सन १८७० इसवी.

हिज् एक्सलेन्सि धी राइट ऑनरेबल धी **गव्हरनर जनरल** आफ इंडिया इन् कौन्सिल यांस,

लार्ड साहेब, आपल्या सरकारच्या खात्याचा नंबर ३८६ तारीख १४ दिसेंबर सन १८६९ इसवीच्या पत्राबरोबर **भोपाळच्या शहाजहान** बेगम यांजकडे **महाराणी** सरकारच्या आज्ञेवरून गेल्या अक्टोबरच्या सहाव्या तारखेस मीं दुखवट्याचें पत्र पाठविलें त्याचा जबाब आला आहे. त्याच्या पत्राचा **महाराणी** सरकारांनीं मेहरबानगीनें स्वीकार केला असल्याचें आपण **बेगम** साहेबांस कळवावें. तसेंच **बेगम** साहेबांनीं स्वतः आह्मांस पत्र पाठविलें त्याबद्दल व त्यांतील खुषी होण्याजोगा मजकूर वाचून आह्मांस फार संतोष झाला.

आपला,

**आरगाईल.**

**पोलिटिकल एजंट, एजंट गव्हरनर जनरल, गव्हरनर जनरल,** ड्यूक आफ **एडिंबरो, महाराणी** साहेब, व **हिंदुस्थानचे स्टेट सेक्रेटरी** यांच्याकडे पत्रें व खलिते लिहिले जातात त्यांच्या आरंभीं व शेवटीं जो मजकूर लिहिला जातो तो येणेंप्रमाणें:—

मी गादीवर येण्यापूर्वीं **महाराणी** सरकारांस केव्हांही पत्र पाठविलें गेलें नव्हतें. ही चाल मी गादीवर बसल्यावर इंग्रज सरकारांनीं माझ्याविषयीं विशेष मेहरबानी दाखविल्यावरून सुरू झाली. **महाराणी** साहेबांस पत्र लिहिते वेळीं त्यांस विशेषणें देऊन मायना लिहिला जातो तो:—जनाब मलकामा आझमा, क्वीन् व्हिक्टोरिया, व हुजुरे सवलत्, मामूर षहा, गेती पना, ताजबक्ष, व सलतनत् आरा, हजरत मलकयेमो आजमा षहानषहा ग्रेट ब्रिटन् व हिंदुस्थान व दामदवलत बादतक्दीम—हें लिहिल्यानंतर पुढें दाव व तस्लीमके जो काबिल् बारियाबान् आस्तान फक्त निशान हो. हा आर्ज आहे.—नंतर शेवटीं एजद भुता आल व काजरे जुलजलाल जबतव्ह मेहर व माह मस्रूफ इस् आफ मराम फरमाईये जिल्ले राफतजहां पना कौसरे मुती आन ब ए खलास पर मुखलिद व मबसूद दिखलावे.

अलकाब, आदाब, शहाजादे ड्यूक आफ एडिंबरो बहादूर.

आली जनाब अमाइदम आबदूहिये रोजे ए सलतनत कुर्रे ए बासिर ए. मुमृलिकत् शहाजादे साहेब बहादूर दाम दौलत हू.

बाद तकदीम लवाजिये आदाब व तस्लीम व तरसीम मरासिम ताजीम मारूज आंके.

इबारते खातमा एजद मुताआल् व कादरे जुलजलाल जिलाल फज्लु-कमाल— शहाजादए बाइकबाल कौसरे आजिजाखुलूस इश्तिमाल पर मुखलिज वमबसूद फरमावे. वजीरे आजम्.—

बज नाब मुस्तताब मुअल्ला अल्काब खुर्षीदे इंतिसाब उमदे अमायदे सलतनत् कुबा वजीरे आजम व मशीरेखास हुजूर फैज मामूर हजरत मल्कए मोअजमा रफी उद्दरजा दाम एक बाल व्हूह.

बाद तादिये मरातिबे तस्लीम व तक्दीम मनासिबे ताजीम मरफूए खातिर फैज मजाहिर हो.

इबारत खातमा कादिरे जुलजलाल जबतकके मेहेर व मः कोमस्रूफ इस आफ मराम अनाम फरमावे. जिल्लेराफत व तमकीन व कौसरे इरादत केषामसुतीपर मुखालदे मबूसूद रखे.–

लार्डसाहेब बहादूर—पूर्वी **खुदसिया** बेगम साहेब **रिजंट** असल्यानें सरकारी कामगारांनीं **गव्हरनर जनरल** साहेबांस अर्ज पाठविण्याचेच मायन्यानें पत्र लिहिणें योग्य आहे असें ठरवून त्याप्रमाणें वहिवाट चालविली. पुढें आमच्या मातोश्रीच्या रिजन्सीच्या वेळींही तीच चाल होती. ती त्यांनीं गादीवर बसल्यावरही न बदलतां तशीच चालविली परंतु अशी चाल असण्याचा दस्तूर नसून ही चाल इतर राजेरजवाड्यांत ही चालू नव्हती हें त्यांजकडील वहिवाटीच्या विरुद्ध होतें. याकरितां आह्मीं **लार्ड** साहेबांस पुढें लिहिल्या मायन्यानें पत्र लिहिण्याचें ठरवून त्याजबद्दल मंजुरी मिळण्याबद्दल **पोलिटिकल एजंट** यांजकडे लिहून पाठविल्यावरून तारीख २२ जून १८७२ इसवी रोजीं जबाब आला कीं, आमचें ह्मणणें **गव्हरनर जनरल** साहेबांनीं मान्य करून त्याजबद्दल मंजुरी दिली आहे, करितां याउपर **गव्हरनर जनरल** साहेबांस याप्रमाणें पत्र पाठवीत जावें.

साहेब अलीशान षवीक व मेहरबान करम फरमाये नि आजमंदान सल्लमुल्ला होताला—बाद आदाये लवाजिये खुलूस व नेयाज मारूज आंके खातमा.

**कलकत्त्याच्या स्वारीची हकीकतः**—कर्नल **उडवर्ड टामसन** साहेब अ० पो० ए० **भोपाळ** यांनीं तारीख १ दिसेंबर सन १८६९ रोजीं **एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांजकडून लिहून आल्यावरून आमच्याकडे पत्र पाठविलें कीं, '**गव्हरनर जनरल** आणि **ड्यूक ऑफ एडिनबरो** यांच्या दरबारांत हजर राहण्याविषयीं आह्मांस निमंत्रण आहे, तेव्हां दिसेंबरच्या २६ व्या तारखेस **कलकत्त्यास** हजर

राहावें. त्यावरून आह्मी मोठ्या आनंदानें तारीख १७ दिसेंबर रोजीं **भोपाळा**हून निघून डाकमार्गानें **हुषंगाबादेस** येऊन **नरसिंगपुरास** रेलगाडींत बसून **जबलपुरास** आलों व तेथून रेलवेंतून तारीख २३ दिसें-बर रोजीं निघून **कलकत्त्यास** तारीख २५ रोजीं दाखल झालों. तारीख २९ दिसेंबर रोजीं आह्मीं **राजपुत्र** व **गव्हरनर जनरल** यांची भेट घेतली. या दोघांनींही आमची विशेष अगत्यानें व आदरानें भेट घेतली. तारीख ३१ रोजीं राजपुत्रांनीं स्टार ऑफ इंडिया पदव्या देण्याचा समारंभ करून दरबार केला, त्यांत आह्मीही हजर होतों. पुढें त्या उभयतांनींही आमच्या मुक्कामावर येऊन आह्मांस परत भेट केली. त्याचप्रमाणें **मुंबई** व **मद्रास**चे **गव्हरनर** व **कलकत्त्या**चे बिशप व दुसऱ्या नामांकित पुरुषांच्या आह्मीं भेटी घेतल्या. व त्यांनींही परत भेटी केल्या. तसेंच थिएटर **फोर्ट विल्यम** किल्ल्यांतील मेघजीन, किंवा आयुधागार, कलकत्त्याचा किल्ला, म्यूझियम् किंवा अजायबघर व पदार्थसंग्रहालय हीं पाहिलीं. त्याचप्रमाणें तारीख १४ जानेवारी १८७० इसवी रोजीं झालेली कवाईतही पाहिली. व **राजपुत्रा**ची आगबोटही पाहून आलों. या सर्व ठिकाणीं सरकाराकडून आमचें आगतस्वागत व मानमरातब यथास्थितपणें व योग्य रीतीनें ठेविला गेला.

विस्तारवैभव व लोकवस्ती यांच्या मानानें हल्लीं **हिंदुस्थानां**त **कलकत्त्याच्या** तोडीचें एकही शहर नाहीं. या सालच्या खानेसुमारीवरून तेथील लोकसंख्या ४९०००० आहे. सर्व **हिंदुस्थान**ची लोकसंख्या २४१०००००० आहे असें वर्तमानपत्रांत लिहिलें आहे. विद्वान **युरोपियन** लोकांच्या अंदाजानें **युरोपां**तील लोकसंख्या अठ्ठावीस कोटी सत्तर लक्ष, **एशियां**तील एकूणऐंशीं कोटी व शाऐंशीं लक्ष **आफ्रिकें**तील सहा कोटी ऐंशीं लक्ष, **आस्ट्रेलियां**तील अडतीस लक्ष व **अमेरिकें**तील सात कोटी अठ्ठावीस लक्ष मिळून सर्व पृथ्वीवरील लोकसंख्या अंदाजें १२३०२००००० इतकी आहे. हे लोक निरनिराळ्या छत्तीसशें भाषा बोलतात. व एक हजार निरनिराळ्या धर्मांनीं चालतात.

**युरोपियन** डाक्तरांच्या हिशेबावरून निरनिराळ्या धर्मांत लोक आहेत तेः—ग्रीकचर्च अठ्ठावीस लक्ष, रोमन् क्याथुलिक एकुणीस कोटी पन्नास लक्ष, प्राटेस्टंट सात कोटी एक्यायशीं लक्ष एकुणचाळीस हजार, मुसलमान, बाराकोटी, बौद्धधर्मी चौतीस कोटी, आशियांतील धर्मांचे सवीस कोटी. मूर्तिपूजक दोन कोटी आणि यहुदी साठ लक्ष.

हें शहर इतकें प्रसिद्ध आहे कीं, त्याचें येथें वर्णन देण्याची जरूरी नाहीं. आह्मी **कलकत्त्याहून** तारीख १९ जानेवारी रोजीं रेलमार्गें निघून तारीख १७ रोजीं जबलपुरास येऊन तारीख ९ फेब्रुवारी रोजीं **भोपाळास** सुखरूप परत आलों. या स्वारींत युरोपियन सामान व जड व जव्हाहीर वगैरेच्या खरेदी सुद्धां एकंदर १८७९००॥≅॥। खर्च झाला.

राज्याच्या **पश्चिम** भागांत दौरा केला त्याची हकीकतः—तारीख २६ फेब्रुवारी रोजीं **भोपाळाहून** निघून **दिलोद, भेरस्या, नजीराबाद, देवीपुरा, दुराहा** व **सिहोर,** हे परगणे पाहिले. **सिहोरास पोलिटिकल एजंट** व इतर मोठ्या मंडळींनीं चालीप्रमाणें आमचें आगतस्वागत करून आमच्याकरितां फौजेची कवाईत करविली. व आमच्यासमक्ष शाळेची परीक्षा घेतली. तेथून आह्मी **आष्टा, जावर, सिहावर,** आणि **शम्सगड** या ठिकाणीं जाऊन तारीख ४ रविलावल सन १२८७ रोजीं **भोपाळास** परत पोहोंचलों. **सिहावर** हें ख्रिस्ती हाकीम, **शहाजादमसी** यांच्या विधवेकडे जहागीर आहे. या दौऱ्यांतही **दक्षिण** भागांत गेल्यावेळीं अमलांत आणल्याप्रमाणेंच व्यवस्था चालविली. एकंदर ३१०१ अर्ज्या आल्या व त्यांच्या त्यांच्या अपराधाप्रमाणें अपराध्यांस शिक्षा दिल्या गेल्या. व रुपये परत देवविले. यांत सगळ्यांत महत्वाचें काम ह्मणजे एकंदर १०२१९६८-॥ रुपये बाकीपैकीं ४०६२३।≈ रुपये वसूल करून, बाकीच्या वसुलाबद्दल हप्तेबंदी करून दिली. उताराच्या जागीं वाटसरू लोकांच्या सोईकरितां पक्क्या विहिरी बांधण्याविषयीं व छायेकरितां झाडें लावण्याविषयीं हुकूम दिले. प्रत्येक वाघ मारण्याबद्दल पांच रुपये बक्षीस ठरविलें

असूनही जंगलांत वाघांचा उपद्रव फार होता. तो दूर करण्याकरितां बक्षीस वाढवून २० वीस रुपयांचें केलें. हलकीं वजनें असलेलीं सर्व रद्द करून दुकानदारांस **भोपाळ**च्या टांकसाळींतून नवीं वजनें देवविलीं.

याशिवाय आणखी कांहीं सुधारणा केल्या त्यांची हकीकत.—

माजी **बेगम** साहेबांच्या कारकिर्दींत पुष्कळ वर्षेपर्यंत शुक्रवारीं सर्वत्र अर्धा दिवस सुटी दिली जात होती. या सुटींत कामगार लोकांस घरचें किंवा सरकारचें कोणचेंही काम करण्यास चांगली सवड सांपडत नसे. इंग्रजी राज्यांत सुटीचा दिवस रविवार, मुसलमानी राज्यांत शुक्रवार, व हिंदु राज्यांत शनिवार ठरविला गेला आहे. सबब शुक्रवारचा सर्व दिवस सुटी देण्याचें ठरविलें. व हिंदु व मुसलमान लोकांस नेमधर्म वगैरे करण्याचें असेल त्या दिवशीं अर्धा दिवस सुटी दिली जात होती ती सर्व दिवस देण्याचें ठरविलें.

**भोपाळ** शहराच्या उत्तर भागाकडील रहिवाशांस पाणी आणण्याकरितां फार लांब जावें लागत असे, व प्रवासी लोकांसही त्रास पडत असे. याकरितां सन १२८६ सालीं एक मोठा लांब पक्का फत्तरांचा बंधारा शहराच्या उत्तरेस **इदग्या**जवळ ज्या ठिकाणीं आसपासच्या टेंकड्यांवरील पाणी येऊन जमत होतें त्या ठिकाणीं बांधला. व या नव्या तलावास **शहाजहान** असें नांव दिलें. यापासून लोकांस फार उपयोग झाला असून त्या ठिकाणीं पुष्कळ लोक विश्रांतीकरितां व हवा खाण्यास येतात. हल्लीं त्या बंधाऱ्याचें काम अठ्ठावीस २८ फूट उंच झालें असून अद्यापि काम सुरू आहे. या तलावाच्या पूर्वेस मुनसी **हुसेनखान** मास्तर ( **सुलतान जहान** बेगम यांचे शिक्षक ) यांनींही एक लहानसा तलाव बांधला आहे. त्याचें पाणी जनावरांच्या उपयोगीं पडतें व मोठा तलाव लोकांकरितां राखून ठेविला आहे. या तलावाच्या पलीकडे टेंकडीच्या पायथ्यापर्यंत एक चांगलें रुंद मोकळें मैदान आहे. त्या ठिकाणीं एक नवा पुरा वसविण्याचा विचार आहे. ईश्वरकृपेनें लौकरच या जागीं घरें नजरेस येतील. या पुऱ्यास **शहाजहानाबाद**

हें नांव दिलें असून त्यांत प्रिन्स ऑफ् वेल्सस्कूल व सरकारी सामान ठेवण्याकरितां व घरीं राहण्याच्या चांगल्या सुंदर इमारती पुष्कळशा बांधविल्या जातील. तसेंच लोकांच्याकरितां दुकानांच्या रांगा व सरकारी सायर कचेऱ्याही बांधावयाच्या आहेत. **इंग्लिश** लोकांच्या नमुन्याप्रमाणें घोड्यांच्या तोफखान्याच्या लाइनी नवीन तयार करवून पूर्वीं तोफा ओढण्यास बैल होते ते काढून टाकले. व लष्करी बेंडबाजाही सुरू करविला.

**भोपाळ**च्या राज्यांत प्रत्येक नवीन राजा गादीवर बसेल त्या वेळीं राज्यांतील चालू नाणें बदलण्याची वहिवाट आहे. त्याप्रमाणें पूर्वींचीं तांब्याचीं नाणीं परत मागवून घेऊन नवीन पाडविलीं त्यांत माजी **बेगम** साहेबांच्या वेळेपेक्षां वजनांत फेरफार केला नाहीं. या नाण्यांवर पाव आणा व श, हें अक्षर व शिवाय निशाणीचीं चिन्हें व सन असें असून तीं नाणीं प्रथम तारीख १ साबान सन १२८६ इसवी रोजीं पाडलीं. **भोपाळी** रुपयांची चांदी थोडी कडक असून तो **इंग्रजी** रुपयापेक्षां वजनांत थोडा कमी होता त्यामुळें त्याची किंमत, **जयपूर, इंदूर, कोटा,** व **टोंक,** येथील रुपयापेक्षां थोडीशी कमी असे. याकरितां हे रुपये शुद्ध चांदीचे व इंग्रजी रुपयाइतक्या किमतीचे पाडण्याचें ठरवून पूर्वींच्या रुपयावरील एका बाजूस **भोपाळ** येथें पाडला अशीं अक्षरें काढवून दुसऱ्या बाजूचा, हिजरीसन असलेला बदल केला.

**भोपाळ**च्या अमलांत **गुंनूर**चें जंगल फार मोठें व विस्तीर्ण असून त्यांत चांगलें मोठें इमारती लांकूड पुष्कळ होतें. हीं लांकडें नर्मदापारचे पर इलाख्यांतील लोक पुष्कळ कापून नेत असून त्याबद्दल फक्त गाडीमागें एक रुपया महसूल घेत असत; याकरितां आह्मीं या जंगलाची मोजणी करून जागजागीं खांबे गाडविले व त्यावर एक सुपरिंटेंडेंट नेमून त्याच्या हाताखालीं कारकून, ओव्हरसियर, सांखळीवाले व चौकीदार नेमून देऊन जंगलखातें उभें केलें व या संबंधें कांहीं नियमही ठरविले. यापासून सरकारांत बरेंच उत्पन्न वाढलें.

**पोलिटिकल् एजंटा**च्या सूचनेवरून तारीख २९ नवंबर सन

१८७० रोजीं **सिहोर** येथील दवाखान्याच्या खर्चाकरितां ६०० रुपये सालीना नेमणूक ठरवून दिली.

माजी **बेगम** साहेबांच्या कारकिर्दीत पैमायश करून पंधरा वर्षांची पट्टेबंदी ठरवून दिली गेली होती. त्या वेळेच्या जुन्या सांखळींत चूक असल्यानें प्लेन्टेंबलनें पाहाणी करविण्याचें ठरवून **इंग्रजी** इलाख्यांतून सर्व्हेयर लोक बोलावून तिन्ही जिल्ह्यांत मिळून १२६ सर्व्हेयर आणून काम सुरू करविलें. त्यांचा पगार सालीना १२७७६ रुपये लागत होता. सन १२८७ च्या साबानच्या अखेरपर्यंत दोन परगणे पुरे व दोन परगणे अर्धे अर्धे इतक्यांची मोजणी झाली त्यावरून एकंदर पूर्वीच्या पैमायशीपेक्षां ९४८११॥८१२ बिघे, जमीन ज्यास्त आढळून आली त्याचा तपशील—**दक्षिण** भागांतील **छत्री** परगण्यांतील अर्ध्या भागांत आढावा २३०९४॥८३ बिघे, **पूर्व** भागांतील अर्धा **देवडी** परगणा १११९३॥८१९ बिघे, **सिलवाणी** परगणा ४८८१॥८९ बिघे, **जठारी** परगण्यांत १९६४२॥८९ बिघे; याचप्रमाणें माफी गांवांची पैमायश करण्याबद्दल व इंग्रजी अंमलांतील वहिवाटीप्रमाणें पटवारी लोकांस प्लेन्टेंबलनें पाहाणी करण्याचें काम शिकण्याबद्दल हुकूम दिले.

माजी **बेगम** साहेबांच्या अमलांत बागाईत जमिनीचे तीन वर्ग असून त्या प्रत्येकाचे पुनः तीन भाग केलेले होते व जिराईत जमिनीचे मोरन, मबर, सुनार, असे तीन वर्ग असून यांचेही तीन तीन पोटविभाग मिळून जमिनीचे एकंदर १८ विभाग होते व प्रत्येक विघ्यावर निरनिराळी रीत असल्यानें प्रत्येक गांवांत मनास वाटेल त्याप्रमाणें दरांत फेरफार आढळून येई. व ज्या गांवच्या जमिनी सपाट किंवा पहाडी होत्या त्यांत त्या त्याप्रमाणें दर कमी जास्ती करावयाचा तो केला नव्हता. या सर्व गोष्टींपासून सरकारास व रयतेस विनाकारण त्रास पडून दोघांचाही फायदा नव्हता. याकरितां जमिनीचे एकंदर ६ सहा भाग, तीन बागाइतीचे, व तीन जिराइतीचे मानले. व प्रत्येक भागांत जमिनीचे सपाट, पहाडी, उंच, नीच आणि नापीक असे पोटविभाग केले

व जेथें जेथें अनेक कारणांमुळें पूर्वींची जमा ज्यास्त लागलेली होती तेथें ती कमी केली व हल्लींच्या चालू दरास अनुसरून अगदीं निराळी नवी पट्टेबंदी केली. किरसान लोकांस ह्याहीपेक्षां ज्यास्त सोय व सुख व्हावें ह्मणून पूर्वींच्या किरसानांचे तीन विभाग करून त्या प्रत्येकाच्या दराची सरासरी काढून त्याप्रमाणें आंख ठरवून दिले.

पूर्वीं असलेले **सिकंदरा** छापखाना, ज्यांत जाहिरनामे व नमुने वगैरे छापिले जात असत, व **सुलतानी** छापखाना ज्यांत स्टांप छापिले जात असत, त्याशिवाय **शहाजानी** छापखाना शाळेंतील क्रमिक पुस्तकें व एक वर्तमानपत्र छापण्याकरितां सुरू केला.

---

## भाग ३ रा.

## पूर्व भागांतील दौऱ्याची हकीकत.

या जिल्ह्यांत पंधरा वर्षेपर्यंत कोणी राजपुरुष व नबाब गेले नव्हते. सबब तारीख २६ दिसेंबर सन १८७० इसवी रोजीं आह्मीं **भोपाळा**हून निघून **उमरावगंजास** मुक्काम केला. या ठिकाणीं मागील सालाप्रमाणेंच कामाची व्यवस्था चालविली व मुखबीर व लबाड कामवाले यांच्या संबंधांत जाहिरनामा प्रसिद्ध केला तो—'खोडसाळ व खोटा मजकूर सांगणाऱ्या मुखबीर लोकांस सजा मिळत नाहीं, असें पाहून मुखबीर व इतर लोक शेंकडों खोट्या फिर्यादी आणण्यास प्रवृत्त झाले आहेत. याकरितां हल्लीं जाहीर केलें जातें कीं, जर कोणी मुखबीर एखादी फिर्याद करून एखाद्यावर आरोप ठेवील व त्याची शाबिती त्याच्या हातून होणार नाहीं तर त्यास शिक्षा होईल. परंतु शाबिती झाल्यास बक्षीस मिळेल. परंतु फिर्याद करणाऱ्यानेंच स्वतः लांच दिली असून त्याबद्दल त्याची शाबिती त्याच्या हातून न होईल तर खोटा आरोप आणण्याबद्दल त्याला शिक्षा होणार नाहीं'.

पुढें **भंबूरी** परगण्याची तपासणी करून तेथील मेहजती, गांव आणि

बगीचे वगैरे पाहिले. तसेंच **देवडी, ताल** आणि **भीमकुंड** हे परगणे पाहून **जेठारी** परगण्यांत जाऊन तेथें पैमायशीचें काम चाललें होतें तें समक्ष शेतांत जाऊन तपासून पाहिलें. त्याचप्रमाणें जमिनीची प्रतवारी व दरबंदी यांजबद्दलही चवकशी केली. पुढें **सिलवाणी** परगण्यांत गेलों. तेथील शिरस्त्याचें काम आटल्यावर **शिरमह्, चवाटिया** व **नरगादया** येथील राजांची भेट घेतली. त्यांनीं चालीप्रमाणें दरबारांत नजरा केल्या. तेथून **सेवास** परगण्यांत जाऊन त्या ठिकाणींच तेथील व **पीखलोण** परगण्याचें काम पाहिलें व या कामाकरितां तेथील जमीदार व जाहागीरदार यांना बोलावून घेतलें होतें. **पीखलोण** परगणा पर इलाख्यांत भोपाळच्या हद्दीबाहेर आहे यामुळेंच आह्मी तिकडे गेलों नाहीं. तेथून पुढें **घैराटगंज** महालांत गेलों. हा महाल आमच्या खासगी जहागिरींत आहे. तेथें जाऊन बाजार, कचेरी व मशिदी पाहून स्वारींतील सर्व लोकांस मेजवानी दिली व तेथून **सुलतान जहान** बेगम यांच्या जहागिरींतील **अंबापाणी** येथें गेलों. त्या ठिकाणीं सर्व काम तिनेंच पाहिलें व स्वारींतील सर्व लोकांस मेजवानी दिली. पुढें **महलपूर** व **रायसेन** येथें गेलों. या ठिकाणीं **पूर्व** भागाच्या कचेरीची जागा आहे. तेथें सर्व कामगार लोक आह्मांस भेटण्याकरितां जमले होते. या ठिकाणीं नाजिमाची कचेरी, व किल्ल्यांतील जुन्या इमारती पाहिल्या. आणि मेहजतीची जमीन दुरुस्त करण्याबद्दल हुकूम दिला. पुढें **सांचीकाना** खेड्यास जाऊन तेथील दगडावरील कोरींव काम, बुद्धाच्या मूर्ति, व प्राचीन दरवाज्यांचीं कामें वगैरे पाहून **दिवाणगंजास** आलों व तेथेंच चालीप्रमाणें काम करून तारीख १६ फेब्रुवारी सन १८७१ रोजीं समारंभानें **भोपाळांत** परत येऊन दाखल झालों. या दौऱ्यांत १९३४ अर्ज्या आल्या. यांत कामगार लोकांनीं लांच घेतल्याबद्दल, किंवा अन्याय केल्याबद्दल, किंवा रयतेवर जुलूम केल्याबद्दल ज्यांत संबंध होता अशा पुष्कळ अर्ज्यांची चौकशी आमच्या समक्ष त्या त्या खात्याच्या मुख्य अमलदारांकडून करविली. व बाकी

ज्यांत कांहीं तथ्य आहे असें दिसलें त्यांची शिरस्त्यानें चवकशी करण्याविषयीं हुकूम दिले.

याशिवाय कांहीं सुधारणा सुरू केल्या त्यांची हकीकत—तारीख १ मोहोरम सन १२८८ रोजीं प्रत्येक महालांत व परगण्यांत ज्या ठिकाणीं फौजेची तुकडी रहात असे त्या ठिकाणीं एकेक वैद्याची नेमणूक करून त्यांच्यावर एक इन्स्पेक्टर नेमून दिला. त्यांचीं औषधें वगैरे मिळून वार्षिक खर्च २०६४० रुपये सालाचा होता. सर्व कामवाल्यांस तीन वर्षांच्या नोकरीनंतर तीन महिनेपर्यंत रजा देण्याचा नियम ठरविला. पूर्वीं तहसीलदार व नाजीम यांचे दिवाणी अधिकार ७५—२५० रुपयांपर्यंत होते व फौजदारी अधिकार दोन महिन्यांची कैद व ५० रुपये दंड करण्यापर्यंत होते. व राज्याचे नायब यांजकडे ५०० रुपयेपर्यंत दिवाणी फिर्यादींचा निकाल करण्याचा व फौजदारींत चार महिने कैद व १०० रुपये दंड करण्याचा अधिकार होता. हे अधिकार हल्लीं वाढविले आहेत. २०० रुपयेपर्यंतचे दावे घेण्याचा व २ महिनेपर्यंत कैद व ५० रुपयेपर्यंत दंड करण्याचा अधिकार तहसीलदार यांस व ५०० रुपयेपर्यंत दावा घेण्याचा व ४ महिने कैद व १०० रुपये दंड करण्याचा अधिकार नाजीम यांस व ५००० रुपयेपर्यंत दिवाणी दावे घेण्याचा व १ वर्षपर्यंत कैद आणि २५० रुपयेपर्यंत दंड करण्याचा अधिकार नायब यांस दिला आहे.

पूर्वीं अमुक मुदतीच्या आंत दाव्याचा फैसला केलाच पाहिजे असा नियम नसल्यानें दाव्याचे फैसले होण्यास हमेषां उशीर लागून फार त्रास पडत असे व दावे वर्षोंगणती पडून रहात असत. हल्लीं जबाबी रपोट १५ पंधरा दिवसांच्या आंत परत झालेच पाहिजेत व फौजदारी मुकदम्यांचा निकाल १५ पंधरा दिवसांच्या आंत व मुलकी मुकदम्यांचा निकाल १ एक महिन्याच्या आंत व दिवाणी दाव्यांचा निकाल ३ तीन महिन्यांच्या आंत झालाच पाहिजे असा ठराव केला आहे. व एकवट हुकूम जारी केला गेला आहे कीं, दाव्याचे फैसले किंवा सवाली रपोटांचे जबाब वर

लिहिल्या मुदतीच्या आंत तशीच कांहीं विशेष मोठी अडचण असल्या-शिवाय न केले गेल्यास त्या कामगारांस दंड किंवा दुसरी कांहीं शिक्षा दिली जाईल. विशेष अडचण असल्यास त्याबद्दलचा रपोट त्या मुद-तीच्या आंत झालाच पाहिजे व प्रत्येक कचेरींतून जबाब गेले नाहींत अशा प्रकरणांचा व निकाल झालेल्या मुकदम्यांचे व तीन महिन्यांपेक्षां ज्यास्त दिवस शिल्लक राहिलेल्या प्रकरणांचीं पत्रकें नियमितपणें पाठविलीं जाण्याबद्दलही हुकूम जारी केले गेले. हीं पत्रकें प्रत्येक खात्याचे मुखत्यारांनीं १५ पंधरा दिवसांच्या आंत पाठवीत जावींत. त्यांची त-पासणी त्याच्या दुसरे दिवशीं होत जावी व त्या दिवशीं जर कोणाचीं पत्रकें यावयाचीं राहिलीं तर त्या कामगारावर दस्तकें जारी केलीं जा-तील. या योगानें कोणचाही दावा ठरविलेल्या मुदतीपेक्षां जास्त दि-वस योग्य कारणावांचून शिल्लक न राहतां प्रत्येक कामगाराची सुस्ती किंवा दक्षता प्रति तीन महिन्यांच्या आंत नजरेस येऊन हुषार व मेह-नती मनुष्याची बढती व आळशी कामवाल्यांस दंडाची किंवा बरतर्फीची शिक्षा ताबडतोब देत जाण्याची चांगली सवड झाली.

**कलकत्त्यास प्रिन्स ऑफ् वेल्स** यांच्या भेटीस गेल्यावेळीं आह्मीं **फोर्ट विल्यम** येथील मेघजीन किंवा आयुधागार पाहिलें होतें त्या न-मुन्यावर परत आल्यावर नवीन हत्यारखाना उभा केला. व निरनिराळ्या तऱ्हेचीं हत्यारें त्यांत पुढील व्यवस्थेनें लावून ठेविलीं. तळमजल्यांत प-लटणीच्या बंदुका, पिस्तुलें, तलवारी, व निशाणें लावून ठेविलीं, व दुसऱ्या मजल्यावर खुद्द राज्यकर्त्यांचीं हत्यारें एकनळी व दुनळी बंदुका, खारदार बंदुका, कडाबिनी, पिस्तुलें, ढाली, तलवारी, व माहीमरातब लावून ठेविलीं. बंदुका लांकडी बैठकीवर लावून ठेविल्या. व भाले व नि-शाणें पटावास लावून ठेविलीं व पिस्तुलें आणि संगिनी भिंतीशीं स्वस्ति-काकृति लावून ठेविलीं होतीं.

---

## भाग ४ था.

### नबाब सुलतान जहान बेगम इचें कुराण वाचणें पुरें झालें त्याबद्दल.

आपल्या मुलांच्या लग्नाकरितां पुष्कळ खर्च करण्याची **हिंदुस्थानां**तील लोकांत चाल आहे. व लग्नसमारंभ ते फार कडाक्यानें व आनंदानें करितात. परंतु आमच्या वाडवडिलांनीं यापेक्षां चांगली व श्रेष्ठ चाल पाडून ठेविली आहे. ती ही कीं, त्यांच्या मुलांनीं **कुराण** वाचण्याचें संपविलें ह्मणजे मोठा आनंद मानून त्या दिवशीं पुष्कळ मेजवान्या वगैरे दिल्या जातात. याला **शादी नशरा** असें ह्मणतात. या रीतीस अनुसरून आमच्या मातोश्रीचा **नशरा** आमच्या आजीनें व आमचा **नशरा** आमच्या मातोश्रीनीं पुष्कळ खर्च करून डामडौलानें व भपकेदारपणानें केला व हीच चाल आह्मींही पुढें चालविली. हा उत्साह तारीख १७ मोहरम सन १२८८ रोजीं सुरू होऊन तारीख ११ रबिलावल रोजीं संपला. राज्यांतील व **भोपाळ** शहरांतील सर्व लोक व सर्व सरकारी नोकर यांना उत्तम तऱ्हेची मेजवानी दिली व मौल्यवान पोषाखवगैरे दिले गेले. साहेबलोक व आसपासचे राजे यांचा पूर्वीपासून अशा प्रसंगीं **भोपाळां**त येण्याचा परिपाठ होता त्यांस व आसपासच्या राजेरजवाड्यांसही टोलेजंग मेजवानी दिली गेली.

आमचे आप्त इष्ट व राज्यांतील सरदार लोक यांनीं मोठ्या थाटानें खर्चाकडे न पाहतां हा समारंभ साजरा केला. ४० चाळीस रात्रींपर्यंत दीपोत्साह, दारूकाम, नाचरंग वगैरे प्रकार मोठमोठ्या नेमलेल्या पाहुण्यांच्या समाजापुढें सारखे भपक्यानें चालले होते. व शेवटीं रीतीप्रमाणें **निशात अफजा** बागेंत मोठी मेजवानी दिली गेली. या सर्व कृत्यांप्रीत्यर्थ एकंदर २९६४१९॥~॥ रुपये खर्च झाला.

**२ आमच्या दुसऱ्या लग्नाच्या संबंधाची हकीकत.**—आह्मी **कलकत्त्यास राणी**चे दुसरे चिरंजीव **ड्यूक आफ् एडिंबरो** यांच्या

भेटीस गेल्यावेळीं आमच्याबरोबर करनल **टाम्सन् पोलिटिकल एजंट भोपाळ** हे होते. त्यांनीं आह्मांस राज्याचा भार सहन करण्यास कोणी जोडीदार असावा याकरितां पुनः लग्न करण्याची सल्ला दिली. व हीच सल्ला, करनल **मीड एजंट गव्हरनर जनरल सेंट्रल इंडिया** यांनींही आह्मांस भेटल्यावेळीं दिली होती, त्यांस आह्मीं जबाब दिला कीं पुनर्विवाह करण्याचा आमच्या धर्मांत प्रतिबंध नाहीं, तथापि अद्यापपर्यंत आमच्या मनायोग्य कोणी जोडीदार आढळून आला नाहीं. **कलकत्त्याहून भोपाळास** परत आल्यावर या गृहस्थांनीं दिलेल्या सल्लेविषयीं विचार करितांना असें दिसून आलें कीं, ही सल्ला **परमेश्वराच्या** आज्ञेस अनुसरूनच आहे. **परमेश्वरानें** दिलेल्या धर्मग्रंथांत विधवांनीं पुनर्विवाह करण्याविषयीं स्वच्छ आज्ञा असून पुनर्विवाहाची चाल **अरबस्थान, तुर्कस्थान, इराण, तुराण,** व **मध्य एशियां**तील सर्व मुसलमानी लोकांत आहे. तेव्हां ईश्वराचे कायदे, व मित्र मंडळीची सल्ला यावरून ही गोष्ट करण्यास अनुकूलता दिसून आल्यावरून आह्मीं कोणी एखाद्या योग्य लहान थोरास आवडणाऱ्या व मनमिळाऊ मनुष्याशीं लग्न करण्याचा निश्चय केला. व **सुलतान जहान** बेगम इच्या **नशऱ्याच्या** प्रसंगीं करनल **टाम्सन्** साहेब **भोपाळास** आले होते. त्या वेळीं त्यांच्या मार्फत याबद्दल **गव्हरनर जनरल** साहेबांची परवानगी उघडपणें मागण्याचें आह्मांस बरें दिसलें. तारीख ८ मे सन १८७१ इसवी रोजीं, करनल **व्हिलोबी आस्बोर्न** साहेब **पोलिटिकल एजंट** यांजकडून एक इंग्रजी पत्र आलें त्यांत त्यांनीं लिहिलें कीं, 'आपण योजिलेल्या लग्नाच्या संबंधांत **फारेन सेक्रटरी**कडून आलेलें पत्र पाठविण्यांत आह्मास फार खुषी वाटत आहे व आपण पुनः लग्न केल्यास फार संतोषाची गोष्ट होईल.' या पत्रांतील सारांश कीं, '**बेगम**साहेबांनीं एखाद्या योग्य मनुष्याशीं पुनः लग्न करण्यांत **गव्हरनर जनरल** साहेबांस कांहीं हरकत दिसत नाहीं. परंतु प्रथम त्यांनीं याबद्दल राज्यांतील मुख्य मुख्य लोकांचें मत घ्यावें हें बरें.' त्यावरून आमच्या कुटुंबांतील मंडळीच्या व राज्यांतील कामगारांच्या

संमतीनें आह्मीं **सय्यद सादिक हसनखान** यांस पसंत केलें. हे गृहस्थ १७ वर्षें सरकारी नोकर असून ते नबाब **सिकंदर** बेगम यांच्याजवळ फार वर्षेंपर्यंत मुनशी होते. त्यांनीं त्यांची अद्वितीय विद्वत्ता व सद्गुण यांची पारख करून त्यांना **भोपाळ**चा इतिहास लिहिण्याच्या कामीं सुपरिंटेंडंट नेमिलें. नंतर त्यांना विद्याखात्यावर मुख्य नेमिलें. त्या वेळीं त्यांजकडे **सुलेमानी** व इतर शाळांच्या शिक्षकांवर देखरेख करण्याचेंही काम असे. त्यानंतर त्यांना **मीर डबीर** व **खान** हे किताब देऊन त्यांस माझे मुनशी किंवा हुजूर चिटणीस नेमिलें. त्यांजकडे दिलेलें काम करण्यांत त्यांची फार हुषारी, खरेपणा व जलदी दिसून आली. ते आजचें काम उद्यांवर कधीं टाकीत नसत. व सर्व सरकारी कामगार व आमची आप्त इष्ट मंडळी यांना त्यांचा स्वभाव फार पसंत पडला होता. त्यांच्या अंगीं कल्पकपणा व धरलेलें काम शेवटास नेण्याची उमेद विशेष असून त्यांना अरबी व फारसी उत्तम येत होतें. ते ग्रंथरचना चांगली करीत. व त्यांना इतर सर्व शास्त्रेंही अवगत होतीं. ते फार भले होते. ते **सय्यद** किंवा **फातमा**च्या वंशांतले होते. हें कुल सर्व मुसलमानांत फार श्रेष्ठ मानलें जातें. त्यांनीं केलेले पुष्कळ धर्मविषयक ग्रंथ लोकांत चांगले प्रसिद्ध आहेत. या राज्यांत नोकर झाल्या दिवसापासून कांहीं इतर सरकारी नोकरांप्रमाणें त्यांना कधींही दंड झालेला नाहीं. किंवा कोणच्याही अव्यवस्थितपणाबद्दल त्यांच्यावर टपका आलेला नाहीं. मोठ्या **बेगम**साहेब त्यांची नेहमीं तारीफच करीत. ते हमेषा अभ्यासांत निमग्न असत. त्यांच्या वडिलांचें नांव **सय्यद औलाद** असून ते बुखारा व कनोज येथील राहणारे होते. त्यांच्या आजाचें नांव नबाब **सय्यद औलाद अलीखान बहादूर अनवरजंग,** असें होतें. दक्षिण हैदराबादेचे **निजाम निजामउल्मुलुख आसफजा** यांच्या पदरीं ते एक मुख्य व नामांकित जहागीरदार होते. त्यांना पांच लक्षांची जहागीर व एकहजार स्वार व पायदळ यांची मनसब होती व **मनवली, मिसलखेडा** व **बिमलखेडा** वगैरे

गांव त्यांच्या खर्चाकरितां तोडून दिले गेले होते. त्यांचे पणजे **सय्यद अजीजउल्ला** हे नबाब **अबुल फत्तेखान शम्सुलउमरा** यांचे सख्खे चुलत बंधु होते. व त्यांची पिढी **सय्यद जलालखान** बुखारावाले ज्यांच्या विषयीं **'मखदुमे जहानियान् जहान्गष्त'** अशी प्रसिद्धि आहे त्यांच्यापर्यंत पोहोंचते. **सय्यद अजीजउल्ला हे निजामउल्मुलुखाच्या** भाऊबंदांपैकीं व पदरच्या मोठ्या सरदारांपैकीं एक असून त्यांच्याकडे पुष्कळ मुलूख व फौज असे. ते आपल्या वयाच्या नव्वदाव्या वर्षीं ता० २० सव्वाल स० हि० १२७९ रोजीं वारले. त्यांची पदवी त्याच्या पुत्रास मिळाली.

एकंदरींत परमपूज्य अशा कुराणांतील आज्ञेस व इंग्रजी कामगारांच्या सल्लेस अनुसरून आह्मीं लोकापवादास जागाच न राहूं देण्याचा निश्चय केला. कारण आह्मांस व आमच्या मुनशीस सरकारी कामानिमित्त हमेषा अगदीं एकांतांत बसण्याचा प्रसंग येई. बायकांनीं आपल्या नवऱ्याशिवाय इतर परपुरुषाबरोबर असें एकांतांत बसणें गैर आहे, असें इकडील लोक मानितात. याकरितां **महंमद जमालुद्दीनखान मदारुल्महाम** व **शेखजैनुल आबदीन** सरकारी **काजी** व इतर विद्वान लोक व सरकारी कामगार यांच्यासमक्ष बुध्या दरबार भरवून **सैय्यद**साहेबांशीं शास्त्रोक्त विवाह करण्याचें ठरविलें, व तसें करून **करनल आस्बोर्न**साहेब **पोलिटिकल एजंट** यांस शिरस्त्यानें कळविलें. त्यांच्याकडून ता० ३० जून स० १८७१ इ० रोजीं जबाब आला कीं, **'गव्हरनर जनरल**साहेबांनीं आपल्यास पुनर्विवाह करण्याची परवानगी दिल्याबद्दल आपल्यास मागेंच कळविलें गेलें असून त्या संबंधाचें फारेन सेक्रेटरी साहेबांकडील पत्रही आपल्याकडे पाठविलें गेलें आहे. आपण आपला विचार नीटपणें सर्वांस अनुकूल अशा रीतीनें तडीस नेल्याबद्दल सरकारास फार खुषी वाटत आहे.'

लग्नानंतर **सय्यद** साहेबांचा मानमरातब व पदवी नबाब **बाकी महंमदखान** यांच्या बरोबरीची केली गेली आहे. मीर डबीरीच्या जागेचा

पगार आजवर ४९३१ रु० ठरविला गेला होता व **मोतमीद उल्म-हामची** जागा ता० ६ आक्टोबर स० १८६९ इ० रोजीं राजा **किस-नराम** वारल्यापासून रिकामीच होती. या जागेस चोवीस हजार रुपये सालच्या उत्पन्नाची जहागीर होती. त्यापैकीं सहा हजार रुपये साल सदरहू राजाच्या वारसांकडे चालून बाकीची जहागीर जप्त होती. **मीर डबीरी**ची जागा वजा केली होती. **मीर डबीरी**ची जागा वजा केली व तिचा पगार या जागेस जोडून शिवाय १०६८।८ रुपये जास्ती वाढविले. याप्रमाणें एकंदर २४००० रुपये सालाचें उत्पन्न **मो-तमीदउल्महाम** ही पदवी व दुय्यम नायबीचें काम तारीख २ जुलई स. १८७१ रोजीं सय्यद **महंमद सादिकहसनखान** यांस देऊन त्यांस खिलत दिली. त्यांत ९ नवे पोषाक, पांच ५ जडावाचे दागिने, छत्री, निशाणें, चवरी, घोडा, व पालखी, हींही दिलीं. एकंदरींत २१०५३८=॥. किमतीच्या रकमा भर दरबारांत सरकारी कामगार, व आप्त, इष्ट, यांच्या समक्ष त्यांना दिल्या गेल्या व त्यांचा कसा मानमरातब वाढविला तें लहान मोठ्यांस समजावें याकरितां त्यांना आपल्या हत्तीवर बसवून नवीन मिळालेल्या सर्व डामडौलानिशीं आपल्या घरीं जाण्यास सांगितलें व माजी कारकिर्दींत दुय्यम नायब जीं जीं कामें करीत होते तीं तीं सर्व आह्मी त्यांजकडून आमच्या हुजूर करवून घेऊं लागलों. या गोष्टीचीही इत्तला शिरस्त्यानें **पोलिटिकल एजंट** यांना दिली व त्यांनीं तारीख ३१ जुलई सन १८७१ रोजीं आह्मीं केलेल्या उत्तम व्यवस्था मंजूर असल्याचें कळविलें.

या प्रसंगीं **सय्यद**साहेबांनीं दरबारांत भाषण केलें तें—ज्या परम दयाळू **परमेश्वरानें** राज्यनिष्ठा, खरेपणा, उद्योग, व उत्सुकता, इत्यादि नोकराच्या अंगचे अवश्य गुण हुशार, उदार, व दयाळू धन्याच्या सं-बंधांत व्यक्त झालेले सर्व लोकांच्या उन्नतीस कारण करून ठेविले आहेत, त्याचा मी फार आभारी व ऋणी आहें. तसेंच त्यानें मला थोर, उदार व प्रसिद्ध अशा मालकाच्या उदार देणगीस पात्र केलें याबद्दलही मी

फार उपकारी आहें. त्यांचे अगणित उपकार व सदयता यांचा अनुभव हल्लीं दरबारांत असलेले सर्व लोकच घेत आहेत असें नसून, पुष्कळ दूर दूरच्या शहरांतील लोक व सर्व प्रजाजनही त्याचा अनुभव घेत आहेत. आमचे **महंमद पैगंबर** ज्यांनीं त्यांच्यावर विश्वास ठेवणाऱ्या लोकांची सर्व पातकें **दयाळू**पणानें नाहींशीं करून सर्व वाईट वासना व मनोविकार, लांच खाणें, नुकसान करणें, चोरी करणें, मत्सर व पक्षपात आणि ऐहिक व पारमार्थिक अलगर्जीपणा नाहींसा करून टाकला आहे व ज्यांनीं पापी लोकांना इहलोकीं अपकीर्ति व परलोकीं यातना मिळतील असा धाक ठेवला आहे व ज्यांनीं आह्मांस खरेपणा, कळकळ, उत्सुकता, भक्ति ताबेदारी, मैत्री व विश्वास इत्यादिकांच्या मार्गास लावून दिलें आहे व त्यापासून होणारीं फळेंही दाखवून दिलीं आहेत त्यांचा विजय असो. **भोपाळ**च्या नवाब साहेब **शहाजान** बेगम ज्यांनीं कृपा करून गुणांची पारख करून मेहरबान होऊन उदार बुद्धीनें मला प्रथम मीर मुनशी करून रजाचा गज किंवा रंकाचा राव केला व नंतर आपल्या औदार्यानें व मेहरबानगीनें मजला राज्याच्या दुय्यम नायबाची जागा, त्या संबंधाचे मानमरातब व जहागीर वगैरे सुद्धां दिली व माझी पदवी व योग्यता वाढवून मजला ज्यास्त राज्यनिष्ठा दाखविण्याचें साधन करून दिलें त्यांचा मी फार आभारी आहें. याप्रमाणें त्यांनीं माझ्या अंगीं असलेल्या यत्किंचित् गुणांचें जें चीज केलें त्याबद्दल मजला इतका उपकार वाटत आहे कीं, तो मी या प्रसंगीं थोडक्याशा शब्दांनीं व्यक्त करूं शकत नाहीं व मीं जी नोकरी बजावली त्याबद्दल चीज होण्याविषयीं मीच स्वतः बोलणें बरोबर दिसणार नाहीं. सबब हल्लीं मी हमेषा मनापासून कृतज्ञतापूर्वक वर्तन करून होईल तेथवर त्यांनीं मजवर जी ही मेहरबानगी केली आहे तिला पात्र राहून आजन्म त्यांच्या व त्यांच्या संततीच्या हिताकरितां झटेन असें वचन देतों. या राज्याच्या हिताकरितां तत्परतेनें, उत्सुकतेनें, भक्तीनें, व एकनिष्ठेनें रोजच्या रोज झटण्याची शक्ति **ईश्वर** माझ्या अंगीं वाढवीत जावो. **ईश्वर** करो व नवाब **बेगम** साहेब यांचे भाऊबंद व

राज्यांतील कामगार लोक हे माझ्या खरेपणानें, कळकळीच्या वर्तनानें, व गुप्त व उघड राज्यनिष्ठेच्या वर्तनानें आमरणांत मजशीं राजी राहोत.

पुढें दुय्यम नायब किंवा **मोतमीद उल्महाम** ही जागा यांच्या महत्वाच्या मानानें पाहिजे तितकी मोठ्या दरजाची नाहीं असें जाणून तारीख १ सफर सन १२८९ हिजरी रोजीं ती कमी करून त्यांस **इंडिया** सरकारच्या संमतीनें नबाब **वालाज्याहा अमीर उल्मुलुख सय्यद महंमद सादिक हसनखान** बहादूर हा किताब दिला. नबाब साहेब कुलाचार रूपरत्नांची खाणच आहेत व खऱ्या विनयाचें भांडारच आहेत. त्यांनीं धर्मवाक्यें व आज्ञा याच ऐहिक व पारमार्थिक सुखांचे उत्तम साधन आहेत असें जाणून त्यांस अनुसरून त्यांनीं आमचा आपसांत बेबनाव होईल तर मला २५००० रुपये स्त्रीधन देण्याचें व त्यांच्या खासगी उत्पन्नांतून दरसाल ३००० रु० हातखर्चास देण्याचा ठराव केला.

एखाद्या सरदाराचा मान मरातब व दरजा त्याच्या मालकाकडून वाढविला जातो त्या वेळीं जवळचे इतर मोठे लोकही त्याला त्याचप्रमाणें ज्यास्त मान देऊं लागतात. व आमरणांत त्याची त्याच नांवानें प्रसिद्धि असते व प्रत्येक जण त्याच्याशीं त्याच्या पदवीस व दरजास योग्य अशा अदबीनें वर्तनही करितो. ह्मणून तारीख ४ फेब्रुवारी सन १८७२ इसवी रोजीं आह्मीं **पोलिटिकल एजंट** कर्नल **आस्बोर्न** यांच्याकडे शिरस्त्यानें खलीता पाठविला कीं, ‘वरिष्ठ सरकारच्या संमतीनें ज्या वेळीं आमचें लग्न बक्षी **बाकी महंमदखान नसरतजंग** यांजबरोबर झालें त्या वेळीं सरकारांतून त्यांना पुढें लिहिल्याप्रमाणें मानमरातब व पदव्या देण्यांत आल्या होत्या.

१ नबाब **नजीर उद्दवला** ही पदवी. २ **गव्हरनर जनरल** साहेबांकडून खिलत किंवा वस्त्रें. ३ **भोपाळ**शाईत १७ तोफांची सलामी. ४ इंग्रजी अंमलदारांकडून परत भेट. ५ खिलत दिली जाईल त्या वेळीं भोपाळ बटेलियनच्या आफिसरांकडून नजर. ६ **पोलिटिकल एजंट**चे असिस्टंट यांनीं **जहानगिराबाद** येथील कोठींतून तेथील पुलापर्यंत त्यांना

सामोरें किंवा पेशवाईस यावें. ७ **इंदूर** व **सिहोर** येथील **एजन्सीचे** मीर मुनशी यांनीं त्यांना बुधवार दरवाज्यापावेतों सामोरें जावें. ८ **एजंट गव्हरनर जनरल** व **पोलिटिकल एजंट भोपाळ** यांनीं **भोपा-**ळास असते वेळीं त्यांच्या घरीं त्यांच्या भेटीस जाणें. इतके मानमरातब त्यांना इंग्रज सरकारांनीं दिले होते. शिवाय या संस्थानाच्या अखत्या-रींतील हक्क व मानमरातब ह्मणजे, सर्व कामगारांकडून व आमच्या कुटुंबांतील माणसांकडून व सरकारी अंमलदारांकडून नजरा घेणें व त्यांच्यायोग्य जहागीर देणें, वगैरे या सरकारांसून केल्या गेल्या होत्या. तेव्हां **इंग्रज** सरकारांतून व या सरकारांतून जे जे हक्क व मानमरातब नबाब **बाकी महंमदखान** यांस दिले गेले होते ते सर्व तसेच **सय्यद सादिक हसनखान** यांना दिले जावे. कारण **इंग्रजी** व मुसलमानी दोन्ही कायद्यांच्या रीतीनें दुसरा नवरा सर्वथैव पहिल्या नवऱ्याप्रमाणेंच समजला जातो व राज्याच्या मालकिणीचा नवरा राज्याचा नोकर व **मोतमीद उल्महाम** हीं कामें करणारा असणें ही गोष्ट त्या मालकि-णीस कमीपणा आणणारी आहे. याकरितां **सय्यद सादिक हसन-खान** यांचा मानमरातब व दरजा सर्व तऱ्हेनें माजी नबाब **बाकी महंमदखान** यांच्या बरोबरीचा असणें अगदीं योग्य असून त्यांनीं **मोतमीद उल्महामचे** कामाचा राजीनामा देणें अगदीं जरूर आहे. याकरितां आमची करद्वय जोडून प्रार्थना आहे कीं, **इंग्रज** सरकारांनीं मेहरबानी करून **सय्यद सादिक महंमदखान** यांस पहिल्या नबाबाप्र-माणें सर्व मानमरातब व नबाब **अमीरउल्मुलुख सय्यद महंमद सादिक हसनखान** बहादूर असा किताब द्यावा. ही विनंति आह्मीं प्रथमच केली नाहीं. कारण पुनर्विवाहास धर्मसंमती असून ही चाल इतर देशांतील मु-सलमानांस व इंग्रज लोकांतही चालू आहे तथापि **हिंदुस्थानां**तील मु-सलमान लोकांनीं ही चाल विलक्षण मानून ती सोडून दिली आहे व हिंदु लोकांचें या संबंधाचें वर्तन किंवा मत त्यांच्याही मनांत अगदीं पक्कें खिळून गेलें आहे. परंतु हें मत व्यवहारज्ञान व मुसलमानी धर्म व इं-

ग्रजी कायदे यांस अगदीं विरुद्ध आहे. आमचे कांहीं भाऊबंद अज्ञानामुळें पुनर्विवाह पसंत करीत नाहींत व पुनर्विवाह करणें आमच्या कुलपरंपरेस विरुद्ध असल्यानें आमचा पुनर्विवाह त्यांला संमत नाहीं. अशा स्थितींत दुसऱ्या पतीचा मानमरातब प्रथम पतीच्या बरोबरीचा केला गेल्यानें तर त्यांना विशेषच विषाद वाटेल, याकरितां, आमच्या हल्लींच्या पतीस या दरबारांत परोपरीनें पूर्वींच्या पतीच्या योग्यतेस चढविण्याचें आह्मीं ठरविलें व हा हेतु मनांत धरून त्या वेळीं खालीं असलेली **मोतमीदउल्महाम**ची जागा प्रथम त्यांना दिली. हल्लीं ही जागा कमी करून त्या जागेच्या जहागिरीचें उत्पन्न जें माजी कारकिर्दींत दरसाल खर्चीं पडत होतें तें सरकारांत जमा करून पूर्वींच्या **नबाबा**च्या इतकी जहागीर हल्लीं त्यांना दिली जाऊन त्यांचा दरजा माजी **नबाबा**च्या बरोबरीचा केला जाईल. या आमच्या हेतूस अनुकूल असा आपण अभिप्रायाचा जबाब द्याल अशी आशा आहे.'

या खलित्याचें भाषांतर करून डांकमार्गें **पोलिटिकल एजंटां**नीं **एजंट गव्हरनर जनरल** यांकडे पाठविलें व त्यांनीं तें **गव्हरनर जनरल** साहेबांकडे माहितीकरितां पाठविलें. त्यांनीं आमची विनंति मान्य केली. पुढें शिरस्त्याप्रमाणें याबद्दलच्या मंजुरीचा खलिता आमच्याकडे **पोलिटिकल एजंटां**नीं तारीख १७ दिसेंबर १८७२ रोजीं पाठविला व तारीख १० शाबान रोजीं ते स्वतः **गव्हरनर जनरल** साहेबांकडून आलेलीं वस्त्रें घेऊन आले. व **जहान्गीराबाद** येथील कोठींत राहिले.

तारीख ११ रोजीं **पोलिटिकल एजंट** समारंभानें खिलत घेऊन वाड्यांत आले. या समारंभाकरितां दरबारचा दिवाणखाना शोभिवंत केला गेला होता. राज्यांतील सर्व कामगार, आमच्या कुटुंबांतील सर्व मंडळी, जमीदार, व जहागीरदार शिरस्त्याप्रमाणें हजर होते. व नेहमींप्रमाणें तोफांची सलामी झाली. व ठरावाप्रमाणें इस्तिक बालचा समारंभ झाला. आह्मी सर्व आपल्या जागीं बसल्यावर व परस्परांचें आगतस्वागत झाल्यावर **पोलिटिकल एजंट** यांनीं आमच्या हातीं सरकारां-

तून आलेला आनंद व मान्यताप्रदर्शक खलिता दिला. त्यांत खिलत व नबाब ही पदवी देणें मंजूर असल्याबद्दल मजकूर होता. **पोलिटिकल एजंटांनीं** आपल्यासही याबद्दल फार आनंद झाल्याचें कळविलें. त्यांच्या हुकुमावरून मीर मुनशी **दीन दयाळ** यांनीं तो खलीता साग्र दरबारांतील मंडळीस वाचून दाखविला. त्यांतील मजकूर येणेंप्रमाणें:—

यापूर्वींच ता० १८ सप्तंबर रोजी **इंग्रज** सरकारांनीं आपले प्रिय भर्ते नबाब **सादिक हसनखान** यांस खिलत व **नबाब** ही पदवी देण्याचें मंजूर केल्याचें आनंदकारक वर्तमान आपल्यास कळविलेंच आहे. आज आपल्या या दरबारांतील मंडळीच्या समक्ष आह्मी **नबाब**साहेबांस खिलत व पदवी मोठ्या उल्हासानें व आनंदानें देतों. यापासून आपल्या सर्व प्रजेस संतोष होणारा आहे. **नबाब वालाजाहा अमीर उल्मुलुख** ही पदवी व या थोर पदवीच्या योग्य खिलत **इंग्रज** सरकारांनीं **नबाबास** दिल्याचें येथें जमलेल्या **भोपाळ** संस्थानांतील सरदार व कामगार यां समक्ष मी जाहीर करीत आहें. व या पदवीच्या योग्य सर्व मानमरातब त्यांना **इंग्रज** सरकाराकडून दिले जातील. **बेगम** साहेबांचे आप्त, इष्ट, सरदार व राज्यांतील कामगार लोक यांनीं पूर्वींच्या नबाबाप्रमाणेंच यांनाही सर्व तऱ्हेनें मानमरातब आनंदानें देणें योग्य व इष्ट आहे. **इंग्रज** सरकारांचीही मेहेरबानगी व उपकार ध्यानांत ठेवून नबाबांनींही आपल्या मालकाची कीर्ति, व प्रजेचें हित व भरभराटी विशेष वाढेल अशा गोष्टी करण्यास झटणें योग्य आहे.

'इतर संस्थानांस कित्ता घेण्याजोगी व्यवस्था असलेल्या या संस्थानाची उन्नति व सुधारणा जारी चालू ठेवून याच मार्गाचें सदोदित अवलंबन करणें आपण व नबाबसाहेब यांस सोपें आहे. हल्लींचा हा खिलत व पदवी देण्याचा समारंभ नबाब **सय्यद महंमद सादिक हसनखान** यांना व आपल्यास व राज्यांतील इतर सरदार लोकांस सुखकारक होवो. अशी प्रार्थना करून मी हा समारंभ पुरा करितों. ता. १५ अक्टोबर सन १८७२.

त्यानंतर **पोलिटिकल एजंटांनीं** नबाबांस वस्त्रें दिलीं व त्यांनीं पोलिटिकल एजंट यांस **गव्हरनर जनरलच्या** नांवानें १०१ मोहरा नजर केल्या. व आमची आप्तमंडळी, राज्यांतील कामगार लोक व जमीदार वगैरे लोकांनीं आपआपल्या योग्यतेनुरूप नबाबांस नजरा केल्या. नंतर **पोलिटिकल एजंट** यांनीं **नबाबांस** आपल्या बरोबर नबाब **खुदसिया बेगम** यांच्या घरीं नेलें. त्या मानानें आह्मां सर्वांपेक्षां ज्यास्त असल्यानें त्यांना नबाबांनीं १ मोहोर व ९ रुपये नजर केले. पुढें दरबार आटपून **पोलिटिकल एजंट** परत गेले. या आनंदाच्या वेळीं सरकारी खजिन्यांतून १००० रुपये गरीब लोकांस धर्म केला. व पदरच्या सर्व नौकरांनीं आपला साडेसात दिवसांचा पगार नबाबसाहेबांस दिला. व याशिवाय आपल्या पगारांतील शेंकडा १० रु. प्रमाणें स्वतः नबाबांस नजर केली. शिरस्त्याप्रमाणें ह्मटलें ह्मणजे सर्व नौकर लोकांचा १९ दिवसांचा पगार कापला जावा. परंतु नबाबांनीं त्यांतून ७ दिवसांचा पगार मेहेरबानगी करून माफ केला. राज्याच्या उत्पन्नापैकीं एका रुपयास एक आणा प्रमाणें रकम निराळी काढून ठेविली. तिचा विनियोग गरीब लोकांस व सरकारी नौकरचाकरांस मेजवानी देण्याच्या कामीं करावयाचा होता. ता. १ साबान सन १२८९ हिजरीपासून ७९४७२॥=। रु. ची जहागीर सरकारांतून नबाबसाहेबांच्या उपभोगाकरितां लावून दिली. **गव्हरनर जनरल** साहेबांकडून १०००० रुपये किंमतीची खिलत आली त्यांत एक जडावाचा शिरपेंच, एक मोठी मोत्यांची कंठी, एक मंदील, एक भरजरी आंगरखा, एक दुशाला, एक झगा, एक किनखाबाचा तागा, एक मलमलीचा तागा, चार दुनळी बंदुका, सोन्याचे मुठीची एक समशेर, एक जरीचा कमरपट्टा, एक पेश कबजा, एक धनुष्य, एक बाण, भाता एक, ढाल एक, चांदीचें काम केलेल्या हौद्यासहित हत्ती, त्याच्या डोकीवरील जरीच्या कपड्यासुद्धां, एक भरजरी पंखा, एक मखमाली मसनद किंवा गादी तकियासुद्धां, व सोन्याचांदीच्या दुमची व भरगची खोगिरासुद्धां एक घोडा, वगैरे जिनसा होत्या. नबाबसाहेबांनीं हें सर्व सामान सरकारांत

देऊन त्याच्या बदला सरकारांतून त्यांची किंमत घेतली. व वर लिहि-ल्याप्रमाणें जहागीर मिळाल्यावर पूर्वी ३००० रु. सालीना आह्मांस हातखर्चास देण्याचा ठराव केला होता, तो वाढवून ६००० रु. देण्याचा ठराव करून त्याप्रमाणें ते रुपये आमच्या खासगीकडे सन १२८९ फसली सालापासून देऊं लागले.

आमच्या राज्यांतील **दक्षिण**भागांत दुसरे वेळ दौरा करून सन १२८९ हिजरी सालापासून नवीन सुधारणा सुरू केल्या, त्याबद्दलची हकीकत—

आह्मी गादीवर बसल्या दिवसापासून ३ वर्षांच्या मुदतींत राज्याच्या तिन्ही भागांत दौरे केले त्यांची हकीकत पूर्वी आलीच आहे. परंतु आपण समक्ष जाऊन रयतेची स्थिति व कामगार लोकांची काम करण्याची रीति वरचेवर तपाशीत राहिल्यानें चांगली व्यवस्था राहते याकरितां प्रतिवर्षी दौरे करण्याचा ठराव करून ता० १० सवाल सन १२८८ इ० रोजीं प्रथम **दक्षिण**भागांत दौरा करण्याकरितां **भोपाळाहून** कूच केलें. जवळ जवळ दोन दोन आठवडे प्रत्येक महालांत राहून रयतेस सुख देण्याकरितां पूर्वीच्या दौऱ्याप्रमाणें व्यवस्था ठेवून अमीन लोकांविषयीं चौकशी करून व रयतेचे तंटे तोडून प्रजेच्या दुःख निवारणाचे उपाय सुरू केले. आपल्या लष्करांत कोणीही सामान घेईल त्याचे दाम बाजारभावाप्रमाणें दिले जावे. उधार सामान कोणचेंही घेऊं नये ह्मणून हुकूम दिला. या दौऱ्यांत सर्व रयतलोक संतुष्ट व राजी असल्याचें नजरेस आले. व कामगार लोकांस, प्रत्येक गुन्ह्याची चौकशी होऊन शाबिती झाल्यास कडक शिक्षा देऊं, अशी भीति असल्यानें त्यांच्या हातून गैरवाजवी गोष्टी किंवा जुलूम होणें बंद पडल्याचें दिसून आलें. तथापि ज्या कोणाकडे यत्किंचित्ही अपराध शाबीत झाला, त्याला त्याच्या योग्य शिक्षा देण्यांत आली. या दौऱ्यांत एकंदर अर्ज्या ७१८ आल्या. त्यांचा निकाल करण्याकरितां त्यांचा ज्या ज्या खात्याशीं संबंध होता तेथील वरिष्ठ अंमलदाराकडे शेरे लिहून निकाल केला. पूर्वी दि-

वाणी कोर्टीचा असा नियम होता कीं एखाद्या कर्जदाराच्या सर्व जिनगीचा लिलांव करून जें उत्पन्न होईल तें त्याच्या सावकारास हिसेरशीनें वांटून देऊन कर्जदारास पुऱ्या कर्जाबद्दलच्या पावत्या देवविल्या जात होत्या. या योगानें पुष्कळ जिनगी कर्जदार लोक छपवून ठेवीत. त्यामुळें सावकारांचें नुकसान होई व लबाड लोकांस सावकार लोकांचें नुकसान करण्यास सवड सांपडे. याकरितां हा नियम बदलून असा नियम ठरविला कीं, सर्व जाहीर जिनगीचा लिलांव करून झालेलें उत्पन्न सावकारास हिसेरशीनें वांटून देऊन त्याजबद्दल पुऱ्या कर्जाच्या पावत्या न घेतां जेवढा पैसा दिला गेला तेवढ्याच पावत्या कर्जदारास दिल्या जाव्या. व कर्जदाराची आणखी कांहीं जिनगी केव्हांही नजरेस आल्यास तिची जप्ती करून हुकूमनाम्याची पुनः बजावणी करावी. अशी नवीन व्यवस्था त्या वेळेपासून सर्वत्र सुरू केली.

२ पूर्वीं **भोपाळांत** कर्ज, व देणेंघेणें वसूल करण्याची मुदत १९ वर्षांची असून **सिहोरच्या** छावणींत इंग्रजी कायद्याप्रमाणें ३ वर्षांची मुदत होती. या नियमाच्या योगानें **सिहोरच्या** छावणींत राहणाऱ्या वादी लोकांवर अन्याय होत असे. ह्याकरितां सर्वत्र १९ वर्षांचीच मुदत ठरवून दिली.

३ दिवाळखोर सावकार लोकांच्या संबंधांत कांहीं पक्का नियम ठरला गेला नव्हता. त्यामुळें दिवाणी कामगारांस फार त्रास पडत असून सावकार लोकांस अनेक तऱ्हेच्या हरकती येत. याकरितां या संबंधें पुढील नियम ठरवून टाकिले. एखाद्याचें दिवाळें निघाल्याचें तो स्वतः जाहीर करून आपल्या सावकारांची हिसेरशीनें फेड करावी ह्मणून अर्ज करील त्या वेळीं प्रथम त्याचें खरोखर दिवाळें निघालें आहे अशी खात्री करून घेतल्यावर त्याच्या सर्व जिनगीची यादी करून ती जिनगी जप्त करावी. व नंतर त्याचें दिवाळें निघण्याच्या कारणांची चौकशी करून एक महिन्याच्या आंत आपल्या घेण्याबद्दल दावा करण्याविषयीं त्याच्या सावकारांस नोटिसा दिल्या जाव्या. नंतर त्याच्या सावकाराचें पत्रक

त्याच्या घेण्याच्या ऐवजासुद्धां तयार करून वरील मुदत संपल्यावर प्रत्येक सावकारास त्याच्या घेण्यापोटीं हिसेरशीनें किती रकम मिळेल तें कळवावें. त्यानंतर त्या सावकारानें जरूर वाटेल तर शिरस्त्याप्रमाणें कोर्टफी वगैरे भरून दावा आणावा. व त्या दाव्याची शिरस्त्याप्रमाणें चौकशी व्हावी. कांहीं जरूरीच्या मोकदम्यांत कर्जदाराच्या जिनगीची जप्ती झाली तर सावकारास कर्जदारानें छपवून ठेवलेली जिनगी शोधून काढण्यास सवड मिळण्याकरितां कर्जदारास १ एक महिनापर्यंत कैदेंत ठेविलें जावें. व कोर्टानीं जिनगी जप्त करून पूर्वीं लिहिल्याप्रमाणें व्यवस्था केल्यावर जर कर्जदार व सावकार हे आपसांत कर्जदाराची हिसेरशीनें जिनगी वांटून घेण्यास कबूल असतील तर ठरावाच्या फीपैकीं निमे फी कापून घेऊन ती जिनगी त्यांच्या स्वाधीन करावी.

४ गरीब लोकांस कोर्टफी देण्याचें सामर्थ्य नसल्यानें व आपला दावा रद्द झाल्यास आपल्याकडून कोर्टफी सक्तीनें वसूल केली जाईल अशी भीति असल्यानें त्यांचे खरे असलेले दावेही त्यांना चालवितां येत नसत. याकरितां असा ठराव केला कीं, एखादा मनुष्य अगदींच नादार असून त्याला जमानतही मिळणार नाहीं अशी स्थिति असेल तेव्हां त्याचा दावा फुकट चालविला जावा. व दावा रद्द झाल्यास कोर्टफी माफ करावी.

५ एखाद्या दाव्यांतील पक्षकारलोकांकडून दाव्याचे शाबुतीकरितां दस्तऐवज दाखल केले जातील त्या वेळीं, पुढें ते कोणत्या उद्देशानें दाखल केले होते याबद्दल तक्रार उपस्थित न व्हावी ह्मणून तें प्रकरण दाखल करतेवेळीं तें कसें व कां दाखल केलें याबद्दलचा खुलासा लेखी करून घ्यावा असा ठराव केला.

६ कसबिणी व रामजण्या वगैरे लोक आपण शिकवून तयार केलेल्या मुलींच्या, गाणें, व नाचणें यापासून होणाऱ्या उत्पन्नावर आपला हक्क असल्याचा दावा करून त्यांजला लग्न करूं देत नसत. ही गोष्ट साधारण न्यायदृष्ट्या व धर्मशास्त्राप्रमाणेंही विरुद्ध होती. याकरितां असा ठराव केला कीं, या मुली स्वतंत्र असून त्यांच्या स्वतःवर त्या कसबिणींचा

कांहीं हक्क नाहीं. त्यांनीं वाटेल तर खुशाल लग्न करावें. परंतु लग्न करतेवेळीं त्यांच्या जवळ असलेले सर्व दागदागिने वगैरे जिनगी त्यांना ज्यांनीं शिकवून तयार करून वाढविलें त्यांची समजली जावी.

७ एखाद्या ठरावावर अपील करण्याची मुदत, ठरावाची नक्कल घेतल्यावर ३ तीन महिन्यांची ठरविली होती. परंतु ज्याच्या विरुद्ध फैसला झाला असेल तो पक्षकार बुद्ध्या ठरावाची नक्कल लौकर घेत नसे. व यामुळें अपिलाची मुदत सहजच वाढत जाई. त्यावरून असा ठराव केला कीं, अपिलाची मुदत ज्या तारखेपासून ठरावाची नक्कल पक्षकारांनीं घ्यावी ह्मणून त्यांजला नोटीस दिली जाईल त्या तारखेपासून मानावी व अशी नोटीस खटल्याचा निकाल झाल्यावर पक्षकारांस देण्यांत यावी.

८ **भोपाळ** शहरांतील चौकीदारांचा पगार शहरांतील लोकांपासून फौजदारीमार्फत वसूल केला जात असे. व गरीब लोकांस यापासून फार त्रास होत असे. हा पैसा शहरांतील लोकांच्या संरक्षणाकरितांच वसूल केला जात होता तथापि त्यांच्यावर मेहरबानी व दया करण्याकरितां हा कर माफ करून चौकीदारांचा दरमहा २२६ रुपये पगार सरकारांतून देण्याचा ठराव केला.

९ सरकारी कामगार व नौकर आपल्या आप्तइष्टांच्या नांवांवर गांव, इजाऱ्यांनीं घेत असत. व ते सरकारी नौकर असल्यानें त्यांना रयतेवर जुलूम करण्यास व सरकारी वसूल येण्यांत हरकत करण्यास सवड सांपडे. याकरितां असा ठराव केला कीं हल्लींच्या इजाऱ्याची मुदत संपल्यावर कोणाही साधारणप्रतीच्या नौकरास किंवा त्याच्या आप्तांस गांव इजाऱ्यानें दिले जाऊं नयेत.

१० दरसाल १२००० रुपये **भोपाळाहून सिहोर** सडकेच्या दुरुस्तीकरितां **सिहोर** खजिन्यांत दिले जात असत. ते बंद होण्याबद्दल लिहून पाठविलें. त्यावरून **भोपाळच्या पोलिटिकल एजंटां**कडून लिहून आलें कीं, लगतच्या **एजंट गव्हरनर जनरल व गव्हर्मेंट आफ् इंडि-**

**याचे अंडर सेक्रेटरी** यांच्याकडून आलेल्या पत्रांत हे १२००० रुपये साल घेणें बंद केलें आहे ह्मणून मजकूर आहे, त्याअन्वयें चालू सालाच्या अखेरीपासून पुढें १२००० रुपये साल घेण्याचें बंद करणें **गव्हरनर जनरल** साहेबांनीं मंजूर केलें आहे. पुढें एक सुपरिंटेंडेंट, त्याच्या हाताखालीं इतर आमला वगैरे नेमून त्यांच्या मार्फतीनें ही सडक पक्के पूल वगैरे बांधून तयार करण्यास होणाऱ्या खर्चाची तपासणी व देखरेख करण्यास नेमण्याचें ठरवून त्यांजकडेसच **भोपाळ** व **हुसंगाबाद** यांजमधील सडक तयार करण्याचें काम सांगितलें. त्याचप्रमाणें इतर सुधारणा करण्याच्या कामीं आह्मीं पुष्कळ मेहनत घेतली.

**ड्यूक आफ् एडिंबरो** यांच्याकडून पत्र आल्याबद्दलची हकीकत—

हिझ रायल हायनेस ड्यूक **आफ् एडिंबरो** हे **कलकत्त्याहून विलायतेस** परत जातेवेळीं **हुसंगाबादे**जवळ **तवा** नदीच्या किनाऱ्यावर शिकारीकरितां राहिले. त्या वेळीं आह्मीं त्यांना **भोपाळास** येऊन जाण्याविषयीं विनंति केली. परंतु त्यांनीं परत जाण्याची उत्कटेच्छा प्रदर्शित केल्यामुळें **भोपाळास** येण्यास त्यांना सवड झाली नाहीं. तेव्हां ता० ३० सफर सन १२८७ हिजरी रोजीं आह्मीं त्यांच्याकडे एक विनंतिपत्र पाठविलें. व आह्मीं स्वतः व **सुलतान जहान बेगम** यांनीं विणलेल्या कांहीं जरीच्या कामाचे नमुने व खुद्द **भोपाळांत** तयार झालेल्या हत्यारांचे कांहीं नमुने इकडील स्मरण राहण्याकरितां मेहरबानगीनें घेण्याविषयीं प्रार्थना केली. त्याच्या जबाबांत **राजपुत्रांनीं** मेहेरबान होऊन आह्मांस ता० ६ नवंबर स० १८७१ चें पत्र पाठविलें. व त्याबरोबर कांहीं इंग्रजी तऱ्हेच्या वस्तु उत्तम उत्तम आमच्याकरितां पाठविल्या. त्या **गव्हरनर जनरल** व **इंदूर** व **सिहोर** एथील **एजन्सी**च्या मार्फत आल्या त्या येणेंप्रमाणें.—साध्या रेशमी कपड्याचें ठाण १, वेलबुट्टीदार व नकशीदार रेशमी कपड्याचे तागे ७, एक भरगच्ची रेशमी झगा १, भरगच्ची रेशमी टेबलक्लाथ, राणीसरकारच्या कुटुंबांतील मंडळीच्या

तसबिरा असलेलें एक आल्बम बुक, जडावाच्या चौकटीची आरसेजोडी, एक आपरा ग्लासाची जोडी, एक फारच सुंदर व किंमती घड्याळ, व जडावाची अत्तरदानी एक. या जिनसांबरोबर पत्र आलें तें:—

'**क्लारेन्स हाउस, लंडन** ता० ६ नवंबर १८७१ इ० आमचे परमपूज्य स्नेही यांस—आपण मेहेरबानी करून आमच्याकडे आपल्या राज्यांत उत्पन्न होणाऱ्या कलाकौशल्याच्या पदार्थांचे सुंदर नमुने व त्यांबरोबर एक पत्र पाठविलें तें आह्मांस पावलें. हे जिन्नस **महाराणी** साहेबांच्या व आमच्या स्वतःच्या ठिकाणीं जो आपला प्रेमभाव आहे त्याचें स्मारक या अर्थानें आह्मी मोठ्या महत्वाचे मानितों. आपण व आपली कन्या **सुलतान जहान बेगम** यांनीं आपल्या हातांनीं तयार केलेले जिन्नस तर आह्मी विशेष आदरानें जपून ठेवूं. आपण आपल्या पत्रांत कांहीं तशाच योग्य कारणांमुळें आह्मांस **भोपाळास** येण्यास सवड झाली नाहीं ह्या गोष्टीची आठवण झाली ह्मणजे आपल्यास वाईट वाटत असल्याचें लिहिलें आहे. आपल्या राज्यांत येण्यास सवड झाली नाहीं याबद्दल आह्मांसही फार नाउमेद वाटली. कारण आपल्या मातोश्रीच्या व आपल्या कारकीर्दीत आपल्या राज्याची उत्तम व्यवस्था राहिल्याचें आह्मीं ऐकिलें आहे. व त्याबद्दलची कीर्ति सर्वत्र झाली आहे. आपल्याकडे **युरोपांत** तयार होणाऱ्या जिनसांचे कांहीं नमुने पाठवीत आहें ते विशेष मौल्यवान् नाहींत. तथापि ते आमच्या मनांत आपल्याविषयीं असलेल्या कळकळीचे द्योतक आहेत.

"आपला स्नेही व हितचिंतक,"

**आल्फ्रेड.**

**महाराणी** सरकारांनीं आह्मांस स्टार आफ् इंडिया हा किताब दिला त्याची हकीकत.—

सन १२८९ हिजरी सालच्या जमादिलाखर महिन्यांत **पोलिटिकल एजंटाकडून** आह्मांस एक खासगी पत्र आलें त्याचा सारांश.—

"आपण आपल्या राज्याची सुधारणा होण्यासाठीं मनःपूर्वक झटतां व लोकांचीं दुःखें दूर करून त्यांची उन्नति करण्यास झटतां व **इंग्रज** सर-

काराशीं राजनिष्ठेनें वागतां या गोष्टी **इंडिया** सरकाराकडून कळून आल्यावरून **महाराणी** सरकारांनीं मेहेरबान होऊन आपल्यास **नाइट ग्रँड कमांडर आफ् धि स्टार आफ् इंडिया** हा किताब दिला आहे. व **व्हाईसराय** साहेबांस आपल्याला या पदवीच्या पहिल्या द-र्ज्याचा **स्टार** व इन्सिग्निया ( चांद व इतर चिन्हें ) देण्याविषयीं आज्ञा केली आहे. ही गोष्ट मी आपल्यास मोठ्या आनंदानें कळवीत आहें."

नंतर ता० १६ नवंबर सन १८७२ रोजीं त्यांनीं पुनः लिहून कळ-विलें कीं, **व्हाईसराय** साहेब **मुंबईस** जाऊन तेथें **मुंबईच्या** मोठ-मोठ्या राजेरजवाड्यांच्या भेटी घेतील व त्याच वेळीं आपल्यास राज-कृपेचीं चिन्हें देतील.

ता० ७ नवंबर स० १८७२ रोजीं आह्मी **भोपाळाहून मुंबईस** जाण्याकरितां बरोबर आपले सरकारी कामगार, सरदार, व लवाजमा मिळून २७६ लोकांनिशीं निघालों. आमच्या बरोबर आमची प्रियकन्या **सुलतान जहान** बेगम, नबाब **अमीर उल्मुलुख वालाजा, मदारु-लमहाम फैज महंमदखान, नाझीर महंमदखान, आमील महंम-दखान, लतीफ महंमदखान बक्षी, महंमद हसनखान** व **ला-लजी** खजीनदार, व इतर नोकर मंडळी होती. व शिवाय स्वार ६ व एक त्यांवरील आफिसर बरोबर घेतला होता. आह्मी हळू हळू आमच्या हद्दींत **नर्मदा** किनाऱ्यावर **चिपानेरास** गेलों. व तेथून नदी उतरून **हरद्यास** आगगाडींत बसून ता० १० रमजान रोजीं संध्याकाळीं ९ वा-जतां निघून दुसरे दिवशीं ११ वाजतां **मुंबईस भायखळा** स्टेशनावर पोहोंचलों.

कर्नल **आस्बोर्न पोलिटिकल एजंट भोपाळ** व **आस्बोर्न** व **गान** साहेब **पोलिटिकल सेक्रेटरी** व एक एडिक्यांप व **मुंबईच्या गव्हरनर** साहेबांचे दुभाषी स्टेशनावर हजर होते. **आस्बोर्न** साहेबांनीं आमच्या बरोबर व आमच्या मुलीबरोबर शेकह्यांड केला. व कुशलप्रश्न विचारिले. प्रथम आह्मी व आमची कन्या व नंतर **नबाब** साहेब व इतर

सरदार गाडींतून उतरले. आमच्या कन्येनें बुरखा घेतला होता. सर ज-**मशेटजी** व इतर शेटजी व इतर मोठमोठे सभ्य गृहस्थही आमच्याकरितां सामोरे आले होते. मिस्टर **गान** साहेब आमच्या बरोबर व **आस्बोर्न** साहेब आमच्या कन्येबरोबर व कर्नल **आस्बोर्न** एडिक्यांपबरोबर व दुभाषी **नबाब** साहेबांबरोबर असे निघालों. स्टेशनाबाहेर आलों तों ८३ व्या पायदळ पलटणीचे लोक सलामीकरितां उभे होते. त्यांनीं सलामी दिली. व सलामीचा बाजा वाजूं लागला. पहिल्या गाडींत आह्मी, आमची कन्या, **आस्बोर्न** साहेब व **नबाब** असे बसलों. व कर्नल **आस्बोर्न, गान** साहेब, एडिक्यांप व आमचे सरदार हे दुसरे गाडींतून आले. आमच्या बरोबर **पूनाहार्स**च्या स्वाराची तुकडी होती. १९ तोफांची सलामी झाली. व साहेब लोक आमच्या बरोबर **लिंमजी माणिकजी** यांच्या बंगल्यास आले. हा बंगला आह्मांस राहण्याकरितां एक महिना १९९० रु० भाडें ठरवून घेतला होता.

त्याच दिवशीं दुपारीं चार वाजतां **मुंबईच्या गव्हरनर** साहेबांची भेट घेण्याचें ठरलें होतें. व ठरावाप्रमाणें मानमरातब झाले. सेक्रेटरी व एडिक्यांप हे आमच्या बंगल्यापर्यंत आले व आह्मी **गव्हरनर** साहेबांच्या कोठीवर जाऊन त्यांची भेट घेतली. व पूर्ववतच ते साहेब आह्मांस परत पोहोंचविण्यास आले. ता० १२ रमजान रोजीं सकाळीं ८॥ वाजतां **गव्हरनर** साहेबांनीं परत भेट केली. **मदारउल्महाम** व बक्षी **महंमद हसनखान** यांना त्यांच्या बंगल्यावर जाऊन बरोबर घेऊन येऊन परत पोंहचविण्याकरितां नेमिलें होतें. किल्ल्यांत तोफांची सलामी झाली. व युरोपियन पायदळ पलटणीची तुकडी त्यांना सलामी देण्याकरितां आमच्या बंगल्यावर आली होती. त्याच दिवशीं तिसरे प्रहरीं पांच वाजतां **गव्हरनर जनरल** लार्ड **नार्थब्रूक** साहेब आगबोटींतून बंदरावर उतरले तेथें त्यांस सामोरे जाण्याकरितां सर्व राजेरजवाडे व मोठमोठे कामगार लोक हजर होते. लार्ड **नार्थब्रूक** आगबोटींतून उतरून थेट आपल्या तंबूंत गेले. व तेथून एका गाडींत बसून **मुंबईच्या ग-**

**व्हरनर** साहेबांच्या बंगल्यावर गेले. नेमलेले सर्व राजेरजवाडेही त्यांजबरोबर गाड्यांत बसून गेले. सामोरे गेल्यावेळीं आह्मी, **सुलतानजहान** बेगम, **नबाब** व **मदारउल्महाम** हे एका गाडींत होतों. स्वारीचा थाट पुढें लिहिल्याप्रमाणें होता.

प्रथम **गव्हरनर जनरल** साहेबांची चार घोड्यांची गाडी. त्यांच्या मागून महाराज **शिंदे**. त्यांच्यामागून आमची गाडी व आमच्या मागून **रेव्यां**च्या महाराजांची गाडी होती. स्वारीच्या वेळीं **कोल्हापूर**च्या महाराजांनीं, ठरलेल्या नियमांच्या विरुद्ध व परवानगीवांचून आपली गाडी भालदाराच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून आमच्या गाडीपुढें आणिली. तेव्हां ज्या कामगाराकडे गाड्या ठरलेल्या नंबरवारीप्रमाणें व्यवस्थेनें जाऊं देण्याचें होतें त्याला चोपदाराचा जमादार **लक्ष्मणसिंग** यानें ही हकीकत कळवितांच त्यानें **कोल्हापूर**च्या राजास आपली गाडी आमच्यामागें नेण्यास लाविलें. व ही गोष्ट एवढ्या मोठ्या समाजासमक्ष घडली. त्यांत त्यांना चांगलें शासन घडलें. **गव्हरनर जनरल** मुकामावर जाऊन पोहोंचल्यावर सर्व राजेरजवाडे आपआपल्या बंगल्यास परत गेले.

बंदरापासून **गव्हरनर**च्या बंगल्यापर्यंत जाण्याचा रस्ता शहरांतूनच असून दुतर्फा हवेल्या होत्या. प्रत्येक रस्त्यांत अशी दाटी झाली होती कीं त्या दिवशीं एकंदरींत हजारों लोक जमले होते. प्रत्येक हवेलींत सात सात मजलेपर्यंत खिडक्यांत इतकीं बायकामुलें तमाशा पाहण्यास बसलीं होतीं कीं त्यांची संख्या होणें अशक्य आहे. गाड्या व स्वार यांची अतिशय गर्दी झाली होती. त्या योगानें हा सर्व देखावा फार प्रेक्षणीय झाला होता. असें सांगतात कीं, **मुंबई**ची लोकसंख्या सात लक्षांवर असून तेथें गाड्या सात हजारांपेक्षां जास्त आहेत.

ता० १९ नवंबर स० १८७२ इ० रोजीं **व्हाईसराय** साहेबांनीं आमची खानगी भेट घेतली. फारेन सेक्रेटरी व एक एडिक्यांप बरोबर कांहीं स्वार घेऊन आह्मांस अर्ध्या रस्त्यापर्यंत सामोरे आले. व परत तेथवरच पोहोंचविण्यास आले. या भेटीस नबाब **सुलतान जहान** बेगम व नबाब

**वालाजा** व बक्षी व मुनशी **मोतीलाल** वकील व **लालाजी** खज्यानची हेही होते. प्रथम परस्परें कुशलवृत्त विचारणें झाल्यावर थोड्या वेळानें सर्वांनीं नजरा केल्या. नंतर आह्मी **लार्ड** साहेबांस त्यांची व त्यांच्या कन्येची, व तसेंच **महाराणी** सरकारची तब्यत ठीक आहेना ह्मणून विचारिलें. त्यांचे त्यांनीं तपशीलवार जबाब दिले. नंतर ते बोलले कीं **अंबाला** येथें दरबार भरविण्याचा होता. व तेथवर जाण्याचीही आपल्यास तसदी पडणार होती. परंतु त्या ठिकाणीं बेमारी विशेष असल्यानें दरबारचा बेत रहित केला आहे. त्यावरून आह्मीं जबाब दिला कीं, 'आपल्या हुकुमाप्रमाणें वागण्यांत आह्मांस कोणतीही तसदी नसून आह्मी त्याबद्दल आनंदच मानितों.' नंतर त्यांनीं विचारिलें कीं, 'आपण **मक्के**चा वृत्तांत इंग्रजींत लिहिला आहेना? त्यावर आह्मीं कळविलें कीं, 'तो ग्रंथ आमच्या मातोश्रींनीं लिहिला आहे. व आह्मीं **भोपाळ**चा इतिहास उर्दू व फारशी भाषेंत लिहिला आहे. त्याचें अद्यापि इंग्रजींत भाषांतर झालें नाहीं. तें झालें ह्मणजे त्याची एक प्रत आह्मी मोठ्या खुषीनें आपणाकडे पाठवून देऊं.' यानंतर अत्तर, पानसुपारी, व हार फुलें हीं दिलीं. आह्मांस खुद्द **व्हाईसराय** साहेबांनीं व **सुलतान जहान** बेगम व **नबाब** यांना **फारेन सेक्रेटरी** यांनीं व बाकीच्यांस एडिकांप यांनीं पानसुपारी दिली. **व्हाईसराय** साहेब आह्मांस बिछायतीच्या शेवटापर्यंत सामोरे व पोहोंचविण्यास आले. आह्मी परत जात असतांना वाटेंत नबाब **खुदसिया** बेगम **व्हाईसराय** साहेबांच्या भेटीस जातांना भेटल्या. परंतु दरबार खलास झाल्यानें त्यांची शिरस्त्याप्रमाणें इतमामानें भेट न होतां नुसती खानगी भेट झाल्याचें कळलें.

शनिवार तारीख १६ नोवेंबर रोजीं दुपारीं तीन वाजतां आह्मी गाडींत बसून **गव्हरनर जनरल** साहेबांच्या दरबारांत **स्टार आफ् इंडिया**ची पदवी घेण्याकरितां गेलों. **पोलिटिकल एजंट**, नबाब **सुलतान जहान** बेगम, नबाब **मदार उल्महाम, अकील महंमदखान, नाझीर महंमदखान, लतीफ महंमदखान** व **सेत महंमदखान** हे आमच्या

बरोबर होते. दरबारच्या डेऱ्याजवळ आह्मी गाडी उभी करून **पोलिटिकल एजंट** यांच्या सांगण्याप्रमाणें आह्मांस बोलावणें येईपावेतों उभे राहिलों. आमच्या गाड्यांपासून दरबारच्या डेऱ्यापर्यंत बरींच पावलें अंतर होतें. तेथपर्यंत वाटेवर बिछाईत केली होती. दरबाराकरितां ज्या ज्या **नाइट ग्रॉंड कमांडरां**ना बोलाविलें होतें त्यांना **अंडर सेक्रेटरी** मुख्य रस्त्याच्या शेवटापर्यंत सामोरा येऊन त्यांना या **आर्डर**च्या नियमाप्रमाणें कपडे वगैरे करण्याकरितां निरनिराळे डेरे लाविले होते. त्या डेऱ्यांत नेऊन पोंहचवीत. डेऱ्यांत दुसऱ्या व तिसऱ्या दर्जाचे मेंबर हजर होते. व **चोपटर**च्या नियमाप्रमाणें **नाइट ग्रॉंड कमांडर** हे दुसऱ्या प्रतीच्या **नाईट्स**च्या पाठीमागें व दुसऱ्या प्रतीच्या **नाईट्स**च्या पुढें **कंपॉनियनस्** आफ् **धि आर्डर** हे होते. व सर्वांत पाठीमागें या **आर्डर**चे **ग्रॉंड मास्तर व्हाईसराय** साहेब होते. आमच्या मतें **व्हाईसराय** साहेब यांचा अधिकार **नेटिव** राजे लोकांपेक्षां अधिक आहे. तथापि त्यांची पदवी यांच्यापेक्षां कमी आहे. आह्मीं जाणलें कीं, डावी बाजू वरिष्ठ दर्जाची, व सर्वांत पुढील लोक कमी दर्जाचे. दरबारची व यां समारंभाची व्यवस्था पुढें लिहिल्याप्रमाणें होती.—सगळ्यांपुढें चोपदारलोक, त्यांच्यामागें नोकरीवर असलेले फौजेचे आफिसर, त्यांच्यामागें अंडर **सेक्रेटरी** व **फॉरेन सेक्रेटरी,** त्यानंतर **कंपॉनियन्स** आफ् **धि स्टार** किंवा तिसऱ्या दर्जाचे मेंबर, त्यानंतर **नाईट कमांडर्स** किंवा दुसऱ्या दर्जाचे मेंबर, त्यांमागून पहिल्या दर्जाचे मेंबर किंवा **नाईट ग्रॉंड कमांडर** हे होते. या प्रत्येकाच्या पाठीमागें एक एक आफिसर त्यांचें निशाण घेऊन होता व त्यांच्यामागें त्यांचे सरदार व मित्रमंडळी होती. यानंतर **व्हाईसराय**चे मिलिटरी व प्रायव्हेट **सेक्रेटरी** हातांत **ग्रांड मास्तर**चीं निशाणें घेऊन होते. व **ग्रांड मास्तर**चे पाठीमागें त्यांचे आफिसर व त्यांचे नोकर लोक होते.

दरबारच्या डेऱ्यांत **ग्रॉंड मास्तर** येतांच ते आपल्या सिंहासनावर जाईपर्यंत या **आर्डर**चे मेंबर आपआपल्या जागीं उभे राहिले. व प्रत्येक

**नाईटनें ग्रॅंट मास्तर** आपल्या जवळून जातेवेळीं त्यांना सलाम केला. व बादशाही सलामी झाली. जे हजर होते त्यांनीं उभें राहून आपल्या नांवाचा जबाब दिला. व जे हजर नव्हते त्यांच्याबद्दल अंडर **सेक्रेटरीं**नीं जबाब दिला. यानंतर **सेक्रेटरीं**नीं जाहीर केलें कीं हा **चॅपटर नबाब शहाजहान** बेगम व आनरेबल **जान स्ट्राची** यांना पदवी देण्याकरितां **राणी** सरकारच्या हुकमानें बोलाविला आहे. नंतर **फॉरेन** व **अंडर सेक्रेटरी** आह्मांस दरबारच्या डेऱ्यांत नेण्याकरितां आमच्या गाडीजवळ आले. त्याबरोबर आह्मी डेऱ्यांत गेलों. तेथें आणखी दोन गृहस्थ भेटले. नंतर प्रथम चपराशी, नंतर चोपदार, त्याच्यामागें आपले हातीं **आरडर**चा चांद घेऊन **अंडर सेक्रेटरी** होते. त्यांच्यामागें **फॉरेन सेक्रेटरी**, त्यानंतर ते उभयतां गृहस्थ, नंतर **भोपाळचे पोलिटिकल एजंट**, नंतर निशाण गुंडाळून घेतलेला आफिसर, त्यांच्यामागें आह्मी व आमच्यामागें आमच्या बरोबरची मंडळी होती. आह्मी दरबारच्या डेऱ्यांत पाय ठेवतांच गारदीच्या शिपायांनीं सलामी दिली. व आह्मी आमच्याकरितां मुद्दाम राखलेल्या जागेवर जाऊन बसलों. आमच्यामागें **पोलिटिकल एजंटा**ची खुर्ची, व त्यांच्या बाजूस बक्षी **हाफीज महंमद हसनखान** यांना आमचें निशाण धरण्याचें होतें करितां त्यांची खुर्ची होती. आमच्या खुर्चीमागें आमची कन्या व **नबाब** व **मदारउल्महाम** यांच्या खुर्च्या असून त्यांच्यामागें आमच्या बरोबरीच्या मंडळीच्या खुर्च्या होत्या. सरकारांनीं मेहेरबानगी करून आह्मांस शोभण्याकरितां दोन लहान मुलींस आमच्या 'ट्रेन बेअरर्स' किंवा झग्याचा झोळ संभाळणाऱ्या केल्या होत्या. या दरबारांत नेटिव्ह राजे लोकांस **स्टार आफ् इंडिया**च्या पटांत त्यांचीं नांवें ज्या दर्जानें आलीं होतीं त्याच दर्जानें बसविण्याची व्यवस्था केली होती.

**फारेन सेक्रेटरीं**नीं **राणी** साहेबांचें आज्ञापत्र **ग्रॅंड मास्तर** यांना दिलें. त्यांनीं समारंभास सुरुवात करण्याविषयीं आज्ञा केली. आह्मी **ग्रॅंड मास्तर** बसले होते त्या तक्ताजवळ गेल्यावर **सेक्रेटरी** यांनीं **स्टार**

किंवा चांद टेबलावरून घेऊन नमन करून तो **ग्रॅंड मास्तर** यांच्याजवळ दिला. त्यांनीं आज्ञापत्र **सेक्रेटरीस** दिलें. तें त्यांनीं मोठ्यानें वाचल्यावर आह्मांस टेबलाजवळ नेलें. व **ग्रॅंड मास्तर** यांनीं खुणावतांच सर **रिचर्ड टेंपल** यांनीं चांद व सर **एडवर्ड रसेल** यांनीं निशाण **सेक्रेटरी**कडून घेऊन दोघांनींही या **आरडर**चे कपडे आमच्या आंगावर घातले व आह्मांस तक्ताजवळ नेलें. तेथें आह्मीं दोन वेळ सलाम केला त्या वेळीं हे दोघे आमच्या दोहों बाजूंस उभे होते. त्यावर **ग्रॅंड मास्तर** यांनीं उठून या **आरडर**चा पट्टा आमच्या गळ्यांत घातला. व बोलले कीं, '**राणी**सरकारच्या नांवानें व त्यांच्या हुकुमानें येथें मी तुह्मांस **स्टार** आफ् **इंडिया**च्या परममान्य आरडरच्या चिन्हांनीं भूषित करितों. **महाराणी** सरकारांनीं तुह्मांस या थोर **आरडर**मध्यें **नाईट ग्रॅंड कमांडर** मोठ्या खुषीनें नेमिलें आहे'. पुढें १९ तोफांची सलामी झाली. नंतर **फॉरेन सेक्रेटरीं**नीं आह्मांस प्रत्येक **नाइट ग्रॅंड कमांडर**कडे नेलें. त्या सर्वांनीं आमच्याशीं शेकह्यांड केल्यावर पुन: टेबलाजवळ जाऊन तेथें या **आरडर**च्या नियमाप्रमाणें करारपत्रावर सही केली. व सलाम करून आमच्या खुर्चीच्या पुढें जाऊन बसल्यावर आमचे निशाणवाले बक्षी **महंमद हसनखान** यांनीं शिरस्त्याप्रमाणें आमचें निशाण खोलून फडकाविलें. नंतर वाद्यांचा गजर झाल्यावर या आरडरच्या **सेक्रेटरीं**नीं सर्व दरबारांत आमच्या पदव्या मोठ्यानें बोलून दाखविल्यावर आह्मी व दरबारांतील सर्व उभी असलेली मंडळी आपआपल्या जागेवर बसलों.

नंतर सर **जान स्ट्राची** यांना या **आरडरी**ची दुसऱ्या प्रतीची पदवी देण्यांत आली. या प्रतीस पोषाख किंवा पट्टा नसतो. पुढें दरबार समाप्त होऊन **व्हाईसराय** साहेब निघून गेले. त्यांना २१ तोफांची सलामी झाली. नंतर सर्व **ग्रॅंड कमांडर** आपआपल्या दर्जाप्रमाणें दरबारांतून निघून पृथक पृथक तंबूंत जाऊन आपल्या मुक्कामावर जाण्यापूर्वी तेथें त्यांनीं आपले कपडे उतरले. रस्त्यांत आह्मांस **फॉरेन सेक्रेटरी**

भेटले. त्यांनीं आह्मांस या **आरडरचे** मेंबर नेमल्याबद्दलची **महाराणी** साहेबांच्या सहीनिशीं सनद दिली ती येणेंप्रमाणें:—

'ईश्वराच्या कृपेनें **ग्रेट ब्रिटन** व **आयर्लंड** याच्या संयुक्त राज्याची स्वामिणी, धर्मसंरक्षक, व **स्टार आफ् इंडिया**च्या अति थोर **आरडर**ची सार्वभौम, **व्हिक्टोरिया** यांजकडून हर हायनेस नबाब **शहाजहान** बेगम, **भोपाळ**च्या राज्यकर्त्री यांस अभिवादन; आह्मांस तुमच्यावर आमची कृपा असल्याचें व्यक्त करून दाखविण्याची इच्छा असून तुमच्या स्वतःविषयीं व आमच्या **हिंदुस्थानां**तील राज्याची नोकरी तुह्मीं बजाविली आहे तिच्याविषयीं आमच्या मनांत कसा पूज्यभाव आहे तो व्यक्त होणें योग्य दिसल्यावरून आह्मी तुह्मांस **स्टार आफ् इंडिया** या थोर **आरडरचे नाईट ग्रॅंड कमांडर** नेमण्याचें ठरवून त्याप्रमाणें तुह्मांस नेमीत आहों.'

नबाब **शहाजहान** बेगम यांना **नाईट ग्रॅंड कमांडर आफ् धि मोस्ट एक्झाल्टेड आरडर आफ् धि स्टार आफ् इंडिया**ची पदवी दिल्याबद्दलची सनद.

तेव्हां आह्मी या देणग्यांनीं तुह्मांस सदरहू **आरडरच्या नाईट ग्रॅंड कमांडर**ची पदवी देत आहों. व या सनदेनें ती पदवी तुह्मीं घेऊन, राखून, तिचा अनुभव घेण्यास व या संबंधाच्या सर्व व प्रत्येक हक्काचा उपभोग घेण्याचा अधिकार तुह्मांस देत आहों.

आज आमच्या **बालमोरल** कोर्टांतून आमच्या स्वतःच्या सही शिक्यानिशीं ता० ३० मे सन १८७२ इ० रोजीं आमच्या कारकिर्दीच्या ३५ वे वर्षीं दिली असे.

राणी सरकारच्या हुकुमावरून.

या दरबारांत समारंभास असलेले व तमासगीर मिळून एकंदर ५००० लोक असावेत. आह्मी मुकामास परत आल्यावर हा आमचा बहुमान केल्याबद्दल एक आभारप्रदर्शक पत्र **पोलिटिकल एजंट**कडे लिहून पाठविलें. तें येणेंप्रमाणें.—

'हें विश्व उत्पन्न करणाऱ्या **परमेश्वरानें हिंदुस्थानचें** राज्य अशा सार्वभौम प्रभूच्या हातीं दिलें आहे कीं, ते प्रभु **हिंदुस्थानच्या** हिताकडे आपल्या कदीमी **इंग्लंडच्या** राज्याच्या हितापेक्षांही जास्त दयाळूपणानें लक्षपूर्वक व विचारानें काळजी बाळगतात. याबद्दल आह्मी त्या **ईश्वराचे** फार आभार मानितों. हा प्रभु **ग्रेट ब्रिटनची** महाराणी **व्हिक्टोरिया** साहेब होत. त्या परम शुद्ध **ईश्वरानें हिंदुस्थानचें** राज्य अशा दयाळू प्रभूच्या हातीं दिलें. याबद्दल आह्मी त्याचे आभारी आहों. तसेंच अशा न्यायी व बलाढ्य प्रभूची आज्ञा **हिंदुस्थानी** लोकांकडून जो **ईश्वर** पाळवितो त्याचेही आह्मी फार ऋणी आहों. हा प्रभु इतका न्यायी व बलाढ्य आहे कीं त्याच्या योगानें त्यांच्या आश्रयाखालीं **हिंदुस्थानांतील** सर्व राजे लोकांस आपआपल्या राजधानींत, स्वस्थपणें, परकी शत्रूंपासून स्वारीची वगैरे भीति न बाळगतां राहतां येतें. याविषयींचें एक उत्तम व खरें उदाहरण देतों तें सर्वांनीं ऐकावें. या **सार्वभौम** सरकारच्या कामगारांनीं आमच्या मातोश्रीच्या खऱ्या राजनिष्ठेविषयीं पक्की खात्री करून घेतली त्या वेळीं एक तर त्यांनीं पुष्कळदां **भोपाळच्या** राज्याचें युरोपियन फौज पाठवून आंतील व बाहेरील शत्रूंपासून रक्षण केलें. दुसरें—त्यांची राजनिष्ठा पाहून **भेरशिया** परगणा कुल हक्कासुद्धां त्यांना दिला. तो आमच्या राज्यांत सामील आहे.

'तिसरें—त्यांना **स्टार आफ् इंडियाची** पहिल्या प्रतीची पदवी दिली. चवथें—त्यांचा काल झाल्यावर **महाराणी** सरकारांनीं आपल्या **स्टेट सेक्रेटरीकडून** आह्मांस दुखवट्याचें पत्र लिहिलें. या योगानें आमचा विशेष मान झाला. पांचवें—त्यांनीं आपल्या **व्हाईसराय** साहेबांस हुकूम दिल्यावरून त्यांनीं आज भरदरबारांत आह्मांस **स्टार आफ् इंडियाचा** किताब दिला. त्यांनीं आमच्यावर जी मेहेरबानगी केली व लोभ दाखविला व जें आमचें रक्षण केलें त्याबद्दल आह्मी किती उपकार मानितों, तें व्यक्त करण्यास आमचें सर्व आयुष्यही पुरेसें होणार नाहीं. याकरितां आह्मीं सर्व लहान थोर मिळून एकनिष्ठेनें व दृढपणानें अशा

राज्याचा अंमल **हिंदुस्थानावर** राखण्यास मदत करावी व त्यांच्या राज्याचा स्थाइकपणा तोच आपल्या व आपल्या संततीच्या अमलाचा स्थाइकपणा होय, हें पक्कें जाणून त्यांशीं अगदीं आज्ञाधारकपणानें वागावें. येथें जमलेल्या सर्व **युरोपियन** व इतर गृहस्थांनीं हें आह्मीं दिलेलें उदाहरण किती यथार्थ आहे ह्याचा विचार करावा. आमच्यावर व आमच्या प्रिय मातोश्रीवर वेळोवेळीं **इंग्रज** सरकारांनीं जे उपकार केले आहेत त्याबद्दल आह्मी किती कृतज्ञ आहोंत, तें **महाराणी** सरकारास कळण्याकरितां हें आमचें पत्र **व्हाईसराय** साहेब, **महाराणी** सरकाराकडे पाठवितील. अशी आह्मांस उमेद आहे.'

संध्याकाळीं **गव्हरनर जनरल** साहेबांनीं राजेरजवाड्यांकरितां नाच करविला व दारूकामही सोडविलें. त्या वेळीं आह्मांसही निमंत्रण चिठ्ठी आली होती. परंतु प्रकृति नीट नसल्यानें आमचें जाणें झालें नाहीं. त्यांनीं आपली तसबीर आह्मांस दिली. ती आह्मीं मोठ्या खुषीनें जपून राखून ठेविली आहे. **गव्हरनर जनरल** हे फार सभ्य, मोकळ्या मनाचे, लोकांस आवडणारे, निश्चयी, व मनुष्याची पारख चांगली करणारे, असून त्यांना **नेटिव्ह** राजे लोकांची विशेष खातर आहे. आमची त्यांची तीन वेळ भेट झाली तेव्हां व दरबारांतही आमची त्यांनीं विशेष खातर केली. व आमची जास्त जास्त पारखही केली.

पुढें दोन तीन दिवसांनीं **पोलिटिकल एजंटांनीं इंडिया सरकारच्या** हुकुमानें **स्टार आफ् इंडियाच्या** संबंधानें केलेल्या नियमांच्या पुस्तकाची एक प्रत आमच्याकडे पाठविली. हें पुस्तक पहाण्याजोगें असून त्यांतील नियम या **आरडरच्या** प्रत्येक मेंबरानें ध्यानांत ठेविले पाहिजेत.

तारीख १७ रमजान गुरुवार रोजीं **गव्हरनर जनरलांनीं** आमच्या बंगल्यावर आह्मास परत भेट केली. **नबाब** व **मदारउल्महाम** हे **भावनगरचे** ठाकूर उतरलेल्या बंगल्यापर्यंत सामोरे जाऊन त्यांस घेऊन आले. किल्ल्यांत तोफांची सलामी झाली. व गोऱ्या पायदळांपैकीं कांहीं लोक व बँड त्यास सलामी देण्याकरितां आमच्या बंगल्यावर आला होता.

या दरबारांत आमचे सर्व संबंधी व बरोबरचे सर्व कामगार हजर होते. त्यांनीं मोहरा नंजर केल्या त्या त्यांणीं हात लावून माफ केल्या. ते काळजीपूर्वक ह्मणाले कीं, 'आपल्यास रमजान महिन्यांत हा प्रवास करावा लागल्यानें फार त्रास पडला हें आह्मांस पूर्वीच कळतें तर रमजान महिन्यानंतर दरबार करण्याचें ठरविलें असतें.' नंतर **सुरत** व **अमदावाद** एथें जाण्याकरितां व होईल तितकें जलद हवा मानत नसल्यानें **मुंबई** सोडण्याकरितां निघण्याची परवानगी विचारली. तेव्हां हवा मानत नाहीं याबद्दल वाईट वाटतें. वगैरे बोलून त्यांनीं जाण्यास परवानगी दिली. नंतर आह्मी स्वतः **गव्हरनर जनरल** यांस अत्तर व विडा देऊन त्यांच्या गळ्यांत फुलांचा हार घातला. व **कौन्सिल**चे दोन मेंबर व **राजपुताना** व **सेंट्रल इंडिया** येथील **एजंट** हजर होते, त्यांचाही याप्रमाणें मान केला. **गव्हरनर जनरलांनीं** खुर्चीवरून उतरून मोठ्या खुपीनें हार घालून घेतला. त्यांच्याबरोबर आणखी तेरा असामी मोठमोठे कामगार होते. त्यांना अत्तर व पान **नबाबांनीं** दिलें.

**मुंबई** शहर हें **कोंकणां**त समुद्र किनाऱ्यावर एका बेटावर वसलें आहे. असें सांगतात कीं, सुमारें शेंसव्वाशें वर्षांपूर्वी तें एक लहान व वैराण खेडें होतें. परंतु तें **इंग्लंड**च्या राजास मिळाल्यापासून उत्तरोत्तर त्याचें महत्व वाढत जाऊन हल्लीं तें पृथ्वींतील मोठमोठ्या बंदरांपैकीं एक गणिलें जातें. तेथें मुसलमान लोकांची वस्ती बहुतेक हिंदु लोकांइतकीच असावी. व खिस्ती व पारशी लोकांची संख्या बरोबरच असावी. तेथील पुष्कळ रहिवाशी फार धनाढ्य व्यापारी आहेत. **चिनां**तील व **युरोपां**तील हरएक मौल्यवान् जिन्नस बाजारांत पुष्कळसा येतो. व शहरांत चांगला तपास केल्यास पृथ्वीवरील सर्व देशांचे लोक येथें आढळून येतील. या शहरांतील लोक त्यांत विशेषेंकरून व्यापारी हे फार दगाबाज व व्यवहारांत लबाड आहेत. येथील हवा खराब असून ती इतर शहरच्या लोकांस मानवत नाहीं. तेथील हवेल्या दुमजली पासून सहा सात मजल्याच्या आहेत. त्यांत पुष्कळ लांकडी असून बऱ्याच हवेल्या

उत्तम विटा, दगड, लोखंड, वगैरेच्या मजबूत बांधलेल्या आहेत. रस्ते रुंद, सरळ व स्वच्छ असून घरोघर लोखंडी नळांनीं पाणी दिलेलें आहे. तेथील मशिदी त्यांतही विशेषें शिया (हेरेटिक्स) लोकांची मशीद फार चांगली असून तेथें बरेच लोक जातात. परंतु तेथील काजी दुसऱ्या पंथाचे आहेत.

तेथें पुष्कळ हिंदु लोकांचीं मंदिरें व ख्रिस्ती लोकांचीं देवळें आहेत. व पारशी लोकांच्या आग्याऱ्या चांगल्या उंच बांधलेल्या असून फार लांबून दिसतात. **महंमद साईद** नांवाच्या व्यापाऱ्यानें बांधलेली **जुम्मा** मशीद सर्वांत मोठी आहे. ती तीन मजली असून फार विस्तीर्ण व भव्य आहे. कोटांतील ख्रिस्ती चर्च हें फार भक्कम बांधलेलें आहे. पूर्वी कोटांत एकाच्या आंत एक असे तीन तट व तीन खंदक होते. परंतु **इंग्रज** सरकारांनीं कोटांतील घरें श्रीमान लोकांचीं असून तेथें जागेची फार अडचण आहे असें पाहून तट पाडून खंदक बुजवून निघालेली जागा घरें बांधण्याकरितां फायदेशीर किंमतीनें विकली व जवळच एका बेटावरील उंचवट्यावर एक नवीन किल्ला बांधला. या ठिकाणीं कलमी आंबे, कोंकणी केळीं व **मस्कत** आणि **बसोरा** एथील खारका आणि खजूर व पुष्कळ जातीचे मासेही विकण्यास येतात. तसेंच सर्व जातीचीं फळें ताजीं व सुकविलेलीं. तसेंच खाण्याचे सर्व जातीचे पदार्थ व मद्यें व इतर अगणित कपडे वगैरे जिन्नस पाहिजे तितके मिळतात. परंतु एथें सर्व जिन्नस फार महाग आहेत. **मुंबईत** हत्ती किंवा उंट नसून मेणेही थोडेच आहेत. सर्व लहान थोर लोक गाड्यांत बसून फिरतात. व कांहीं घोड्यावर बसून फिरतात. एक वेळीं पाहिजे तर एक हजार गाड्या देखील भाड्यानें मिळतील. अरबी घोडे एकेक तिनशें रुपयांपासून तीन हजार चार हजार रुपयांपावेतों विकत मिळतात. या शहराची संपत्ती व वैभव, सर्व ठिकाणच्या लोकांचीं दुकानें एथें आल्यापासून दुप्पट वाढलीं आहेत. एथें **अरब, इराणी, तुराणी, तुर्की, चिनी** व **युरोपियन** व **हिंदुस्थानां**तील सर्व ठिकाणचे लोक पुष्कळसे प्रत्येक रस्त्यांत व दुकानांत त्यांच्या त्यांच्या पोषाखांवरून ओळखतां येतात.

**टौनहाल** ही एक फार मोठी व व्यवस्थेशीर सरकारी इमारत आहे. तेथें **मुंबईचा गव्हरनर** प्रत्येक बुधवारीं जाऊन सरकारी काम पहातो. या सुंदर इमारतींत झुंबरें टांगलेलीं असून तेथें मौल्यवान् गालिच्यांची बिछायत केली आहे. तेथें एका मोठ्या दरबारच्या कोठडींत एका बाजूस **मुंबईचे गव्हरनर** लार्ड **एलिफन्स्टन** यांचा व त्यांच्यासमोर दुसऱ्या एका प्रसिद्ध साहेबांचा असे पुतळे ठेविलेले आहेत. या कोठडीच्या भिंतीला **हिंदुस्थानां**तील राजेरजवाडे व इतर सर्व देशचे राजे यांच्या तसबिरा टांगलेल्या आहेत.

एका कोठडींत सर **जान मालकम** साहेबांची तसबीर आहे. त्यांचा जन्म सन १७७२ सालीं होऊन ते सन १८३३ सालीं मरण पावले. तसेंच या ठिकाणीं एक मोठ्या मनुष्याचें व एक लहान मुलाचें प्रेत व हत्तीचें एक शीर अशीं कांहीं मसाला लावून कांचेच्या पेटींत ठेविलीं आहेत. त्यामुळें तीं अगदीं जशींच्या तशीं दिसतात.

जवळीलच एका कोठडींत पेंढा भरलेले पशु, पक्षी ठेविलेले आहेत ते अगदीं जीवंत दिसतात. तसेंच **आकाली** जातीच्या **शिखांचें** एक पोलादी चक्कर ठेविलें आहे. तें बोटावर फिरवून मारल्यानें **लाहोर**च्या लढाईंत एक मनुष्य मारला गेला होता. तसेंच **मुलतान**चा किल्लेदार **मूळराज** याच्या तोफेचा एक गोळा, तिरकमठा, भाता व चिलखत हीं त्याच्या निशाणीदाखल ठेविलीं आहेत. तसेंच या इमारतीच्या कारनिसावर **इंग्रजी** अक्षरें लिहिलीं आहेत. त्यावरून कळतें कीं या इमारतीचा पाया बांधण्यास सन १८०२ सालीं सुरुवात होऊन सन १८२३ सालीं हें काम पुरें झालें.

आणखी पाहाण्यासारख्या जागांपैकीं **डाक** किंवा गोदी ही एक आहे. तेथें आगबोटी व गलबतें बनतात. व तेथील लांकडी व लोखंडाच्या कारखान्यांत जहाजांस लागणारें सर्व सामान तयार होतें. ही गोदी समुद्र किनाऱ्यास मोठ्या खंदकाप्रमाणें असून तिला एक फार मोठा दरवाजा आहे. तो हमेषा बंद असतो. समुद्र किनाऱ्यावर भरती ओहटी

रोज दोन वेळ होते. गलबत तयार झालें ह्मणजे भरतीच्या वेळीं गोदीचा दरवाजा उघडून पाणी आंत घेतल्यानें गोदींत पाणी भरून गलबत तरंगूं लागल्यावर समुद्रांत नेलें जातें. नंतर पुनः दरवाजे बंद करून आंतील पाणी काढून टाकतात. या बंदरांत पुष्कळ आगबोटी व तिरकटी तारवें आहेत. परंतु हल्लीं सरकारी हुकुमानें आगबोटींची संख्या वाढत चालली आहे व तारवें कमी होत आहेत. आह्मीं एक मोठी आगबोट पाहिली. ती पुष्कळ रुंद व ३९० फुट लांब असून तिच्यांत पुष्कळ चांगल्या कोठड्या व स्नानाच्या कोठड्या असून त्यांत सर्व सामान तयार होतें. व तेथें पुष्कळ लोकांस पृथक् पृथक् राहाण्यास जागा असून शिवाय सामान ठेवण्यासही पुष्कळ जागा असल्याचें दिसलें. तसेंच खाण्यापिण्याचीं व लत्याकपड्याचीं कोठारें तयार होतीं.

येथील टांकसाळही पहाण्यासारखी आहे. तेथें लोखंडी चरक व रुपयांच्या दोन्ही बाजूंस ठसा उठविण्याचीं हत्यारें, तसेंच रुपें गाळण्याच्या व चांगलें व भेसळ रुपें पारखण्याच्या मुशी, रुप्याचे पाहिजे तितके जाड पत्रे करण्याचे रूळ, रुपयाकरितां गोल तुकडे पाडण्याचीं हत्यारें, कातऱ्या, व जिल्हई देण्याचीं हत्यारें, व हत्यारें पाजण्याच्या सहाणी, व एकदम १४००० रुपये भार चांदी आटविण्याचीं मोठालीं भांडीं. व १०००० रुपयांपर्यंत बराबर वजन करितां येईल अशीं वजनें, वगैरे सामान आहे. तें सर्व आह्मीं पाहिलें. व त्यांशिवाय आणखी दुसरीं हत्यारें आह्मीं पाहिलीं. त्यांचें वर्णन कंटाळवाणें होईल. व त्यांचा उपयोग त्यांचें विशेष ज्ञान असल्यावांचून कळणार नाहीं.

या शहरांत पुष्कळ बगीचे व पहाण्यासारख्या व वर्णन करण्यासारख्या पुष्कळ जागा आहेत. त्यांतही सूत व कापड तयार करण्याच्या गिरण्या पहाण्याजोग्या आहेत. त्या पाहून एखाद्या साहजिक पहाणारास तेथें चाललेल्या यंत्राचा उपयोग माहीत नसल्यानें तो तेव्हांच थक्क होऊन जातो.

येथील आखाताच्या पलिकडील टोंकास एक उंच मनोरा व एक बुरूज

बांधलेला आहे. त्यावर एक कांचेची कोठडी आहे. तेथें रात्रीं दिवे लावतात. असें सांगतात कीं, रात्रीच्या वेळीं खलाशी लोकांस त्यांचा उजेड ५० कोशांवरून दिसतो. त्यावरून त्यांना मुंबईच्या जवळ आल्याचें कळतें. या दीपदांडी जवळच्या इमारतींत एक मोठी दुर्बीण आहे. तिच्या योगानें ताऱ्यांचें खरें स्वरूप दिसतें. तसेंच तेथें एक सूर्याची उष्णता मापण्याचें यंत्र आहे.

येथें **इंग्रज** लोक व मोठमोठे व्यापारी यांशिवाय टर्कीच्या **सुलतानाचा** वकील व **इराणच्या बादशहाचा** वकील, इराणचा माजी बादशहा **फत्तेअली** याचा जांवई **आगाहीखान** हे नामांकित गृहस्थ रहातात. तसेंच येथील पारशांतील मोठ्या लोकांपैकीं **मुल्ला काउस** याचा मुलगा **मुल्ला फिरोज** यानें **दरी** नांवाच्या भाषेंत **इंग्लंडच्या** राज्याचा इतिहास तीन भागांत लिहिला आहे. त्यांत इंग्लंडचा इतिहास, हिंदुस्थान देश जिंकून घेतल्याची हकीकत, हिंदु व मुसलमान यांच्या लढायांचें वर्णन ४०००० हजार कवितांत **शहानाम्याच्या** धर्तीवर लिहिलें आहे.

**गव्हरनर जनरलची** परवानगी मिळाल्यावर आह्मी ता० १८ रमजान रोजीं आगगाडीनें **सुरत** व **अमदाबादेकडे** जाण्यास निघालों. गाडी सकाळच्या सात वाजल्यावर निघून संध्याकाळच्या पांच वाजतां सुरतेस पोहोंचली. वाटेंत आह्मांस सुमारें १५० लोखंडी पूल लागले. त्यांत तीन चार फारच मोठे होते.

आगगाडीच्या सडकेच्या दोन्ही बाजूंचा प्रदेश बहुतेक जंगलीच असून जागजागीं नारळीच्या व ताडाच्या झाडांचीं आगरें व क्वचित् जागीं हांकत जमीनही होती. **सुरतेस** पोहोंचल्यावर तेथील **जज्जानें** शिरस्त्याप्रमाणें आह्मांस पेशवाई केली. व तोफांची सलामीही झाली. तेथील वर्णनीय स्थलें पहाण्याकरितां एक दिवस मुक्काम केला.

सर्व बोहऱ्यांचे गुरु **मुल्लान जमुद्दीन** यांच्या कुटुंबांतील बायका आह्मांस भेटल्या. व **मुल्लाजींनीं** दोन गाड्या आमच्या तैनातीस दिल्या.

व आह्मांस मेजवान्याही दिल्या. त्यांच्या घरच्या चालीप्रमाणें त्यांनीं आमच्याकरितां **नबाब** व **मदार उल्महाम** यांच्याकरितां पुष्कळ कपडे पाठवून इतका आग्रह केला कीं, शेवटीं आह्मीं ते ठेवून घेतले.

**दिल्ली**चे बादशहा व **गुजराथ**चे राजे यांच्या वेळीं **हिंदुस्थानांत** **सुरते**सारखें एकही बंदर नव्हतें. व येथील **नाखुदे** हे त्या काळीं फारच मोठे व प्रख्यात सरदारांपैकीं होते. परंतु हल्लीं हें शहर मोडकळीस आलें आहे. व तेथील लोक गरीब व कंगाल स्थितींत आहेत. **बोहरी** व **पारशी** लोकांचे मोहोले बऱ्या स्थितींत आहेत. तथापि एकंदर शहराची स्थिति पाहून मन उदास होतें. असें सांगतात कीं, पाराज (पारशी) लोकांचा पवित्राग्नि शूर मुसलमान लोकांनीं कृपाणधारांनीं विझवून नाहींसा केला. त्या वेळीं पारशी लोकांची एक टोळी आपल्या देशांतून पळून येऊन **सुरतेस** राहिली व तेथून हे लोक पुढें **मुंबईस** गेले.

**बोहरी** लोक हे **शिया** धर्मांतील **इस्मायली** पंथाचे आहेत. **मुल्लानजी मुद्दीन** हे त्यांचे गुरु असून ते राजकीय थाटानें राहतात. या पंथाच्या मताची व लोकांची हकीकत **मकरेजवाला ताकुद्दीन** यानें केलेल्या **आलमा वैजवल हिवार** नांवाच्या **इजिप्त** देशच्या इतिहासांत लिहिली आहे. त्यांत हा विषय फार विस्तारानें लिहिला असून त्याचें थोडक्यांत टिपण **मौलवी महंमद अबास** यांनीं आपल्या **अमदत उल् अकबार** नांवाच्या पुस्तकांत दिलें आहे.

वाटसरू लोकांकरितां सराई आहे. ती **शहाजहान** बादशहाच्या कारकिर्दींत बांधली असून अद्यापि कायम आहे. व तिच्या मुख्य दरवाजाच्या कमानीवर पुढील कविताबद्ध लेख लिहिला आहे.

"चंद्र व सूर्य उत्पन्नकर्त्या **परमेश्वरा**च्या नांवानें, **शहाजहान** बादशहाच्या कारकिर्दींत एका सत्यप्रिय अमीरानें ही इमारत बांधिली. ती दिसण्यांत सराई आहे, परंतु वास्तविक स्वर्गभुवनाप्रमाणें आहे."

**सुरते**चा किल्ला **गुजराथ**चा राजा **महंमूदशहा** याच्या कारकिर्दींत बांधला गेला. त्या वेळच्या इतिहासकारानें किल्ल्याच्या दरवाजाची

उंची ३९ हात, व रुंदी १९ हात, व खंदकाची रुंदी २० हात दिली आहे. या किल्ल्यास चार मोठे दरवाजे भिंतींत शिशानें पक्के बसविले होते. व भिंतीचे दगड लोखंडी आंकड्यांनीं पक्के केले होते, परंतु हल्लीं **इंग्रज** सरकारानें हा किल्ला निराळ्याच कामीं लावल्या कारणानें त्याचें सर्व स्वरूप बदलून गेलें आहे. तेथें कांहीं कचेऱ्या बांधल्या आहेत. व पूर्वींच्या किल्ल्याच्या निशाणीदाखल एका बुरुजावर एक दोन तोफा मात्र कायम आहेत.

**इंग्रजांनीं** बांधलेल्या दवाखान्याची इमारत सुंदर आहे. त्या शिवाय आणखी बऱ्याच इमारती पडलेल्या आहेत. व तटाच्या आंत जागजागीं शेतीही झाली आहे.

एथें एक दिवस राहून सकाळचे सात वाजतां आगगाडीनें **अमदा-बादेस** जाण्याकरितां निघून संध्याकाळीं तेथें पोहोंचलों. वाटेंतील प्र-देश सपाट आहे. **भडोच**जवळ **नर्मदेस** बांधलेला पूल फार चांगला आहे. आह्मी **बडोदा** स्टेशनावरून गेलों. **अमदाबाद**च्या स्टेशनावर आल्यावर तेथील **जज्य** व डेप्युटी **कलेक्टर** आह्मांस सामोरे आले होते. व आमच्याकरितां तोफांची सलामीही झाली. आह्मी शहरांतील एक प्रसिद्ध सावकार **जयसिंग भाई** यांच्या घरीं उतरलों. **डेप्युटी कलेक्टर** यांनीं आह्मांस मेजवानी दिली.

आह्मी येथें दोन दिवस राहिलों व जाण्यापूर्वी बरीच खरेदी केली. **बेदर**चा किल्ला, **जुम्मा मशीद, अहंमदशहा**चे व त्याच्या कुटुंबाचे व **शहाअलम** यांचे दर्गे व सात मजले विहीर हीं आह्मीं पाहिलीं.

**बेदरचा** किल्ला पूर्वींच्या स्थितींत नसून हल्लीं **इंग्रज** सरकारानें तेथें फेरफार करून त्यांत कैदी लोकांकडून चालविण्याचे कारखाने केले आहेत. तेथें तयार झालेलें गालिचे, टोप्या, दऱ्या, मोजे वगैरे सामान आह्मीं पाहिलें. या तुरुंगांत कांहीं **ब्रह्मदेश**चे कैदी आहेत. त्यांनीं आ-पल्या अंगावर कंबरेपासून गुडघ्यापर्यंत गोंदून घेऊन विजारीचा आ-कार केला होता. व चांदीसोन्याचे चौरस तुकडे आपल्या दंडांत त्या

जागचें मास काढून बसविले होते. व आपल्या छातीवर तांबड्या रंगानें गोंदून घेतलें होतें. ही त्यांच्या देशांतील चाल आहेसें दिसतें.

**अमदाबाद**ची हवा चांगली असून तेथील रस्ते चांगले रुंद आहेत. परंतु तेथें पडकीं लावारशी घरांचीं खिंडारें फार आहेत. त्यांच्या मालकांचा मुळींच पत्ता नाहीं. हें शहर स्थापिल्याची तारीख 'खैर' या शब्दापासून निघते. **शिराज**एथील मुल्ला हलावी यानें **अहंमदनामा** ह्मणून एक ऐतिहासिक काव्य लिहिलें आहे. त्यांत **गुजराथ**चा राजा **नासिरुद्दिन अहंमदशहा** यानें सन ८१३ हिजरीच्या जिल्काद महिन्यांत हें शहर स्थापिल्याचें लिहिलें आहे. तारीख ८ सफर सन ११९४ रोजीं मंगळवारीं हें शहर **दिल्ली**च्या बादशहाच्या हस्तकांकडून **इंग्रजां**स मिळालें. पूर्वीं येथें पुष्कळ रेशमी कापड व उत्तम किनखाप तयार होऊन बाहेरगांवीं जात असे. परंतु हल्लीं ते कारखाने बंद पडत चालले आहेत. या शहरांतील उत्कृष्ट इमारत **जुम्मा मशीद** पाहून आह्मांस आश्चर्य वाटलें. ती बांधल्याची तारीख 'खैर' शब्दावरून निघते, असें ह्मणतात. **आमाई सकंदर** नांवाच्या ग्रंथाचा कर्ता मुनसी **सिकंदर** यानें या मशिदीचीं मापें दिलीं आहेत. तीं उत्तर दक्षिणेकडील कोठड्या व चौक सोडून इमारतीची लांबी १०० गज, व चौकाशिवाय रुंदी ५० गज, चौकाची रुंदी १२० गज, उत्तर दक्षिणेकडील पंख्याची रुंदी २० गज. या इमारतींत **बादशाही** कोठडींतील १२ व गादीच्या जागेंतील ८ शिवाय करून एकंदर ३५२ खांब आहेत. शिवाय दोनही पंख्यांत २१२ खांब आहेत. तसेंच उत्तर, दक्षिण व पूर्व दरवाजांत प्रत्येकीं ३२ खांब आहेत. घुमटावर उत्तर दक्षिणेकडील कोठड्या सोडून ९८ खांब आहेत. येथें एकंदर मोठमोठे ७७ दरवाजे व लहान २९ दरवाजे व ५७ जिने असून दोन्ही मनोरे १८६ गज उंच असून त्या प्रत्येकास ९३ खांब आहेत.

**शहाअलम** हा फार पवित्र साधू व दरवेशी होता. याची मशीद व मदरसा किंवा पाठशाळा फार मोठी असून त्याची बाग व कबरसुं-

दर व रमणीय आहे. **महंमूदशहाच्या** इतिहासांत लिहिलें आहे कीं, **गुजराथ**चा बादशहा **महंमूद** यानें एक रमणा ( शिकारखाना ) दोन फरसंग ह्मणजे ३६००० फूट गोलीईचा तयार केला. व गांवाबाहेर ५ पांच कोस लांब व २ दोन कोस रुंद एक बगीचा केला. त्याचें नांव **फरदोस** असें होतें. परंतु हल्लीं त्या जागीं जाऊन पहातां त्याचा मागमूससुद्धां लागत नाहीं.

तारीख २३ रमजान रोजीं आह्मी सकाळीं सात वाजतां **अमदाबादेहून** निघून संध्याकाळीं **मुंबईस** पोंहचून तेथें चार दिवस राहून किरकोळ खरेदी केली. व पूर्वीं लिहिलेल्यापैकीं कांहीं इमारती पाहिल्या आणि **पोलिटिकल एजंटा**बरोबर आगबोट पहाण्यास निघालों. या सुमारास **खांडव्याजवळ मंडवा** येथें आमच्या पोषाखखान्यांतील सामान व आमची कन्या व **नबाब** व **मदार उल्महाम** यांचें सर्व सामान व आमचे पोषाखांतील सामान व गालीचे व नोकरलोकांचें सामान, बक्षी **हाफीज महंमद हसनखान** यांच्याबरोबर आगगाडीनें रवाना केलेलें जळून गेल्याचें वर्तमान कळलें. हें सर्व नुकसान **बक्षीच्या** निष्काळजीपणानें झालें. सबब त्याला बडतर्फ केलें. एकंदर ६४६५५८ किंमतीचें सामान जळालें. त्यांत आमचे खासगी कागदपत्र, रवानगी व सरकारी खलीते, पत्रें पाठविल्याची बारनिशी व आह्मांस व आमच्या मातोश्रीस स्टार आफ इंडियाची पदवी मिळाली त्या संबंधाचे सर्व कागदपत्र जळून गेले !

तारीख २६ रमजान रोजीं सकाळीं १० वाजतां आह्मी **मुंबईहून** निघून दुसरे दिवशीं सकाळीं आठ वाजतां **इटारसी** येथें पोंहचलों. तेथून **नर्मदा** उतरून दोन दिवस **बुध्नी** येथें राहून तेथें **ईद उन् फितर** हा सण करून पायवाटेनें **भोपाळास** ता० ५ सवाल रोजीं सुखरूप येऊन पोहोंचलों. या स्वारींत एकंदर ४१२९५॥≡। खर्च झाले. त्याचा तपशील—कचेरी व खासगी खर्च १२७४५ रुपये; वाटेंतील खर्चः—

गाड्या व जागेचें भाडें मिळून १३७४२ रुपये; खरेदी ९२१६ रुपये; इनाम, मेजवान्या, व धर्मादाय ६१९१ रुपये.

---

## भाग पांचवा.

## मिराजी खेल जातीची खरी हकीकत व भोपाळचें उत्पन्न व खर्च, तेथील कारखाने व जहागीरदार यांची हकीकत व भोपाळच्या राज्याची खानेसुमारी व लोकसंख्या यांविषयीं.

**अफगाणिस्थानां**त पठाण लोकांचीं शेंकडों कुळें आहेत. त्यांत **गुरान** नांवाचें एक कुळ आहे. त्याच्या उत्पत्तीविषयीं पुष्कळ दंतकथा आहेत. त्यांत पुढील दंतकथा विशेष विश्वसनीय असून 'हयात अफगाणी' या ग्रंथांतही तीच दंतकथा दिली आहे. **अबदुल्लाखान** उमार याला एके दिवशीं एके जागीं एक नुकतेंच जन्मलेलें मूल आढळलें. त्या जागीं पूर्व दिवशीं एक **काफला** उतरला होता. त्यानें या पोरक्या मुलास आपल्या पोटच्या मुलाप्रमाणें बाळगून त्याचें नांव **गुरन** असें ठेविलें. व त्याला मोठा झाल्यावर आपली मुलगी दिली. यापासून उत्पन्न झालेल्या कुळांस **गुरानी** कुळें ह्मणतात. **दला, झ्याक, औरकजई, अफ्रीडी, खानक, वजीरी, आत्मनखेल,** हीं सर्व कुळें वरील कुळाच्याच शाखा होत. हा **गुरन,** व **गरन** नांवाचा **कैस अबदुल रशीद** याचा मुलगा मानतात, तो, हे दोघे एकच नव्हत. **गुरन** याला **कोडी** व **काकी** असे दोन मुलगे होते. पैकीं **कोडी** याला दोन बायका होत्या. त्यांतील मोठीपासून **औरकूजई** व दुसरीं ९६ कुळें उत्पन्न झालीं. त्यांपैकीं **दौलतजईच्या महंमद खेल** शाखेंतील **मनी खेल** या पोटशाखेची **मिराझी खेल** ही एक शाखा आहे. **पुस्तू** इतिहासावरून **मिराझी खेल** हा शब्द **मीरअझीजखेल** यापासून निघाल्याचें कळतें. या जातींपैकीं **सालामहंमदखान** नांवाचा एक मनुष्य होता. त्याची **फतिमा** नांवाची बायको एका

अमिराची मुलगी होती. तिचे वंशज **अफगाणिस्थानां**तील चालीस अनुसरून **फतिमा खेल** या नांवानें प्रसिद्ध झाले. आह्मी, आमचा वंश **मिराजी खेल** जातीपैकीं **फतिमा खेल** कुळांतील **नूर महंमदखान** याचा मुलगा **दोस्त महंमदखान** याच्यापासून सुरू झाला असें मानतों. यांनींच **भोपाळ**चें राज्य स्थापिलें. यांचा व आमचा वंशवृक्ष पुढें दिला आहे.

पूर्वी **भोपळ**च्या राज्याचें नक्की उत्पन्न असें कांहीं नियमित नव्हतें. व राज्यांत अनेक पोटविभाग असल्यानें व वरचेवर लढाया व आपसांत तंटे झाल्यानें वसुलांत वेळोवेळीं फार फरक पडे. हल्लीं राज्याचें सालीना उत्पन्न २६८३३८४८⁄ रुपये असून त्यापैकीं १०९३९७८॥।॥ रुपये इतका वसूल सरकारांत येत नसून जहागीरदारांत वांटला गेला आहे. १९४७९ ८१९ बिघे जमीन १३६४ वतनी माफीदारांकडे माफीनें आहे. एकंदर १९८९४०९।।॥ रुपये इतका वसूल सरकारी खजीन्यांत येतो. त्यांतून दरसाल दोन लाख रुपये **भोपाळ बाटेलियन**च्या खर्चाबद्दल खंडणीदाखल **इंग्रज** सरकारास द्यावे लागतात. शिवाय ४२९० रुपये **सिहोर** येथील शाळेबद्दल, ६०० रुपये तुरुंगाबद्दल, व ६०० रुपये दवाखान्याबद्दल द्यावे लागतात. ८०९३८३॥= रुपये मुलकी व फौजी मिळून एकंदर ६१०९ नोकर लोकांस वांटले जातात. याशिवाय पोषाखखाना, सार्वजनिक इमारती, रस्ते, दानधर्म, पागा, हत्ती, बैल, उंट, तसेंच सरकारी कोठारें—एक वर्षाच्या बेगमीचें धान्य एकदम सांठवून ठेवण्याजोगीं आहेत—त्याच्याकडे व घांस, लकडी वगैरे इतर किरकोळ जरूरी खर्च ज्यांचा तपशील वाचण्यास कंटाळा येणार आहे अशा पुष्कळ खर्चाची व्यवस्था या वसुलांतून करावी लागते. सारांश, जमा व खर्च बहुतेक बरोबरच असतो. एखादे वेळीं कांहीं विशेष समारंभ झाल्यास खर्च थोडा जास्ती लागतो. व एखादे वेळीं अंदाजापेक्षां खर्च कमी लागल्यास शिल्लक राहते. तिच्यांतून इतर सालच्या कर्जाच्या फेडीची हप्तेबंदी केली जाते.

राज्यातील मुख्य मुख्य निरनिराळीं खातीं, कचेऱ्या व कारखाने यांची हकीकत पुढें दिली आहे.

**मदारुल्महामः**—सर्वांत पहिल्या प्रतीचें खातें किंवा कचेरी **मदार उल्महाम** यांची आहे. येथें मुलकी, दिवाणी, फौजदारी वगैरे तीनही नाजिमांच्या अधिकाराबाहेरच्या मोकदम्यांची सुनवाई होऊन निकाल केला जातो. व नाजिमांच्या ठरावावर अपीलेंही येथेंच घेऊन निकाल केले जातात. **भोपाळ**च्या दिवाणी व फौजदारी खटल्यांचे कागद तेथील कोर्टाच्या अधिकाराबाहेर असलेल्यांची तपासणी खुद्द आमच्या कोर्टांत होऊन तेथून ते निकाल लिहिण्याकरितां **मदार उल्महाम**च्या कोर्टांत पाठविले जातात. **मदार उल्महाम** आपल्या अधिकारांतील खटल्यांचा निकाल करून अधिकाराबाहेरील खटल्यांचे फैसले लिहून आमच्याकडे पाठवितात. व त्यांवर निकाली हुकूम आमच्या कोर्टांतून दिले जातात. हाताखालच्या सर्व कोर्टांची देखरेख व तपासणी व राज्याच्या वसुलाची तपासणी व सर्व सार्वजनिक महत्वाचीं लहान मोठीं कामें, फौजीखातें, सायर व तिन्ही नाजिमांचीं खातीं, इतकीं सर्व या खात्याच्या अमलाखालीं आहेत.

**दिवाणी कोर्ट**—यांत वादी प्रतिवादी **भोपाळ**शाईंत राहाणारे असतील ते सर्व खटले सुरू होऊन त्यांची प्रथमची जरूरी व्यवस्था लागल्यावर देवघेवीच्या सर्व खटल्यांचा पंचायतीनें निकाल होतो. मुसलमान लोकांच्या दाव्यांचा निकाल मुसलमानी कायद्याच्या व हिंदु लोकांच्या दाव्यांचा त्यांच्या धर्मशास्त्राप्रमाणें निकाल होतो. स्थावर जिंदगीसंबंधी व हिंदु लोकांतील कांहीं जातींच्या लोकांच्या पुनर्विवाहासंबंधी दस्तऐवज व सरकारी वसुलाच्या बाकीसंबंधी दावे हे या कोर्टाच्या अधिकारांत आहेत.

**फौजदारी कोर्ट**—यांत **भोपाळ** शहरांतील सर्व फौजदारी मुकदमे घेतले जाऊन येथील कायद्याप्रमाणें त्यांचा निकाल केला जातो. **ज़हान्गीराबाद** येथील पोलीसचौकी, तसेंच जन्मठेपेच्या व कमी मु-

दतीच्या कैद्यांकरितां तुरुंग याच कोर्टाच्या अमलांत आहेत. शिवाय रस्त्यांची सफाई, शहराभोंवतालच्या व रस्त्यावरील पोलिसच्या चौक्यांची देखरेख, व साहेब लोकांचा रसद बंदोबस्त, तसेंच आरोपीस पकडणें, व शहरांतील कमजास्त हकीकतीची वर्दी देणें वगैरे कामेंही याच कोर्टाकडे आहेत. तसेंच लावारिस मालाचा किंवा जप्त केलेल्या मालाचा लिलांव करणें, व रोजच्या भावाचीं पत्रकें प्रसिद्ध करणें, गांवांतील रस्त्यांवर असलेल्या कंदिलांत दिवे लावणें, व **सिहोर** येथील **पोलिटिकल एजंट** यांच्याकडे व बाहेरगांवीं कैदी पाठविणें, वगैरे कामें याच कोर्टाकडे आहेत.

**काजीची कचेरी**—यांत लग्नें लावणें, व कसईखात्यावर देखरेख ठेवण्याचें काम चालतें. शिवाय दिवाणी व फौजदारी मुकदम्यांत मुसलमानी कायद्यास अनुसरून मतें देण्याचें काम चालतें.

**मुफ्ती याची कचेरी**—काजीनें दिलेलीं मतें धर्मशास्त्रास अनुसरून आहेत किंवा नाहींत हें पाहून त्याबद्दल कोणच्याही तऱ्हेनें चूक न राहावी याकरितां ही कचेरी आहे.

**सदर सायर कचेरी**—या कचेरींत पुष्कळ नोकर आहेत. शहरच्या व सर्व परगण्यांच्या सायरीस व आमच्या राज्यांतील फर्दनवीस हे या कचेरीच्या ताब्यांत आहेत. व वेळोवेळीं अमलांत असलेल्या नियमांस अनुसरून प्रत्येक महसूल घेण्यालायक रकमेवरील महसुलाचें उत्पन्न मुख्य मुंतजीम खजीन्यांत भरणा करितात. त्यांच्याकडे सर्व हाताखालच्या कचेऱ्या व कामगार यांवर समक्ष जाऊन देखरेख करण्याचें काम आहे.

**कौन्सिल**—यापुढें सर्व दिवाणी, फौजदारी, व मुलकी मुकदम्यांच्या निकालांवर अपिलें येतात. व सरकारी महत्वाच्या कामांचा निकाल होतो. या ठिकाणीं कारखान्याचे मुखत्यार, नाजीम व मोठे आफिसर, आपलीं मतें लेखी लिहून देतात. त्यांचा विचार होऊन सरकार त्यावर निकाली हुकूम देतात.

**वकिलाची कचेरीः**—या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याला **दरबार वकील** ह्मणतात. तो आपला सर्व आमला, स्वार व पायदळ अरदलीसह **सिहोरास पोलिटिकल एजंट** यांच्या तैनातींत राहतो. या संस्थानांतून **पोलिटिकल एजंट, एजंट गव्हरनर जनरल, व्हाईसराय** साहेब व **खुद्द महाराणी** सरकार यांच्याशीं होणारा सर्व तऱ्हेचा कुल पत्रव्यवहार या कचेरीमार्फत होतो. **ब्रिटिश** सरकारच्या संबंधानें या संस्थानचा सरकारी नात्यानें **पोलिटिकल एजंट सिहोर, एजंट गव्हरनर जनरल इंदूर** व **व्हाईसराय** व **गव्हरनर जनरल इंडिया** यांच्याशीं मात्र पत्रव्यवहार असतो. इतर लहानमोठ्या साहेब लोकांशीं केवळ खानगी व स्नेह्याच्या तऱ्हेवर मात्र पत्रव्यवहार असतो.

**दक्षिण**भागचा **कमिशनर** किंवा **सुभा** याची मुख्य कचेरीची जागा **कलियाखेडी** येथें आहे. तेथेंच त्याचा सर्व आमला व त्याच्या तैनातीचे स्वार व शिपाई राहतात. त्याला दरसाल आपल्या भागांत दौरा करून हाताखालचे सहाही **तहशीलदार** व सहाही **ठाणेदार** व **रेव्हिन्यू सरव्हेचे सुपरिंटेंडंट** व त्यांचा आमला तसेच **गुंनूर**च्या राखलेल्या जंगलाचे **सुपरिंटेंडंट** यांचीं सर्व कामें तपासावीं लागतात. या जंगलांत सर्व तऱ्हेचीं इमारती लांकडें आहेत. या जंगलाचे दोन विभाग केले आहेत. एक राखलेलें, त्याच्यांतून सरकारी कामास लागणारें सर्व लांकूड निघतें. दुसरें न राखलेलें, त्याच्यांतून कांहीं फी घेऊन सर्व रयतेस लांकडें कापण्याची परवानगी आहे. येथूनच **भोपाळांत** व इतर शहरांत लांकडांचा पुरवठा होतो. या खात्यावर एक हुषार व विद्वान् **सुपरिंटेंडंट** आहे त्याच्या हाताखालीं दुसरे हरकारे व प्रतिबंधक हेर वगैरे आहेत. या आमल्याचा खर्च सालीना ४००० रुपये आहे.

**पूर्व भागाच्या सुभ्याचे** सदर **रायसेन** येथें आहे. त्याच्या हाताखालीं आठ तहशीली व आठ ठाणीं आहेत. तसेंच **दक्षिण** भागाप्रमाणें एक **सरव्हे सुपरिंटेंडंट**ही आहे.

**पश्चिम भागाच्या सुभ्याचे** सदर **भेरश्या** येथें आहे. त्याच्या हा-

ताखालीं कारकून, स्वार व शिपाई या आमल्याशिवाय सात तहशीलदार व सात ठाणेदार आहेत.

**बक्षीची कचेरीः—बक्षी** हेच सर्व फौजेचे सेनापती किंवा **कमांडर-इन-चीफ** आहेत. त्यांच्या हाताखालीं पुष्कळ कारकून, व हिशेबनवीस यांचा आमला आहे. या दरबारांतील सर्व पगाराची वांटणी याच कचेरींतून होते. व या कचेरीपैकीं कोणीतरी एक अधिकारी नेहमीं आमच्याजवळ हजर राहतो. कोणीही कामगार आमच्या हुकुमानें प्रथम भरती होईल किंवा वजा होईल त्याची भरतीची व वजाईची तारीख व त्याचें वर्णन व **मिलिटरी** कामांच्या वांटणीविषयीं हुकूम हे लिहून घेण्याचें त्याच्याकडे काम आहे. सर्व आमल्याचीं माहेवारी कमजुलें किंवा पगारवांटणीचीं पत्रकें तपासण्याचें व **बक्षी**च्या कचेरींतील सर्व जमाखर्च तपशीलवार नमुन्याबरहुकूम ठेवण्याचें काम दुसऱ्या एका पृथक तपासनीसाकडे आहे. स्वतः **बक्षी**कडे कुलव्यवस्थेचें तसेंच गैरहजरीबद्दल सजा देणें, निरनिराळ्या कमेटीचे रपोट पाहाणें, व शिपाई लोकांच्या दांडगाईच्या वर्तनाबद्दल व इतर लष्करी कामाबद्दल तपासणी ठेवणें हीं कामें आहेत.

**सुपरिंटेंडंट** आफ् **डिस्पेन्सरीज** किंवा दवाखान्यांचे आफिसर, यांच्या हाताखालीं सर्व संस्थानांतील व खास **भोपाळ** शहरांतील हकीम व डाक्तर वगैरे लोक व सर्व दवाखाने ज्यांत सरकारांतून लोकांस औषधें दिलीं जातात ते सर्व आहेत. त्यांच्या हाताखालचे कामगार औषधें खर्च झाल्याचें पत्रक, रोगी बरे झाल्याबद्दलची नांवनिशी व रोगाचें वर्णन, व औषधाचा तपशील असलेलीं पत्रकें तयार करितात. तीं दर महिन्यास मुख्य अफिसराकडे तपासणीकरितां पाठविलीं जातात. खास **भोपाळां**त २९ व बाहेरगांवीं १६ याप्रमाणें एकूण ४५ हकीम लोक या खात्यांत दरबारांत नोकर आहेत.

फार दिवसांच्या मोकदम्याचा निकाल करण्याची कचेरीः—सं. १२८८ हिच्या रजब अखेर खास **भोपाळां**तील कांहीं कचेऱ्या व **सुत्रायती** यांच्यांत पुष्कळसें काम शिल्लक होतें, त्याचा निकाल करण्या-

करितां एक मुख्य **सुपरिंटेंडंट,** हाताखालीं चांगला भरपूर आमला देऊन खास **भोपाळा**करितां नेमिला. व त्याच्या हाताखालीं तीनही भागांकरितां तीन **सुपरिंटेंडंट** व आमले नेमिले. व त्या सालच्या साबानच्या पहिल्यी तारखेस एक आमहुकूम जारी केला कीं, प्रत्येक खात्याच्या मुख्य अधिकाऱ्यानें आपल्यापुढें आलेल्या प्रकरणाचा तीन महिन्यांच्या आंत निकाल केलाच पाहिजे.

वर्षासनें, पेन्शनें, व धर्मादाय वगैरेची कचेरीः—या संबंधानें लोकांस नेमणुका दिल्या जातात त्या सर्व या कचेरीच्या **इन्स्पेक्टरा**च्या हातून मिळतात.

**सेहक्रोही** किंवा तीनकोसी कचेरीः—या खात्याच्या मुख्य अधिकाऱ्याकडे **भोपाळ** शहराच्या सभोंवार तीन तीन कोसपर्यंतच्या हद्दींत ठाणेदारीचा अधिकार आहे. जरूर लागेल तेव्हां या हद्दींतील खेड्यापाड्यांतून दरएक कोसास दीड आणा याप्रमाणें मजूरीवर बेगारी व गाड्या वगैरे धरून आणून देण्याचें याच्याकडे काम आहे.

किल्ल्याच्या कमांडंटसूची किंवा **गडकप्तानाची कचेरीः**—हे गडकप्तान चार आहेत. १ फत्तेगड, २ बाले किल्ला, ३ पुराणा किल्ला, व ४ शहरपन्हा. या चारीकरितां चार कमांडिंग आहेत. त्यांच्या हाताखालीं शिपाई व गोलंदाज लोक आहेत व त्यांच्याकडे शहराच्या दरवाजांच्या रक्षणाचें काम आहे. शहर व किल्ले यांचे दरवाजे वेळच्यावेळीं उघडणें व बंद करणें व त्याच्या किल्ल्या मालकाकडे पाठविणें हें काम त्यांच्याचकडे आहे. शिवाय रात्रंदिवस आपापल्या कामाची योग्य निग्राणी ठेवण्याची सर्व जिमेदारीही त्यांच्याचकडे आहे.

**मोतमिद उल्महामची कचेरीः**—सर्व संस्थानच्या कुलजमाखर्चाची तपासणी या कचेरींत पूर्वीं होत असे. तसेंच, जमाबंदीचे पट्टे तयार करणें, वसूलबाकीचीं पत्रकें तयार करणें, व त्या संबंधानें **सुभे** वगैरे लोकांच्या नांवानें योग्य हुकूम जारी करणें हीं कामेंही येथेंच होत असत. **मदार उल्महाम** व त्यांच्या हाताखालचे लोक यांच्या विरुद्ध आलेल्या

अर्जांची सुनावणी व चौकशी येथेंच होत होती. व निरनिराळ्या कचेऱ्यांचीं कामें चालण्याविषयींचे नियम वगैरे येथेंच तयार होत असत. संस्थानांतील नोकर लोकांकडून लिहून घेण्याचे करारनामे व अशाच तऱ्हेचे सर्व संस्थानांत चालू होणारे करारनाम्याचे नमूने यांचा विचार व इंग्रजी अमलांत जारी असलेले कायदे कानून वगैरेविषयीं चर्चा याच कचेरींत **मालकब, मोतमीद उल्महाम** यांच्या दरम्यान होत असे. वारसदाखल खारीज करण्याच्या शर्ती व परमटीच्या महसूलाच्या दरांत फेरफार करणें किंवा माफ करणें व नबाबी जारी करणें व गांववार वसूल जमा करणें वगैरेबद्दल विचार व निकाल येथेंच होत असे. जुनें रिकार्ड **मालकाच्या** परवानगीनें फाडून टाकणें, फसली सालाच्या आरंभीं सर्व संस्थानच्या जमाखर्चाचा वार्षिक खरडा तयार करणें. वसूलबाकीची तिमाही यादी व वराती तयार करणें, सरकारी कर्जाची फेड करणें, जास्ती खर्चाच्या यादी तयार करणें व **मालकाच्या** हुकुमानें आपल्याच अधिकारांतील प्रकरणावर त्यांच्या हुकुमाकरितां रपोट तयार करणें, संस्थानच्या रोजच्या, आठवड्याच्या, व वार्षिक खर्चाच्या यादी तयार करणें. खास **भोपाळ** शहरांतील माल, दिवाणी व फौजदारी कचेऱ्यांची दरसाल तपासणी करणें, सरकारी पैशाची अफरातफर करणें किंवा खाणें अशा मोकदम्यांची चौकशी करणें, **सर्व्हेच्या** खात्याची तपासणी व जहागीरदारांच्या संबंधाच्या मोकदम्यांचा निकाल करणें, व महत्वाच्या मालाच्या सर्व मोकदम्यांचा निकाल करणें. हीं सर्व कामें या कामगाराकडे होतीं. पूर्वीं चौथ्या भागांत लिहिल्याप्रमाणें स. हि. १२८९ च्या सफर महिन्याच्या १ ल्या तारखेस ही कचेरी अजी कमी केली गेली व तेथें होत असलेलीं सर्व कामें, **कौन्सिल, मदारउल्महाम** व खास **मालक,** यांच्याकडे तीं तीं कामें सोईवार जलद व नीटपणें निकालास लागतील अशा व्यवस्थेनें वांटून दिलीं गेलीं.

**अपील कोर्ट:**—दिवाणी व फौजदारी मोकदम्यांतील अपीलें ऐकून त्यांचा निकाल करण्याकरितां व गुन्हेगार लोक तुरुंगांतून सोडिले जातांना

त्यांच्याकडून मुचलके घेण्याकरितां वगैरे मुकरर केलें होतें. परंतु पुढें **कौन्सिल** कचेरी मुकरर झाल्यावर या कचेरीला कांहीं काम नसल्यानें ती वजा केली. व सर्व अपीलें **कौन्सिला**कडे जाण्याची व्यवस्था केली.

**सार्वजनिक इमारतींची कचेरी:**—मजूर, पाथरवट, सुतार, लोहार, वगैरे कारागीर लोक या कचेरींत नोकर आहेत. त्यांच्या हातून सर्व सरकारी इमारतींचीं कामें करविलीं जातात. त्यांच्यावर एक मुख्य **इं-जिनियर** मुकरर आहे. तो त्यांच्यावर देखरेख ठेवितो, व सालअखेर या सर्व कामांबद्दलचा हिशेब तयार करून तो आमच्याकडे पाठविला जातो.

**खानगी कारभारी कचेरी:**—खानगी कारभाऱ्याकडे फरासखाना, पीलखाना, बगीखाना, उष्ट्रखाना, गाडीखाना, पागा वगैरे कारखाने व चोबदार, चपराशी, खलाशी, मशालची, मेहतर इत्यादि लोकांच्या संबंधाचें काम आहे.

**रस्ता कचेरी:**—या कामाचे दोन **सुपरिंटेंडंट** आहेत. एकाकडे परगण्यांतील कच्चे पक्के रस्ते व त्यांच्यामधील पूल वगैरेचें व दुसऱ्याकडे हल्लीं नवीन बनत असलेल्या **भोपाळ** व **हुसंगाबाद** ह्यांच्यामधील सडकेचें काम आहे.

**फत्तेगडांतील कोठाराची कचेरी:**—यांत **सुपरिंटेंडंट**, कारकून, हमाल, धडवई वगैरे लोक भरती आहेत. सर्व तऱ्हेचें धान्य वगैरे सामान एक वर्षाच्या बेगमीचें येथें आणून सांठविलें जातें. व दररोजच्या खर्चा-करितां रोजच्यारोज तोलून दिलें जातें.

**बारनबीशीदफ्तर:**—संस्थानासंबंधें सर्व महत्वाच्या गोष्टी व मह-त्वाच्या सुधारणा या दफ्तरांत नोंदल्या जातात.

**इन्शाया कचेरी:**—किंवा खास **मालकाचें** दफ्तर यांत खास **मा-लकाच्या** निग्राणीखालीं सर्व तऱ्हेच्या दरखास्तीवर हुकूम व दिवाणी फौ-जदारी व मुलकी मोकदम्यांचे निकाल निरनिराळ्या खात्यांच्या मुख्य अफिसरांच्या नांवानें, तसेंच वकील दरबार, सरकारी कामदार, आप्त-मंडळी व इतर हाताखालचे लोक यांच्या नांवानें हुकूम खास आमच्या-

कडून ह्मणून जारी केले जातात. येथील रिकार्डांत, हुकुमांची व दरखास्तींतील मजकुराची बारनिशी ठेविली जाते. याददाश्ती व खलीते याच दफ्तरांत तयार होतात. तसेच योग्य अफिसरांच्या नांवाचीं सर्टीफिकीटें किंवा खुषनुदीचे परवाने व मुलकी बाकी वसूल करण्याविषयींचे सुभ्यांच्या नांवचे हुकूम येथूनच जारी होतात. पुढें लिहिलीं पत्रकें येथें येतात व तीं सर्व आह्मी खुद्द तपासतों व त्यांच्यावर योग्य हुकूम देऊन तीं आह्मी परत पाठवितों. १ कारखान्याचे हफ्तेवारीच्या उत्पन्नाचें व खर्चाचें पत्रक, २ मेघजीनीच्या हफ्तेवारीचा जमाखर्च, ३ **फत्तेगडां**तील तोषाखान्याच्या कोठाराचा हफ्तेवार जमाखर्च, ४ किरकोळ अपराध घडल्याचें फेरिस्त, ५ **कमिसारियट** खात्याचें हफ्तेवार जमाखर्चाचें पत्रक, ६ धान्य आल्याबद्दल व विक्री झाल्याबद्दल पत्रक, ७ **जहानगीराबाद** ठाण्याच्या हद्दींत घडलेल्या किरकोळ गुन्ह्यांचें फेरिस्त, ८ **मदारउल्महाम**च्या दफ्तरांतील हफ्तेवार जमाखर्चाचें पत्रक, ९ सरकारी कोठारांत हफ्तेवार धान्य आल्याचें पत्रक, १० मुशाफर लोक आले गेल्याचें फेरिस्त, ११ **फत्तेगड** कोठाराची नगदीची कीर्द, १२ दिवाणी व फौजदारी कोर्टांच्या रोजनिशा, १३ **भोपाळां**तील चारही किल्ल्यांबद्दलचे रपोट, १४ पोलिसठाण्यांचे रपोट, १५ **भोपाळ**चे लोक व इतर मुशाफर लोक आल्यागेल्याचें पत्रक, १६ इमारत कारखान्याचा हफ्तेवार जमाखर्च, १७ तीनही तुरुंगांतील कैद्यांचें पत्रक, १८ तीनही तुरुंगांतून कैदी सोडले जातात त्यांचें पत्रक, १९ सायर दफ्तरचा हफ्तेवारी जमाखर्च, २० **कौन्सिल** दफ्तरच्या हुकुमानें तुरुंगांत असलेल्या कैद्यांच्या मुक्ततेविषयींचें पत्रक, २१ **फत्तेगड** किल्ल्याच्या कोठारांत आटा पिसला जातो त्याचें पत्रक, २२ आमच्या खुद्द दफ्तरांत आलेले कच्चे, कमीमियादीचे व जन्मटेपीचे कैदी यांचें पत्रक, २३ सरकारी कामगारांवर झालेले दंड व तलबाने वगैरेचें पत्रक, २४ सरकारी कामगारांस नवीन नोकरीवर ठेवल्याबद्दल व वजा केल्याबद्दल पत्रक, २५ सायर आमदनीचें पत्रक, २६ गुन्ह्यामुळें बडतर्फ झालेल्या कामगारांविषयीं त्यांस पुनः कामावर न भरती

करण्याविषयींच्या हुकुमांसह पत्रक, २७ इश्तिहारी मुजरिमांचें पत्रक, २८ सालवारी सर्टिफिकीटांचें पत्रक, २९ सुभे, तहशीलदार व ठाणेदार यांची नांवनिशी, ३० चोपदार, चपराशी व इतर हलके नोकर यांच्या कामवारीचा तपशील, ३१ वाघ व चित्ते वगैरे मारण्याबद्दल इनाम दिलें जातें त्याचें पत्रक.

**हुजूरदफ्तरः**—सर्व संस्थानच्या जमाखर्चाची तपासणी या दफ्तरांत होते व त्याचें एक पत्रक तयार करून तें तपासून त्याच्यावर **मालकाची** सही होते. गांवाच्या सनदा व सरकारी खजीन्यावर शिव्या येथेंच तयार होतात. गांववार वसूलबाकीचीं पत्रकें, परगणेवार जमाखर्चाचीं पत्रकें, व बाकीमाफीचीं पत्रकें व वादग्रस्त वसूलाच्या बाकीचीं पत्रकें व माफीदाराचे पट्टे हे सर्व येथें तयार होतात.

**मुख्य रिकार्ड दफ्तरः**—यांत संस्थानचे सर्व चालू व मागील मुलकी व दरबारी **पोलिटिकल** कागदपत्र ठेविले जातात. व तीन वर्षांनंतर इतर कचेऱ्यांतील निकाल झालेल्या मोकदम्यांचे सर्व कागद येथें पाठविले जातात; व सर्व कागद फेरिस्ताप्रमाणें तपासले जातात. निरुपयोगी व ठेवण्यास अयोग्य असे सर्व कागद, येथें **मालकाच्या** हुकुमानें फाडून टाकविले जातात. इनामी व जहागीर जमीनीसंबंधाचे कागदपत्र व पैमाषींत चुक्या झाल्यानें किंवा हद्दहद्दींत फरक पडल्यानें झालेल्या सरकारी नुकसानासंबंधें कागद येथेंच तयार होतात.

**सुलेमानिया मद्रसाः**—हा आमच्या परलोकवासी धाकट्या कन्येच्या नांवानें स्थापन केला आहे. त्यांच्यांत अरबी, फारसी, उरदू, हिंदी, नागरी व गणित व इंग्रजी इतक्या शाखा आहेत. तेथें एक सर्व तऱ्हेच्या उपयुक्त व शास्त्रीय पुस्तकांनीं भरलेली लायब्ररीही आहे. या मद्रशाच्या मुख्य अध्यापकाच्या हाताखालीं सर्व शहरांत मिळून १७ शाळा व अध्यापक आहेत. विद्यार्थ्यांची सहामाही परीक्षा घेतली जाते. पहिली सहामाहीची परीक्षा राज्यांतील मुख्य मुख्य विद्वान लोकांसमक्ष व दुसरी खुद्द आमच्यापुढें होते. परीक्षेचे निकाल नोंदले जातात व विद्यार्थ्यांना

त्यांच्या त्यांच्या योग्यतेनुरूप इनामें दिलीं जातात. सर्व संस्थानांत ४८ शाळा व ६४ शिक्षक आहेत. **सुलेमानिया मद्रशांतील** विद्यार्थ्यांकरितां त्यांना पोटापाण्याची दगदग करावी लागल्यानें अभ्यासांत व्यत्यय येणार तो येऊं नये व वरचेवर घरीं जाण्याचें कारण पडूं नये ह्मणून अन्नवस्त्र फुकट दिलें जातें. तसेंच अभ्यास पुरा झाल्यावर जे विद्यार्थी सरकारी नोकऱ्या करूं इच्छितील त्यांस त्यांच्या योग्यतेनुरूप नेमणुका व पगार दिले जातात. शिक्षक लोकांची निवड, त्यांच्याकडून विद्यार्थ्यांस ऐहिक व पारलौकिक या दोन्ही तऱ्हेचें शिक्षण उत्तम प्रकारें मिळावें अशा हेतूनें लक्षपूर्वक केलेली आहे व लायब्ररींतील पुस्तकांची निवड करण्यांत, व्यावहारिक, अलंकारिक व धर्मसंबंधी, ग्रंथ नीटपणें निवडले जाण्याची तजवीज ठेवली होती.

**व्हिक्टोरिया मद्रसाः**—ही शाळा केवळ पोरक्या व अनाथ मुलांकरितां स्थापिली गेली आहे. तेथें त्यांना सर्व तऱ्हेचें सोन्यारुप्याचें, जरीचे काम शिकविलें जातें, जरीचे फीते, किनारी, कांठ, साधे व फूलपत्तीदार चांदवे, जरीच्या व तारकशी टोप्या, शालजोड्या विणणें, व जोडे तयार करणें, हीं कामेंही शिकविलीं जातात. या मुलांचा अन्नवस्त्राचा खर्च सरकारांतून होतो. व त्यांना शिकविण्यास चांगले हुषार कारीगर लोक ठेविले आहेत. ते सर्व एका **सुपरिंटेंडंट**च्या हाताखालीं आहेत.

**प्रिन्स आफ् वेल्स मद्रसाः**—या मद्रशांत एक **प्रिन्सिपाल** व त्याच्या हाताखालीं काम करणारे लोक आहेत. दऱ्या, किंवा सतरंज्या, नवार, पायपोस, मलमलीवरील काम, तंबू, डेरे वगैरे बनविण्याचें काम, जाळ्या विणण्याचें काम, सर्व तऱ्हेचें शिवणकाम, लोंकरी मोजे व जोडे बनविण्याचें काम, व सोन्यारुप्याचें गिलिट करण्याचें काम, हीं सर्व कामें येथें येणाऱ्या मुलांना शिकविलीं जातात. व त्यांना दररोज एक किंवा दोन आणे दिले जातात. परंतु ता० १ पहिली रबिलाखर सन १२८९ पासून येथील सर्व विद्यार्थ्यांस व तसेंच **व्हिक्टोरिया मद्रशांतील** विद्यार्थ्यांस नगदी दरमहा ठरवून दिला गेला आहे. व आतां याबद्दल

वार्षिक खर्चाचें बजेट एकदम तयार केलें जातें. प्रत्येक विद्यार्थ्याची त्याच्या धंद्यांत परीक्षा घेतली जाते.

**शिकंदरा** प्रेस किंवा **मतबा छापखाना:**—याला हें नांव माजी बेगमसाहेबांवरून दिलें आहे. येथें जाहिरनामे, नमूने वगैरे सरकारांत लागणारें सर्व काम छापून तयार होतें व तें शुद्ध आहे किंवा नाहीं हें सुपरिंटेंडंट तपासतो.

**सुलतानी छापखाना:**—युवराज **सुल्तान जहान** बेगम इच्या नांवानें हा छापखाना जरी झाला आहे, तरी त्यांत एक काम पाहणारा सुपरिंटेंडंट व त्याच्या हाताखालीं काम करणारे लोक व आमला आहे. **भोपाळ** संस्थानांत लागणारे सर्व श्टांप या छापखान्यांत छापले जातात.

**शहाजहानी छापखाना:**—हा आमच्या नांवावर स्थापन झाला आहे. यांतून **अमदत् उल् अखबार** नांवाचें वर्तमानपत्र दर आठवड्यास प्रसिद्ध होत असे. त्यांत इंग्रजी व देशी वर्तमानपत्रांतील निवडक उतारे, **भोपाळां**तील ताज्या खबरा व शास्त्रीय विषय, इतिहास, काव्यें व स्तुतिपर वगैरे विषयांवर निबंध प्रसिद्ध होत असत. व कांहीं शालोपयोगी पुस्तकेंही येथें छापलीं जात होतीं.

**घासगंज्या व लांकडाचे टाळ:**—या ठिकाणीं एक वर्षाच्या खर्चा पुरता घास व लांकूड जमा करून त्यांतून लागेल तसें खर्च केलें जातें.

**बाग इन्स्पेक्टराची कचेरी:**—सर्व सरकारी बागा या कामगाराच्या स्वाधीन आहेत. त्या सर्व उत्तम स्थितींत ठेवून त्यांच्यांतील फळें व फुलें विक्री करण्याची जिम्मेदारी त्याच्याकडे आहे. माळी, मजूर, पाणीवाले वगैरे सर्व कायमचे नोकर असून, त्याच्या हाताखालीं आहेत.

**मेघजीन व शिलेखाना:**—सलामी देणें व कवायती वगैरे कामाकडे खर्च होणारी सर्व दारू या कारखान्याच्या अफिसराच्या देखरेखी खालीं बनते.

**टांकसाळ:**—हा कारखाना सरकारी खजानची लाला **लालजी** यांच्या स्वाधीन आहे. सावकार व इतर लोकांकडून नियमित कमिशन

किंवा बढती घेऊन त्यांना चांदीचें व तांब्याचें नाणें पाडून दिलें जातें. व जरूर पडेल त्याप्रमाणें सरकारांतूनही रुपये व पैसे पाडले जातात.

**खजीना:**—संस्थानाच्या सर्व वसूलाचा भरणा मुख्य खजीन्यांत होतो. खजानची रोजकीर्द ठेवितो व परगण्यांतून व जिल्ह्यांतून पोतदारांकडून वसूलाच्या भरण्यापेटे आलेल्या हुंड्यांचा वगैरे जमाखर्च करितो. हीं कामें खुद्द त्याच्या देखरेखीखालीं होतात. जमाखर्चाचीं हफ्तेवार पत्रकें तयार करून तो खुद्द **मालका**कडे पाठवितो व सालअखेर **हुजूर दफ्तरां**तून चिट्या होऊन रुपया दिला गेला असेल त्याबद्दल, तसेंच सरकारी नोकरांचीं कबजुलें व खजीन्यांतील कुल जमाखर्च, एकत्र करून आढाव्याचें पत्रक तयार करून तें मालकापुढें ठेविलें जातें.

**तोषाखाना:**—याच्या मुख्य अफिसराकडे मालकाच्या हुकुमा अन्वयें, फरासखाना, पीलखाना वगैरे कारखान्यांत लागणारें सर्व सामान खरेदी किंवा तयार करण्याचें काम आहे. हुजूरच्या किंवा सरकारी कामाकडे लागणारा कपडा व जवाहीर, दागिने वगैरे खुद्द मालकाकडे पसंतीकरितां पाठविले जातात. व पसंत होतील तेच खरेदी केले जातात. व सालअखेर या कारखान्याचे हिशेब तयार होऊन मालकाकडे पेश केले जातात.

**डाकखाना:**—पूर्वी या कारखान्यांत एक इन्स्पेक्टर, चार जिल्हा पोस्टआफिसचे कारकून व पस्तीस डाकवाले मिळून ४० चाळीस नोकर होते. डाकेचे लोक सरकारी कागद सदरांतून तीनही जिल्ह्यांच्या मुख्य गांवीं नेत व तेथून तहशिलींत गांवचे शिबंदीचे बळई वगैरे नेऊन पोहोंचवीत असत. या आमल्याला दरसाल ४२७० रु. खर्च लागत असे. सरकारी कामदार व रयत या सर्वांच्या सोईकरितां सं. १२८९ हि.च्या रबीलावल महिन्याच्या पंधराव्या तारखेपासून सर्व **भोपाळशाई**त इंग्रेजी तऱ्हेवर डाकखान्याचा बंदोबस्त केला. याचा खर्च भागण्याकरितां तिकिटें विक्री वगैरे सर्व गोष्टींचा बंदोबस्त इंग्रजी नमुन्यावर केला. हल्लीं सुमारें २२९ नोकरांचा मिळून अंदाजें १४२०० रु. पगाराबद्दल खर्च येतो. व किर-

कोळ सादिलखर्च सुमारें ६६० रु. मिळून या खात्याचा कुलखर्च १४८६० रु. येतो.

**मशीदी, दरगे व देवस्थानें:**—या तीनहीकडे मिळून पुष्कळ नोकर आहेत. मशीदींत मवज्जन, मुल्ला किंवा कुराण पढणारे, भिस्ती, मेहतर वगैरे व **भोपाळच्या** माजी **नबाब** व **बेगम** यांच्या थडग्यांवर कुराण वाचणारे, मेहतर व इतर नोकर चाकर असे लोक आहेत. व लंगड्या लुल्यांच्या दवाखान्यांत भट्यारे, भिस्ती व खटपट्ये वगैरे आहेत. तसेंच दररोज दुवक्ता पक्कें अन्न शिजवून तयार करून आसपासचे गोरगरीब व मुशाफर वगैरे लोकांस धर्मार्थ वांटलें जातें. तसेंच भिकारी, बोवा व लंगडे लुले अशा लोकांना धान्य वांटलें जातें. याप्रमाणें **परमेश्वराच्या** आज्ञेनुसार कर्तव्यकर्म जाणून शेंकडों गरीब लोकांस मदत दिली जाते. या कामावरील दरोग्याकडून प्रत्येक सालाच्या अखेरीस हिशेब तयार होऊन ते **हुजूर दफ्तरांत** पाठविले जातात. हल्लीं ता० १ मोहरम सं० १२९० हि.पासून गरीब, कंगाल व गरजू लोकांच्याच दरखास्तीवरून शिजविलेल्या अन्नाच्या ऐवजीं, तितकेंच धान्य किंवा सुखा शिधा वांटण्याची व्यवस्था केली आहे.

**जहागीरदार.** या संस्थानांतील जहागीरदारांचे ४ वर्ग आहेत. पहिल्या वर्गांत चार थोर मंडळी आहेत त्यांचें एकंदर उत्पन्न आहे. तें येणेंप्रमाणें:—

| | | रु० |
|---|---|---|
| १ | नबाब **खुदसिया बेगम** .... .... | ,, ४९८६४० |
| २ | **खुद ग्रंथकार ( शहाजहान** बेगमसाहेब ) | ,, ११०९० |
| ३ | नबाब **सुलतानजहान** बेगम .... | ,, ९१२९० |
| ४ | नबाब **वालाजाह अमीरउल्मुल्क** | ,, ७९४७० |

दुसऱ्या दर्जाचे मोठमोठे जहागीरदार सुमारें १६ आहेत. त्यांचें एकंदर उत्पन्न आहे त्याचा तपशील पुढें दिल्याप्रमाणें.

| | | रु. | दरमहा. |
|---|---|---|---|
| १ | मीया यासीन महंमदखान.... | ,, | २४०८० |
| २ | बीबीसाहिबा, हकीम शहाजाद मसीचें कुटुंब .... .... | ,, | ९८४१० |
| ३ | मदारुल्महाम .... .... | ,, | २८९७० |
| ४ | मीया फैजमहंमदखान .... | ,, | २१०३० |
| ५ | मीया यारमहंमदखान .... | ,, | १३९४० |
| ६ | मीया हातिम महंमदखान .... | ,, | १२२८० |
| ७ | लाला चंदूलाल .... .... | ,, | १२०८० |
| ८ | राजा किशनराम यांची कन्या. | ,, | ६००० |
| ९ | राजा अमरसिंग..... .... | ,, | १९९८० |
| १० | खुशाल सहाय गोंड .... | ,, | ४६२० |
| ११ | राणी नवसकुवर, मर्दानशहा गोंड यांची बायको.... .... | ,, | ८५५६ |
| १२ | सभगसिंग ठाकुराची विधवा स्त्री. | ,, | ५४५० |
| १३ | राजा मजबूतसिंग .... | ,, | ८०२० |
| १४ | राजा मधुकरसहाय गोंड .... | ,, | ६४२५ |
| १५ | राजा लछमनसिंग .... | ,, | ३२०० |
| १६ | राजा प्रतापसिंग.... .... | ,, | १०२५० |

तिसऱ्या दर्जात सुमारें १००० रुपयांहून ज्यांचें कमी उत्पन्न नाहीं, असे लोक आहेत व चौथ्यांत १००० रुपयांहून कमी उत्पन्नाचे सर्व किरकोळ उत्पन्नदार आहेत. या दोनही वर्गांत मिळून सुमारें १५७ लोक आहेत व त्यांचें एकंदर सालीना उत्पन्न अंदाजें १३७३३० रुपयांचें आहे. या जहागिरी सरकारांतून निरनिराळ्या संबंधानें दिल्या गेल्या आहेत. अवल पहिल्या वर्गांतील प्रथमच्या तिघांस त्यांच्या वडिलोपार्जित संस्थानावरील हक्काच्या संबंधानें; दुसरे, राज्यकर्त्यांच्या रिष्तेदारांस त्या रिष्त्याच्या संबंधामुळें; तिसरे, राजनिष्ठ सरकारी कामगा-

रांस, त्यांच्या राजनिष्ठेच्या बक्षिसादाखल; चौथे, आमच्या पूर्वींच्या राज्याधिकाऱ्यांनीं दिलेल्या जुन्या जहागीरदारांच्या जहागिरी. हे लोक हल्लीं आमचे नम्र ताबेदार आहेत. पांचवे, देवाच्या नांवानें धर्मादाय, फकीर व साधु लोक यांस दिलेलीं उत्पन्नें. व साहवे कांहीं मुलकी व फौजी अधिकाऱ्यांस त्यांची राजनिष्ठा व योग्यता पाहून दिलेलीं उत्पन्नें.

राजे लोक एक तऱ्हेनें आपल्या सर्व राज्याचे पूर्ण मालक आहेत तरी, त्यांना त्यांच्या राज्यांतून खास जाती नेमणुकीदाखल निराळें उत्पन्न तोडून दिलेलें असतें. हें उत्पन्न नगदी किंवा जहागिरीच्या रूपाचें असतें. निरनिराळ्या राजपुरुषांस काय काय नगदी नेमणुका आहेत याविषयीं माहिती आतांच **'नय्यारा'** नांवाच्या वर्तमानपत्रांत प्रसिद्ध झाली आहे. ती येणेंप्रमाणें:—

| | | | रु. | दरमहा. |
|---|---|---|---|---|
| रशियाचे बादशहा | .... | .... | ,, | १४१६६७० |
| तुर्कस्थानचे सुलतान | .... | .... | ,, | १०८४००० |
| फ्रान्सचे बादशहा | .... | .... | ,, | ८६६६६६ |
| आस्ट्रियाचे बादशहा | .... | .... | ,, | ६६६६६० |
| प्रशियाचा राजा | .... | .... | ,, | १००००० |
| इटालीचा राजा | .... | .... | ,, | ४००००० |
| इंग्लंड व इंडियाच्या महाराणीसाहेब | | | ,, | ११६६६६ |
| स्पेनचा राजा | .... | .... | ,, | ३००००० |
| बेलजमचा राजा | .... | .... | ,, | १००००० |
| अमेरिकेंतील युनायटेड स्टेटसचे प्रेसिडेंट | | | ,, | ४१६६ |

याचप्रमाणें या संस्थानांत पूर्वींपासून संस्थानिकाच्या खानगी खर्चाकरितां नियमित उत्पन्नाच्या जहागिरी आजवर तोडून दिल्या गेल्या होत्या. पण हल्लीं इ. स. १८६४ च्या आरंभापासून आह्मीं आमची जहागीर सरकारी संस्थानाच्या उत्पन्नांत सामिल करून देऊन स्वतःच्या खानगी खर्चाकरितां १००००० रु. सालीनाची नेमणूक ठरवून

घेतली आहे. व तसेंच सुलतान जहान बेगम यांच्या उत्पन्नावरही सुमारें २५००० रु. सालीनाची नगदी नेमणूक वाढविली आहे.

पुढील पत्रकांत भोपाळ संस्थानांतील घरें व माणसें यांची गणती, पोलिटिकल एजंटाच्या सांगण्यावरून सं. १२७६ फ. १८६८ इ. त घेतली गेली तिचा तपशील दिला आहे.

**भोपाळ**ची खानेसुमारी सन १८७२ सालीं आमच्या हुकुमानें मुनशी **वाजीदखान**, मुख्य म्याजिस्त्रेट **भोपाळ** यांनीं केली होती तिच्यावरून **भोपाळ**ची लोकसंख्या ४५१९७ असल्याचें कळून आलें. आमच्या मातोश्रीच्या कारकीर्दींतल्या खानेसुमारीहून या आमच्या कारकीर्दींतल्या खानेसुमारींत **भोपाळां**त ८४५८ लोकसंख्या ज्यास्त झाली. याबद्दल आह्मी **परमेश्वरा**चे फार आभारी आहों. आमच्या अमलांत ज्यास्ती स्वस्थता व भरभराटी असल्यानें सर्व राज्यांतील लोकसंख्या याच प्रमाणानें वाढली असावी अशी आह्मांस खात्री वाटते.

**भोपाळां**त अर्धी हिंदु व अर्धी मुसलमानी वस्ती आहे. हिंदु लोकांत, कायस्थ, बनिये, ब्राह्मण, व रजपूत वगैरे लोकांची बरीच वस्ती आहे. वरिष्ठ प्रतीच्या मुसलमान लोकांत पठाण लोकांचा भरणा विशेष आहे. त्यांत कांहीं शेख व सय्यद अशीं घराणीं आहेत. बोहोऱ्यांचीं घरें १०० वर आहेत. व्यापारधंदा करणारे लोक हिंदु व मुसलमानांत बहुतेक सारख्याच प्रमाणानें आहेत.

---

## भाग ६ वा.

## भोपाळसंस्थानच्या मोजणीविषयीं व त्यांतील जिल्हे, परगणे, गांव, किल्ले, वगैरेविषयीं व तेथें उत्पन्न होणारा माल याविषयीं हकीकत.

**भोपाळ** संस्थानचें क्षेत्रफळ इंग्रज सरकारांनीं पैमायष केली आहे त्यावरून ६७६४ चौरसमैल आहे असें कळतें.

आमच्या मातोश्रींनीं या संस्थानाचे तीन विभाग केले होते. त्यांत पहिला विभाग किंवा जिल्हा **जनूब** किंवा **दक्षिणभाग** हा होता. त्यांत **चिपानेर, भरोंदा, मर्दानपूर, बाडी**–( येथील तहशीलदार **चिखली** येथें राहतो ) **उदेपुरा, चौकीगड** ( येथील तहशीलदार **चांदपुरा** येथें राहतो ) व **ताल** ( येथील तहशीलदार व जिल्ह्याचा नाजीम किंवा सुभा हे **कलियाखेडी** येथें राहतात ) असे सात परगणे आहेत.

दुसरा **पूर्वभाग**—यांत **जेठारी, देवडी, सिलवानी, भमूरी, महलपूर, रायसेन, दिवाणगंज** किंवा **गुलगांव, अमरावगंज** किंवा **रामगड, सेवास, घैराटगंज, अंबापाणी**, व **पीखलोण** असे १२ परगणे आहेत.

तिसरा **पश्चिमभाग**—यांत **दिलोद** ( येथील तहशीलदार **गंगो** येथें राहतो ) **देवीपुरा, नजीराबाद, भेरसिया, शम्सगड, सिहोर, दुराहा, अष्टा, जावर**, व **इच्छावर** असे दहा परगणे आहेत.

यांतील पुष्कळ परगणे लहान होते व तेथील तहशीलदारांचा पगारही कमी होता. ह्मणून सन १८७२ पासून **भरोंदा** व **मर्दानपूर** हे परगणे एकत्र केले गेले, तसेंच **चौकीगड** किंवा **चांदपुरा** व **ताल** परगणा, हे एकत्र करून त्यांस **कलियाखेडी** असें नांव दिलें. तसेंच **जेठारी** व **देवडी; शिरवाणी** व **भमूरी; महलपूर** व **रायसेन; दिवाणगंज** व **अमरावगंज; दिलोद** व **देवीपुरा; नजीराबाद** व **भेरसिया;** आणि **शम्सगड** आणि **सिहोर;** असे दोन दोन परगणे एकत्र केले गेले व तेथील तहशीलदारांचा पगार वाढविला. तिन्ही भागांत मिळून एकवीस परगणे कायम ठेविले.

हल्लीं दक्षिणभागांत आठ मोठे गांव, आठ परगणे, दोन किल्ले, व ६१४ गांवें आहेत. या जिल्ह्यांत चणे, तांदूळ, गहूं, मसूर, तूर, मूग, उडीद, तीळ, रमेली, जवस, तमाखू, कोद्रू, वाटाणे, चिरोंजी, तूप, कापूस, मका, वगैरे धान्यें व उपयोगी पदार्थ उत्पन्न होतात. तसेंच साज,

सागवान, हळदू, शिसम, अबनस, बिजा, सार, वगैरे जातीचीं इमारती लांकडें उत्पन्न होतात.

**चिपानेर**—हा गांव **भोपाळा**पासून ६४ चौसष्ट मैलांवर **नर्मदे**च्या कांठीं आहे. **नर्मदे**स कांहीं ठिकाणीं पायउतार असून पुष्कळ जागीं डोह आहेत. या नदीचें पाणी जड व पचनास भारी आहे. या नदीची योग्यता **गंगा** व **यमुना** या महानद्यांबरोबर असून, ती पश्चिमवाहिनी आहे; यामुळें हिंदु लोक तिला पवित्र मानतात; व तिच्यांत स्नान केल्यानें खचित मुक्ति मिळते असें समजतात. या नदींत मासे पुष्कळ आहेत. गांवाच्या आसपास झाडी पुष्कळ असून त्यांत पुष्कळ वाघ, बाराशिंगे, नीलगाई, सांबर, चितळ, व आस्वलें वगैरे जनावरें आहेत. जंगलांत मुख्यत्वेंकरून चिरोंजी, अबनस आणि ढाक किंवा पळस हीं झाडें आहेत. गांवांत २३० कौलारू कच्चीं घरें आहेत. या परगण्यांत ४८ गांवें आहेत. येथें **नर्मदे**च्या बाणांचे खलबत्ते चांगले व पुष्कळ बनतात.

**भरोदा**—हा गांव **भोपाळा**हून ५४ चौपन्न मैलांवर साधारण मोकळ्या पण चढउताराच्या जमिनीवर आहे. येथील जमीन रेताळ असल्यानें जमिनीस पाणी देण्याकरितां केलेले कुवे थोड्याच वर्षांत पडतात. सन १८७२ पासून हा परगणा **मर्दानपूर** परगण्यांत सामील केला गेला. गांवांत ३२५ घरें आहेत. आसपासचा प्रदेश फार चांगला किंवा फार वाईट नाहीं. साधारण आहे. त्यांत झाडीही साधारण आहे. या परगण्यांत पंचावन्न गांवें आहेत. तेथें ज्वारीशिवाय सर्व धान्यें लोक उत्पन्न करितात. या गांवांत पुष्कळ कोष्टी लोक राहतात. ते जाडे दोरवे किंवा जोट विणतात. तें कापड **भोपाळ**चे व आसपासच्या गांवचे व्यापारी लोक विकत घेतात.

**मर्दानपूर**—या गांवांत १८५ घरें आहेत. आसपासचा प्रदेश वीराण आहे. हा गांव **नर्मदे**च्या किनाऱ्यावर आहे. तेथें **नर्मदे**चें पाणी अथाग आहे. गांवाच्या आसपास पहाड व जंगल अगदीं जवळ आहे. या परगण्यांत ७० गांवें असून तेथें अफू व ऊंस यांशिवाय सर्व

प्रकारचें पीक होतें. जंगलांत मुख्यत्वेंकरून खैरांचीं झाडें आहेत. **नर्मदे**च्या वाळवंटांत खरबुजें व टरबुजें फार चांगलीं होतात.

**गन्नूर**चा किल्ला एका १६५ फूट उंच टेंकडीवर आहे. त्याची लांबी ३७०० फूट व रुंदी ८७५ फूट आहे. त्याचा तट ८० फूट उंच व २० फूट रुंद आहे. आसपास खोल दऱ्या व खोरीं आहेत. व सभोंवतालचें जंगल फार दाट असून रस्ता वेडावांकडा असल्यानें किल्ल्यावर जाणें बरेंच धोक्याचें व कठिण आहे. तेथील हवाही चांगली नाहीं असें ह्मणतात. लढाईच्या प्रसंगीं या किल्ल्याचा चांगला उपयोग होण्यासारखा आहे. येथील जुन्या पडक्या इमारतींवर **कासरवूत** नांवाचीं झाडें उगवलेलीं आहेत. त्यांपासून पक्षघात व अपस्मार या रोगांवर चांगलें औषध तयार होतें असें सांगतात. तसेंच, या टेंकडीवर चित्रावल नांवाचीं झाडें उत्पन्न होतात. त्यांच्या चिकापासून सोनें तयार करतां येतें अशी तेथील लोकांची समजूत आहे. या पहाडीचा दगड नरम आहे व त्यांत काळे व हिरवे पट्टे आहेत. सर्व किल्ला याच दगडाचा बांधला आहे. या किल्ल्यांत २५ पंचवीस विहिरी व ४ चार टांकीं आहेत. व एका वडाच्या झाडाखालीं एक ६ सहा गज लांब व ४ चार गज रुंद अशी कबर आहे ती कोणी **ईसामूसा** नांवाच्या पीराची आहे, असें लोक सांगतात. तसेंच येथें एक मागील राजांच्या वेळचा जुना व पडलेला मोठा थोरला महाल, व एक मोठी बादशाही मशीद आहे. व तिच्या जवळच एक सुरेख कमानदार पडकी इमारत आहे. किल्ल्याच्या खालीं एक गुंफा आहे तिचें तोंड पक्कें बांधलेलें आहे. तिच्या आंत उतरण्यास पाहिऱ्या आहेत. त्यांत फार थंड व गोड पाणी आहे. तेथील लोक याला **महंमदा**चा झरा असें ह्मणतात. या किल्ल्याला तीन ठिकाणीं तटबंदी बुरूज आहेत. त्यां सर्वांत बाहेरील बुरूज किल्ल्यापासून तीन मैलांवर आहे. त्याला मोर्चा ह्मणतात. दुसरा बुरूज व तट किल्ल्यापासून २ मैलांवर आहे. तेथें कांहीं घरें व १ टांकें आहे. तिसरा तट खास किल्ल्याचाच आहे. तो तट व त्याच्यांतील दरवाजे फार मजबूत

आहेत, व त्याचे बुरूज पुष्कळ मोठे व विस्तीर्ण आहेत. या किल्ल्याच्या आसपास चांगला चुना तयार होतो. आसपासचें जंगल फार गर्द आहे. त्यांत मोठीं इमारती लांकडें, **आमखो, चमेलीखो, यारनगर,** आणि **दिलावाडी** या चार ठिकाणीं उत्पन्न होतात. या किल्ल्याच्या आसपास उंच उंच टेंकड्या आहेत, त्यांत मोठमोठ्या गुंफा आहेत, व त्यांच्यावर दाट झाडी आहे त्यांत **गोंड** लोक राहतात. किल्ल्याखालीं एक लहानशी टेंकडी, **अश्रफी** नांवाची आहे. तिच्यावरून किल्ल्यावर तोफेचा मारा आहे. पूर्वीं एका राजानें या किल्ल्याला वेढा घातला होता. त्या वेळीं एकेक टोपलीभर मातीला एकेक मोहोर देऊन त्यानें ही टेंकडी तयार केली. व तेथून किल्ल्यांत गोळे टाकून किल्ला घेतला, अशी दंतकथा आहे. हा किल्ला **भोपाळा**पासून अडतीस मैलांवर आहे. किल्ल्याच्या खालीं **बीरबाग** व **फैंजबाग** नांवाचे दोन बगीचे आहेत. या किल्ल्याच्या आसपासच्या जंगलांत एक जातीचा मोठा पोपट आहे त्याचें सर्व अंग हिरवें असून मान लाल असते व त्याचा आवाज फार मोठा असतो.

**चिखली**—हा गांव **नर्मदा** किनाऱ्यावर आहे. नदीच्या बाजूला त्याची जमीन उंच नीच आहे. परंतु उत्तरेस ती चांगली सपाट आहे. येथें शाळू व उन्हाळू दोन्ही पिकें चांगलीं होतात. पूर्वीं हा गांव **बाडी** परगण्यांत होता. पण **बाडी** गांव नबाब **खुदसिया** बेगम साहेब यांच्या जहागिरींत असल्यानें आमच्या मातोश्रींनीं **चिखली** हा नवा परगणा, **चौकीगड** परगण्यांतील, **रामगड** टप्पा, व **बाडी** परगण्यांतील **दुर्बी** टप्पा असे मिळून कायम केला. या नव्या परगण्यांत १०१ गांव आहेत. हा गांव **भोपाळा**पासून बावन्न मैल आहे. त्यांत ३१० घरें आहेत त्याच्या आसपास पुष्कळ आमराया आहेत. व आसपासची सर्व आबाद आहे. तेथें चामड्याचे तोबरे, थैल्या, खोगिरें, वगैरे सामान बरें होतें.

**उदेपुरा**—हा गांव **भोपाळा**पासून चौऱ्यायशीं मैल असून तेथें ६०० घरें आहेत. तेथें रंगाचें काम व सुताच्या काढण्या चांगल्या होतात. गां-

वाच्या आसपास बगीचे व आमराया पुष्कळ आहेत. त्यांत सेतूत, कचनार, केळी व जांभळी, इत्यादि झाडें आहेत. त्याच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील जमीन चांगली सपाट आहे. परंतु दक्षिणेकडील जमीन उंच सखल आहे. येथें थोडीशी अफू उत्पन्न होते. या परगण्यांत ८७ सत्यायशीं गांव आहेत.

**चौकीगड**—हा किल्ला **दक्षिणभागांत** एका उंच टेंकडीवर आहे. ती टेंकडी आसपासच्या प्रदेशाहून २५० फूट उंच आहे. किल्ल्याच्या भिंती २० फूट जाड व १६५ फूट उंच आहेत. अशी किल्ल्याची एकंदर उंची ४१५ फूट आहे. किल्ल्याची लांबी २०१३ फूट व रुंदी १५६८ फूट आहे. त्याच्या आसपास जंगल आहे. त्यांत हिंस्र पशू पुष्कळ आहेत. तेथील हवा चांगली आहे. तेथें दोन जुन्या सुंदर दगडी इमारती व पांच विहिरी आणि एक तलाव आहे. त्याला **भोजतलाव** ह्मणतात. एक चांगली मोठी बावडी आहे व तिच्या बाजूस जमिनींत दालनें आहेत. तिचें पाणी गोड, थंड, रुचकर व स्वच्छ आहे. किल्ल्याच्या खालीं चार विहिरी, एक टाकें, व एक उजाड गांव आहे. हा किल्ला **भोपाळा**पासून पन्नास मैल आहे.

**चांदपुरा**—हा गांव **भोपाळा**पासून चाळीस मैलांवर आहे. येथें शाळू पिकें चांगलीं होतात. तहशीलदार व ठाणेदार यांच्या कचेऱ्यांच्या सरकारी इमारती चांगल्या बांधलेल्या आहेत. तेथें एक सरकारी व तीन खानगी बाग आहेत. ते चांगले व सुरेख आहेत. जंगल गांवाच्या जवळ लागलें आहे. गांवाच्या पूर्वेस, उत्तरेस व पश्चिमेसही थोडीशी जमीन चांगली आबाद होण्यासारखी आहे. या परगण्यांत अठ्याहत्तर गांव आहेत. ते सर्व सन १८७२ सालीं **ताल** किंवा **कलियाखेडी** परगण्यांत सामील केले गेले.

**कलियाखेडी**—हा गांव **भोपाळा**पासून बावीस मैल असून तेथें **दक्षिणभाग**चा सुभा राहतो. सुभा, तहसीलदार, व ठाणेदार यांच्या कचेऱ्यांच्या सरकारी इमारती प्रशस्त व चांगल्या बांधल्या आहेत. पहाड व

जंगल गांवापासून जवळच आहे. गांवाच्या उत्तर बाजूस एक पक्का तलाव व दोन आमराया आहेत. व पूर्वेसही दोन तलाव आहेत. येथें गहूं चांगला तयार होतो व एक जातीचा तांदूळ उत्पन्न होतो तो खाल्ल्यानें मस्तकशूळ कमी होतो. त्याला माथाशूळ ह्मणतात. गांवांत ३०४ घरें आहेत. या परगण्यांत ९६ गांव सरकारी असून बाकीचे **खुदसिया** बेगम साहेब यांच्या जहागिरींतील आहेत. या परगण्याला **ताल** परगणा असें ह्मणतात. हें नांव पडण्याचें कारण खालीं लिहिल्याप्रमाणें आहे:—

प्राचीनकाळीं **माळवा** व **उज्जनी** येथील राजा **भोज** यानें **भोपाळा**पासून सुमारें १६ मैलांवर दोन पहाडांच्या दरम्यान एक पुष्कळ लांब, रुंद, उंच व भक्कम असा पक्का दगडांचा बंधारा बांधिला. त्या बंधाऱ्याचे कांहीं कांहीं भाग अद्यापि कायम आहेत. या बंधाऱ्यामुळें पहाडांतील पाणी तुंबून एक पुष्कळ मैल लांब रुंद असा मोठा थोरला तलाव झाला. हा बंध **माळव्या**चा राजा **हुषंगशहा** ज्यानें **हुषंगाबाद** शहर वसविलें त्यानें फोडून दिला. **हुषंगशहा**नें सन ८०१ हिजरींत आपली राजधानी **धार** शहराच्या जवळच एका उंच व हवाशीर आणि दुर्गम अशा **मांडवगड** नांवाच्या पहाडीवर एक नवीन शहर वसविलें व मोठा थोरला किल्ला बांधिला. तीन वर्षांनंतर तें काम पुरें झालें. त्यानें त्याला **शादियाबाद मांडव** असें नांव दिलें. हल्लीं तें शहर व तो किल्ला उजाड असून **धार** येथील **पवार** राजांच्या अमलाखालीं आहे. अद्यापिही तेथें कायम असलेल्या, जुम्मामशीद, **हुषंगशहा**चा मुकबरा, नीलकंठमहाल, किष्तीमहाल, चंपाबावडी, वगैरे इमारती कायम आहेत. त्या नीटपणें व आसपासच्या पडक्या इमारती लक्ष लावून पाहिल्या असतां प्राचीनकाळीं **मांडव** शहर फारच सुरेख व भरभराटींत होतें, असें दिसून येतें. तलावांतील पाणी वाहून गेल्यावर **हुषंगशहा** यानें त्यांत नवें गांव वसविलें. व यामुळेंच या प्रदेशास **ताल** हें नांव पडलें. या परगण्यांत उत्तम जातीचा गहूं पुष्कळ उत्पन्न होतो. पावसाळ्यांत या सर्व परगण्यांत अतिशय

चिखल होतो, त्यामुळें बहुतेक रस्ते व नदी नाले जाण्यायेण्यास निरुपयोगी होतात.

या बंधाऱ्याजवळ **भोजपूर** नांवाचें एक गांव आहे. तेथें एक प्राचीन व पडकेंसें मंदिर आहे. त्या मंदिरांत ३६ फूट उंच व १६॥ फूट परिघाचे ४ चार खांब एकेका दगडाचे आहेत. त्याच्या मध्यभागीं सुमारें १२ फूट उंच व ८ आठ फूट व्यासाचा एक गोल बाण आहे. या मंदिराच्या दाराच्या बाजूवर एक प्राचीन शिलालेख आहे. त्यांत हें मंदिर, विक्रमसंवत् ३६ सालीं बांधण्यास आरंभ झाला व तें शनवार, वैशाख वद्य ९ संवत् १५९ सालीं संपूर्ण झालें. व महाराज **मतानी** वंशांतील श्री **सनबापच** यानें त्या मोठ्या थोरल्या शिवलिंगाची स्थापना केली असें लिहिलें आहे. यावरून तो बंधाराही याच राजानें बांधिला असें दिसतें. खरें काय असेल तें परमेश्वरास ठाऊक.

**बरेली**—हा गांव खास आमच्या जहागिरींतील आहे. तो मैदानांत असून त्याच्या आसपासच्या जमिनींत सर्व प्रकारचीं पिकें उत्तम व विपुळ येतात. तो **भोपाळा**पासून ६६ सहासष्ट मैल आहे. त्यांत ३२१ घरें आहेत. तेथें पक्क्या रंगाचीं जाजमें व उत्तम तऱ्हेचे खारवे तयार होतात. गांवाच्या आसपास दाट आमराया आहेत. यामुळें त्याला चांगली शोभा आली आहे. येथें बागाईत मुळींच होत नाहीं.

याच परगण्यांत नर्मदा नदीच्या जवळ टेंकडीवर **बंगालवाडा** नांवाचा गांव आहे. तेथें वैशाख, कार्तिक व माघ या महिन्यांत मेळे लागतात. तेथें पुष्कळ हिंदु लोक चोहोंकडून जमतात व मेळ्यांत बाजारही चांगले भरून व्यापार चांगला चालतो. या परगण्यांत ७८ गांव आहेत. यांत उवाल नांवाचें एक गोड व मिष्ट खरबूज उत्पन्न होतें.

**पूर्वभाग** किंवा पूर्वेकडील जिल्हा यांत १२ मोठे गांव, १२ परगणे, १ मोठा किल्ला व ९४३ गांवें आहेत. यांत **दक्षिणभागा**प्रमाणेंच बहुतेक सर्व पदार्थ उत्पन्न होतात. त्यांत तमाखू अधिक व बराच

चांगला उत्पन्न होतो. जंगलांत मोठमोठीं व हिंस्त्र श्वापदें असून शिवाय जंगली कोंबडीं, तीतर, लवे, बटेर व खबूतरें हीं पुष्कळ आहेत.

**जेठरी**—हा गांव **भोपाळा**पासून ८० मैलांवर असून त्यांत १०० घरें आहेत. त्याच्या आसपास आमराया आहेत. त्याच्या पूर्व, उत्तर व पश्चिम बाजूंस चांगली व सुपीक जमीन आहे. दक्षिणेस जमीन पहाडी आहे. यांत उन्हाळू पिकें विशेष तयार होतात. गांवांत १ विहीर व तलाव आहे व बराका नांवाची नदी गांवाखालीं वाहते. येथें घोंगड्या चांगल्या तयार होतात. या परगण्यांत ४८ गांव होते ते सन १८७२ सालीं **देवडी** परगण्यांत सामील केले गेले.

**देवडी**—हा गांव **भोपाळा**पासून ९० मैलांवर **उबटगड**ची पहाडी व **रुणिया** नदी यांच्या मध्यभागीं आहे. तेथें ७३६ घरें आहेत. तेथील सरकारी कचेरी, व चौधऱ्याचा वाडा, या इमारती सुरेख आहेत. गांवाभोंवतीं आमराया आहेत व गांवाच्या आसपास पांच तलाव आहेत. त्यांत ३ तलावांत बारमहा पाणी राहतें. व दोन उन्हाळ्यांत सुकून जातात. पूर्वेस व दक्षिणेस जमीन सपाट आहे व पश्चिम व उत्तरेकडील जमीन आबाद व आबाद होण्यालायक आहे. येथें उन्हाळू पिकें बरीं होतात व ऊंसही पुष्कळ उत्पन्न होतो. तलाव गांवाच्या उत्तरेस आहेत, त्यांच्या किनाऱ्यावर पानमळे आहेत. जवळच्या टेंकडीवर प्राचीन इमारतींच्या निशाण्या आहेत. येथें आडकिते फार चांगले होतात.

**सिलवाणी**—**भोपाळा**पासून ७६ मैल आहे. गांवांत ९०० घरें व परगण्यांत १२९ गांव आहेत. येथील सरकारी कचेऱ्या व हिंदु मंदिरें पाहाण्याजोगीं आहेत. येथील जमीन उंच नीच असून जंगल अगदीं गांवाला लागलें आहे. तरी गांव व आसपासचा प्रदेश चांगला भरभराटीचा व रमणीय दिसतो. सन १८७२ त हा परगणा **भमोरी** परगण्यांत सामील केला गेला. येथें रंगाचें काम चांगलें होतें. व जाजमें,

खारवे, ओढण्या व आंबवे चांगले रंगविले जातात. तसेंच आसपासच्या खेड्यांत ताडपत्र्या व नवार चांगल्या व पुष्कळ बनतात.

**भमोरी**—भोपाळापासून ८३ मैलांवर आहे. तेथील हवा चांगली असून आसपासचा प्रदेश बराच रमणीय आहे. गांवांत २२९ घरें असून एक चांगली सरकारी कचेरी व **फरहादबख** नांवाचा सरकारी बाग आहे. नवीन बाजार, सराय, जुम्मामशीद व मोतीकुवा हीं कामें वीटचुन्याचीं पक्कीं बांधलेलीं आहेत. बाकी लोकांचीं घरें कच्चीं व कौलारू आहेत. गांवाजवळ कांहीं बाग आहेत. त्यांत केळीं, पेरू, संत्रें, लिंबें, मोसंबे, अनार व पांढरा गुलाब होतो. भाज्या पुष्कळ उत्पन्न होतात. शिवाय ऊंस, अफू, ज्वारी, कापूस, तीळ व कोद्रू हेही उत्पन्न होतात. येथील जमीन चांगली व सुपीक असून तिच्यांत हरतऱ्हेचे जिन्नस उत्पन्न होतात. या परगण्यांत ४९ गांव आहेत.

**महलपूर**—भोपाळाहून २७ मैलांवर आहे. या परगण्यांत ६९ गांव आहेत व या गांवांत १०९ घरें आहेत. तेथें एक पडकीशी गढी आहे. तिच्यांत एक विहीर आणि तहसीलदाराचें घर आहे. येथील तलावांत जळवा फार आहेत. आसपासचा प्रदेश रुक्ष व उदास दिसतो. जंगल व पहाड गांवाजवळ लागले आहेत. व जमीन हलकी आहे. सन १८७२ त हा परगणा **रायसेन** परगण्यांत सामील केला गेला.

**रायसेन**—हा गांव **भोपाळापासून** २६ मैलांवर आहे. त्या गांवांत ८०० घरें आहेत. सुभा, तहशीलदार, व ठाणेदार, यांच्या कचेऱ्या, तसेंच सय्यदांचीं घरें व पूर्वींच्या नबाबांच्या गुलामांचीं घरें व कांहीं सुखवस्तु विद्वान कायस्थ लोकांचीं घरें, चांगलीं प्रशस्त असून, पक्कीं, वीटचुन्याचीं, बांधिलेलीं आहेत. बाकीचीं घरें कच्चीं व कौलारू आहेत. येथें पुष्कळ चांगले घरंदाज मुसलमान लोक व कायस्थ व महाजन लोक आपल्या खटल्यांसुद्धां राहतात. आसपासचा प्रदेश रमणीय दिसतो. आमराया व विहिरी पुष्कळ आहेत. गांवाजवळ **रिछान नदी** आहे. ती उन्हाळ्यांत सुकते. जमीन उन्हाळू पिकाला चांगली आहे.

पिवताच्या किंवा पाणी दिलें जाणाऱ्या जमिनींत सर्व तऱ्हेच्या भाज्या व अफू उत्पन्न होते. हा गांव एका मोठ्या पहाडाच्या पायथ्याशीं आहे. पहाडावर किल्ला आहे. या परगण्यांत १०७ गांव आहेत. या गांवाबाहेर, **अजमीर**चे ख्वाजा **मोईनुद्दीन** चिष्ती यांच्या वंशांतील ह्मणविलेले पीर **फत्तेअली** साहेब यांचा दरगा आहे.

**रायसेन**चा किल्ला—हा एका उंच पहाडाच्या शिखरावर बांधलेला असून तो माळव्यांतील अत्यंत नामांकित किल्ल्यांत मोडतो. फेरिष्ता वगैरे इतिहासकारांच्या ग्रंथांत त्याच्याविषयीं उल्लेख आहे. परंतु हा किल्ला प्रथम कोणीं बांधिला याविषयींचा उल्लेख कोठें आढळत नाहीं. तो **रायरोन** नांवाच्या कोणीं रजपूत राजानें बांधिला असावा, असा आमचा अंदाज आहे. कारण **रतनसेन, भीमसेन,** वगैरे नांवें हिंदु राजे लोकांत आढळतात. हा किल्ला सुमारें ४०० वर्षांवर मुसलमानांच्या कबज्यांत असावा. कारण किल्ल्यांत **घनीम उल्मुल्ख** याच्या मदरशांत एक शिलालेख आहे त्यांत ८९० हिजरी साल दिलें आहे तेव्हांपासून आजवर ३९८ वर्षें झालीं. तो किल्ला हिंदु लोकांनीं पुनः मुसलमानांकडून कांहीं दिवस घेतला असावा व सुमारें ३९० वर्षांपूर्वीं मुसलमानांनीं तो पुनः त्यांच्याकडून घेतला असावा, असें **महंमद कासीम** फेरिष्ता याच्या ग्रंथावरून दिसतें. **फेरिष्त्यानें** या किल्ल्याविषयीं हकीकत दिली आहे तिचा सारांश येणेंप्रमाणें. सन ९३८ हिजरी सालीं **गुजराथ**चा राजा सुलतान **बहादूर** याला असें वर्तमान कळलें कीं, **चितोर**च्या राण्याचा जांवई **शिलादित्य** परिहार (सलादी पुरबिया) **रायसेन** येथील राजा व यानें पुष्कळ मुसलमान लोकांच्या बायका जबरदस्तीनें धरून नेल्या. यावरून त्याला शासन करून त्या काफराच्या हातून मुसलमानाच्या बायका सोडविणें अवश्य आहे असें त्या राजाला वाटलें. तो त्या सालच्या जमादिलावल महिन्याच्या २९ व्या तारखेस **मांडवा**जवळ **जाफराबादनालचा** येथें तळ देऊन येऊन राहिला होता. व **शिलादित्या**चा पुत्र **मूपत भोपट** हा तेथेंच त्याच्या लष्करांत होता. **भोपट** यानें आपल्यास

परवानगी मिळेल तर **उज्जनीस** बापाजवळ जाऊन त्याला बादशहाच्या सेवेंत आणून हजर करितों, अशी बादशहाजवळ विनंति केली. त्याप्रमाणें त्याला परवानगी मिळाली, व तो **उज्जनीस** गेला. **शिलादित्यानें भोपट** यास **उज्जेन** येथें ठेविलें व तो स्वतः बादशहाकडे हजर झाला. बादशहानें त्याला कैद करून **धारच्या** किल्ल्यांत ठेविलें व आपला सरदार **अमाद उल्मलिक** याला **भोपट** यास **उज्जनीहून** हांकून देण्याकरितां **उज्जनीवर** पाठविलें व तो स्वतः आपल्या फौजेनिशीं **भेलसा** येथें जाऊन तळ देऊन राहिला. तेथें त्याला वर्तमान कळलें कीं, बादशहानें आपल्या बापास कैदेंत टाकून **अमाद उल्मलिक** यास आपल्यावर पाठविल्याचें **भोपट** यानें ऐकून, तो **चितोरच्या** राण्याकडे सहाय्य मागण्याकरितां निघून गेला आहे, व **शिलादित्याचा** भाऊ **लक्ष्मण** हा **रायसेनच्या** किल्ल्यांतून लढाईची तयारी करीत आहे. हें ऐकून बादशहा **भेलशाहून रायसेन** येथें गेला. तेथें त्याची सर्व फौज येऊन पोंचण्यापूर्वीं रजपूत लोकांनीं एकदम किल्ल्यांतून बाहेर पडून त्यांच्यावर हल्ला केला. तो हल्ला मागें हटविण्यांत सुलतान **बहादूर** यानें मोठें शौर्य गाजविलें. व आपल्या तरवारीच्या एका सपाट्यासरसे त्यानें २१३ रजपूत ठार मारिले. इतक्यांत बादशहाची फौजही येऊन समरांगणीं दाखल झाली. व तिनें पुष्कळ रजपूत लोक मारले. तेव्हां बाकीचे रजपूत लोक किल्ल्यांत पळून गेले. पुढें बादशहानें त्या किल्ल्याला वेढा घातला. बादशहाच्या तोफखान्याचा सरदार **एफेंडी रुमीखान** तुर्क यानें तोफांच्या माऱ्यानें किल्ल्याचे दोन बुरूज व बरेच गज लांब तटाचा भाग पाडून टाकिला. ही गोष्ट ऐकून **शिलादित्यानें धारेहून** बादशहाकडे सांगून पाठविलें कीं, मीं मुसलमानी धर्माचा स्वीकार केला आहे. व **रायसेनचा** किल्ला आपल्यास नजर केला आहे. त्यावर बादशहानें त्याला आपल्याजवळ बोलावून घेतलें. तेथें तो मुसलमान झाला व बादशहाबरोबर किल्ल्याच्या दरवाजावर जाऊन त्यानें आपल्या भावास बोलावून सांगितलें कीं, मी मुसलमान झालों आहें, बादशहा कृपाळू होऊन मला

मोठा मनसब देणार आहे. याकरितां आतां आपण किल्ला बादशहाच्या स्वाधीन करून त्याचे ताबेदार झालें पाहिजे. तेव्हां **लक्ष्मणानें** त्यास गुप्तपणें सांगून पाठविलें कीं, **भोपट** हा **चितोर**च्या राण्याकडून ४०००० चाळीस हजार फौज घेऊन किल्ल्याचा वेढा उठविण्याकरितां जलदीनें येत आहे याकरितां कांहीं थोडी दिवसगत सांपडेल अशी तजवीज करावी. **शिलादित्यानें** किल्ला दुसरे दिवशीं दोनप्रहरांनंतर खालीं होईल असें सांगितलें; ती गोष्ट बादशहानें मंजूर केली. व दुसरे दिवशीं नेमल्यावेळीं बादशहानें **शिलादित्यास** दुसरे विश्वासू सरदार बरोबर देऊन पाठविलें. **शिलादित्यावर** बादशहाचा विश्वास होता. तो किल्ल्यावर पडलेल्या बुरुजापुढें जाऊन मोठ्यानें ओरडून ह्मणाला, 'हे मूर्ख व आळशी रजपूत लोकहो, आतां संभाळा. सुलतान **बहादूर** याच मार्गानें आंत येऊन तुमचा फडशा पाडणार आहे.' असें बोलण्यांत त्याचा हेतु आंतल्या लोकांनीं तो पडलेला भाग ताबडतोब दुरुस्त करावा असा होता. **लक्ष्मण** हें भाषण ऐकून त्याचा अर्थ समजून स्वस्थ राहिला व **शिलादित्य** बादशहाच्या फौजेंत परत आला. **लक्ष्मणानें** किल्ल्याच्या दुरुस्तीचें काम सपाट्यानें चालविलें. व **शिलादित्या**च्या धाकट्या पुत्राबरोबर दोन हजार रजपूत देऊन रातोरात **भोपट** यास आणण्याकरितां गुप्तपणें पाठविलें. परंतु बादशहाची फौज सावध होती. तिनें या लोकांवर मोठ्या शौर्यानें हल्ला करून पुष्कळ रजपूत लोक मारिले व **शिलादित्या**च्या पुत्राचें डोकें कापून बादशहास नजर केलें. त्यानें ताबडतोब **शिलादित्यास** धरून **मांडव**च्या किल्ल्यांत नेऊन कैदेंत ठेवण्याकरितां **बुऱ्हाणउल्मलिक** नांवाच्या आपल्या सरदाराच्या स्वाधीन केलें. हेरांनीं **राणा** व **भोपट** हळू हळू **चितोराहून** येत असल्याची बातमी आणली. तेव्हां बादशहानें **बऱ्हाणपूर**चा सुभेदार **भीरण महंमदशहा** फारुकी व **अमाद उल्मलिक** यांस त्यांच्यावर पाठविलें. या दोघांनीं कांहीं मजला गेल्यावर बादशहास सांगून पाठविलें कीं, '**शिलादित्या**चा दुसरा मुलगा **पूरणमल्ल** हा जाऊन **राण्यास** मिळाला आहे. व **राणा** फार मोठ्या फौ-

जेनिशीं जवळच आला आहे.' त्यावर बादशहा आपल्या बरोबर फौजेंतील सर्व स्वार घेऊन सपाट्यानें निघाला तो अहोरात्रांत १४० मैल दवडून जाऊन आपल्या सरदारांस मिळाला. हें वर्तमान ऐकून **चितोरचा राणा** नाउमेद होऊन **चितोरास** परत गेला. व बादशहानें पुनः येऊन किल्ल्यास मोठ्या नेटानें वेढा घातला. या सालच्या रमजान महिन्याच्या अखेरीस **राण्या**पासून सहाय्य मिळण्याची आशा नाहीं, असें पाहून **लक्ष्मणा**नें बादशहाकडे **शिलादित्यास** समक्ष आणवून त्याच्या अपराधाची क्षमा कराल तर मी किल्ला आपल्या स्वाधीन करितों, असा बादशहाकडे निरोप पाठविला. तेव्हां बादशहानें **शिलादित्याला मांडवाहून** बोलावून आणविलें व त्याला क्षमा केली. तेव्हां **लक्ष्मणा**नें सर्व रजपूत लोक बायकांमुलांसुद्धां किल्ल्याबाहेर काढिले व बादशहास सांगून पाठविलें कीं, **शिलादित्या**च्या महालांत राजघराण्यांतील पुष्कळशा स्त्रिया आहेत. व **भोपटा**ची आई **राणी दुर्गावती** इचें ह्मणणें, '**शिलादित्यास** एकवार किल्ल्यांत पाठवून आह्मांस येथून घेऊन जावें असें आहे.' बादशहानें **शिलादित्यास मलिक अलीशेर** याच्या बरोबर किल्ल्यांत पाठविलें. राणीनें **शिलादित्यास** ह्मटलें कीं, 'आपण आजवर जन्मभर येथें राजाप्रमाणें राहिलों आहों. तेव्हां आतां तुह्मीं आह्मां सर्व बायकांस मारून जाळून टाकावें. व स्वतः धारातीर्थीं मरण पावावें.' त्यावरून **शिलादित्यानें राणी दुर्गावती** व दुसऱ्या सातशें सुंदर व सुकुमार स्त्रिया वाड्यांत होत्या त्यांना ठार मारून वाड्यास अग्नि दिला. नंतर तो, **लक्ष्मण** व दुसरे १०० जवळचे आप्त रजपूत बरोबर घेऊन जिवावर उदार होऊन वाड्यांतून बाहेर पडला. व त्यानें **अलीशेर** याच्याबरोबर आलेल्या मुसलमानी फौजेच्या टोळीवर हल्ला केला. उभयतांचें बरेंच युद्ध झालें. इतक्यांत खालीं फौजेंत हें वर्तमान कळून सर्व फौज किल्ल्यावर धांवत आली. व तिनें सर्व रजपूत लोकांस ठार मारून टाकिलें. **रायसेन**चा किल्ला हल्लीं आह्मीं समक्ष जाऊन पाहिला आहे. त्याची स्थिति पुढें लिहिल्याप्रमाणें आहेः—त्या किल्ल्याला ८ मोठे

व १ लहान असे नऊ दरवाजे आहेत. त्यांत ३ उत्तरेस, ३ पश्चिमेस व २ दक्षिणेस आहेत; व नववी खिडकी आहे ती पश्चिमेस आहे. किल्ल्याचा तट भक्कम पक्क्या दगडांचा आहे, त्याला ३ पूर्वेस, ५ उत्तरेस, ३ पश्चिमेस असे अकरा बुरूज आहेत. त्याच्या आंत पांसष्ट इमारती आहेत. त्यांत पंचवीस पडक्या व चाळीस कायम आहेत. तेथें एक सुंदर मशीद आहे. तिच्या मधल्या कमानीवर अरबी लिपींत एक फारसी कविता लिहिली आहे. तसेंच तेथें **घनीम उल्मुल्क** यानें बांधलेला एक प्रशस्त व पक्का मदरसा आहे. त्यांत एक शिलालेख आहे. तसेंच तेथें तीन महाल आहेत त्यांना तेथील लोक अत्तरदार्स महाल, बादल महाल, व राजरोहाणी महाल, असें ह्मणतात. त्यांत चार टांकीं आहेत. त्यांना दुरा, दुरी, मादगा व सागर असें ह्मणतात. तेथें अठ्ठेचाळीस विहिरी आहेत, त्यांपैकीं, कांहींच्या भिंतींवर दोन तीन हिंदी व दोन तीन फारसी, असे शिलालेख आहेत. उत्तरेकडील एका दरवाज्यावर एक शिलालेख आहे. त्यांत **रायसेन** येथील किल्ल्याच्या तटाची व इमारतीची दुरुस्ती, **आलमगीर औरंगजेब** बादशहा गाजी याच्या कारकिर्दीत ख्वाजा **याकूत हारस, शेखभारुद्दीन, महंमद अमीन,** हाजी **महंमद अश्राफ** व **अनूपराय** तहसीलदार यांच्या देखरेखीखालीं **मनसूर** किल्लेदार **महम्मद आदिलखान** दौरान नायब असतांना, त्या बादशहाच्या कारकिर्दीच्या ३५ व्या वर्षाच्या रबिलाखर महिन्याच्या पहिल्या तारखेपासून ३८ व्या वर्षाच्या षाबान महिन्याच्या १९ व्या तारखेपर्यंत करविली गेली. असें लिहिलें आहे.

या पहाडावर सिताफळें चांगलीं, मोठीं, व मधुर, अशीं आपोआप उत्पन्न होतात. व तेथील तलावांत शिंगाडे फार चांगले होतात. येथें मधही फार सस्ता ह्मणजे एका रुपयास चार शेरांपासून आठ शेरांपर्यंत मिळतो.

**दिवाणगंज**–भोपाळापासून बारा मैलांवर आहे. तेथें ११४ घरें आहेत. या परगण्यांत ५९ गांवें आहेत. यालाच **गुलगांवा** परगणा अ-

सेंही ह्मणतात. यांतील कांहीं गांव खुदसिया बेगम साहेब यांना जहागीर आहेत. येथील ठाणें व तहशील हीं सरकारी आहेत. याच्या उत्तरेस व दक्षिणेस पहाडी प्रदेश आहे, परंतु पश्चिमेकडील जमीन आबाद आहे. येथें शाळू व उन्हाळू दोन्ही पिकें चांगलीं होतात. सन १८७३ सालीं हा परगणा **उमरावगंज** परगण्यांत सामील केला गेला.

**उमरावगंज**—याचें मूळचें नांव **रामगड** असें होतें. हा परगणा पूर्वी नबाब **मुनीर महमदखान** यांस जहागीर होता. ते मरण पावल्यावर तो परत सरकारांत आला. नंतर आमच्या मातोश्रींनीं तो पुन्हा नबाब **उमरादूला** यांस जहागीर दिला. त्यांनीं त्याचें नांव **उमरावगंज** असें ठेविलें. तो ८० घरांचा लहानसा गांव असून **भोपाळाहून** चौदा मैलांवर आहे. **अजनाल** नदी त्याच्या खालून वाहते. त्याच्या उत्तरेकडील व पूर्वेकडील बहुतेक जमीन आबाद आहे. येथें शाळू पिकें विशेष चांगलीं होतात. या परगण्यांत ८९ गांव आहेत.

**सेंवास—भोपाळाहून** चौसष्ट मैलांवर आहे. गांवांत १२०० घरें आहेत. या परगण्यांत १७९ गांवें आहेत. याच्या उत्तरेकडील जमीन बरीच सपाट आहे. व दक्षिणेकडे आणि पूर्वेकडे आमराया आहेत. दक्षिणेकडेही बरीच आबादी आहे. याच्या पश्चिमेस **बीना** नदी आहे. येथें शाळू व उन्हाळू दोन्ही पिकें होतात. येथील जुन्या इमारतींत किल्ल्याचें काम चांगलें आहे. तो किल्ला चौकोर असून त्याच्या चारी कोपऱ्यांस चार बुरूज आहेत. ते व सर्व तट आणि मधील दरवाजा पक्का वीटचुन्याचा बांधला आहे. दरवाजा तिमजली आहे व याच्या सभोंवार दुसरा एक कच्चा कोट आहे. त्याच्या आंत दोन विटांनीं बांधलेल्या विहिरी आहेत. परंतु आंतील इमारती कायम नाहींत. किल्लेदार, ठाणेदार, व तहशीलदार राहण्याच्या नवीन बांधलेल्या सरकारी जागा बऱ्या आहेत. बाहेरील कच्चा कोट जागजागीं पडला आहे. खंदक दोन बाजूंस पक्का आहे. या किल्ल्याला दोन दरवाजे आहेत. त्यांतून एक पडला आहे. दुसरा कायम आहे. त्यावर एक अरबी लिपींत शिलालेख आहे. त्याचीं अक्षरें

झिजून गेल्यामुळें तीं वाचतां येत नाहींत. या गांवाच्या आसपास एकाहत्तर विहिरी, बारा मंदिरें व सोळा आमराया आहेत.

**घैराटगंज—भोपाळा**पासून सात मैलांवर आहे. याच्या दक्षिण, पूर्व व उत्तरेकडील जमीन आबाद आहे. याच्या पश्चिमेकडून **बीना** नदी वाहते. येथें शाळू पिकें बरीं होतात. या परगण्यांत सहासष्ट गांव आहेत. त्यांतील **मलारमढी**या नांवाच्या गांवांत लोखंडाच्या खाणी आहेत. या गांवांत २९९ घरें आहेत व त्याच्या आसपास सहा विहिरी व सात आमराया आहेत.

**अंबापाणी—भोपाळा**हून चाळीस मैलांवर आहे. गांव मध्यम प्रतीचा असून तेथें २९६ घरें आहेत. या परगण्यांत सत्यांयशीं गांव आहेत. त्यांतील **झामर** नांवाच्या गांवांत लोखंडाच्या खाणी आहेत. गांवच्या आसपास जंगल आहे. पूर्वी येथील किल्ला चांगला मजबूत होता; परंतु सन १८९८ सालच्या बंडांत तेथील जहागीरदार **फाजील महंमदखान** आणि **आदिल महम्मदखान** बिन **वाजीद महम्मदखान** बिन **सरफराज महम्मदखान** यांनीं बंड केल्यामुळें आमच्या मातोश्रींनीं तो किल्ला पाडून टाकला.

**पीखलोण**—हा गांव मैदानांत असून तेथें १९७ घरें आहेत. या परगण्यांत सारे दहा गांव आहेत. आसपासचा प्रदेश रमणीय आहे. व चारी दिशांकडील जमीन बरीच सपाट असून आबाद आहे. येथें दोन्ही तऱ्हेचीं पिकें होतात.

**पश्चिमभाग** किंवा **पश्चिमजिल्हा**—यांत दहा जुने परगणे, दहा मोठे गांव, व ९७७ गांवें आहेत. येथील उत्पन्न होणारे जिन्नस दोन्ही भागांपेक्षां विशेष व अधिक असून, त्यांत अफू, ऊंस, मूग, फळी, ज्वारी, राई, बाजरी, खाण्याची तमाखू वगैरे जिन्नस मुख्य आहेत. या परगण्यांत इमारती लांकूड होत नाहीं. जळाऊ लांकूड आणि जंगली खजूरीचीं व आंब्याचीं झाडें बरींच आहेत.

**सनगाह**—हा गांव **भोपाळा**पासून बारा मैलांवर आहे. तेथें ११७

घरें आहेत. या परगण्याला सरकारी कागदोपत्रीं **दिलोद**परगणा ह्मणतात. त्यांत चवेचाळीस गांव आहेत. तो परगणा लहान असल्यामुळें सन १८७२ त **देवीपुरा** परगण्यांत सामील केला गेला. यांतील जमीन बरीच सपाट आहे व याच्या पश्चिमेकडील व उत्तरेकडील जमीन चांगली आबाद आहे.

**देवीपुरा.—भोपाळाहून** बावीस मैल आहे. गांव साधारण असून तेथें १२२ घरें आहेत. येथील तहशीलदार व ठाणेदार यांचीं घरें आणि सुखवस्तु लोकांचीं तीन घरें चांगलीं आहेत. गांवाजवळ तीन आमराया आहेत. आसपासचा प्रदेश बरा आहे. या परगण्यांत बासष्ट गांवें आहेत.

**नाजिराबाद** आणि **भेरसिया.**—हा परगणा प्रथम **भोपाळ**च्या राज्यांत सामील झाला तेव्हां त्याच्यांत २९६ गांवें होतीं, यामुळें आमच्या मातोश्रींनीं त्याचे दोन परगणे करून एकाचें नांव **भेरसिया** कायम ठेविलें व दुसऱ्याचें नांव **नाजिराबाद** असें ठेविलें. **नाजिराबाद** हें एक लहानसें २८ घरांचें खेडें आहे. ही व्यवस्था आह्मांस सोईची न वाटल्यानें आह्मीं हे दोन्ही परगणे पुनः एकत्र केले. **भेरसिया** हा गांव बराच मोठा असून त्यांत ७२७ घरें आहेत. व तेथें हिंदु व मुसलमान व्यापारी, सावकार व शेतकरी लोकांची वस्ती आहे. येथील काजीला **दिल्ली**च्या बादशहापासून जहागीर मिळाली आहे. या गांवाबाहेर मशीदीपुढील चौकांत आमच्या घराण्याचे मूळपुरुष **नूरमहंमदखान** यांची कबर आहे. ही मशीद सन ११२७ हिजरी सालीं फरुखशेर बादशहाच्या कारकिर्दींत **दोस्तमहम्मदखान** यानें बांधिली, असा तिच्या दरवाज्यावर शिलालेख आहे.

**शमूसगड.**—हा गांव अगदीं मोडकळीस आला असून त्यांत ४९ घरें आहेत. तो **भोपाळापासून** दहा मैलांवर आहे. त्याच्याजवळ **कीरवान** नदी आहे. तिच्या किनाऱ्यावर भात होतें. गांवाजवळ एक आमराई आहे. गांवाच्या उत्तरेस व पश्चिमेस जमीन सपाट आणि चांगली आबाद आहे. त्याच्या आसपास जंगल आहे. त्याच्या दक्षिणेस एक

तलाव आहे, त्याचें पाणी उन्हाळ्यांत आटतें. त्याच्याजवळ बरींचशीं पडकीं बौद्ध मंदिरें आहेत. या परगण्यांतील गांव चांगले आहेत. हा परगणा हल्लीं **शिहोर** परगण्यांत सामील झाला आहे.

**शिहोर.**—**भोपाळा**पासून वीस मैलांवर आहे. गांवांत १९४२ घरें आहेत. या परगण्यांत ११६ गांव आहेत. या गांवांत पुष्कळ चांगलीं चांगलीं घरें आहेत व बनिये लोकांचीं दुकानें चांगलीं आहेत. याच्या आसपास माफीदारांचे पुष्कळ बाग आहेत. व गांवाजवळ एक जिवंत नदी आहे. येथें एक लहानशी गढीसारखी जागा आहे, त्यांत चांगल्या व पक्क्या सरकारी इमारती आहेत. त्यांत वकील, तहशीलदार, व ठाणेदार यांच्या कचेऱ्या आहेत. किल्ल्याच्या पश्चिमेस तटाखालीं १ जुनी मशीद होती. तिच्या दरवाज्यावर सालसी लिपींत पुढील अर्थाचा शिलालेख लिहिला होता.

मलीक **मगीसुद्दीन** याचें वैभव व मोठेपणा स्वर्गाप्रमाणें आहे, तो भरभराटीचा जणूं सूर्यच, खरा धर्मात्मा, अप्रतिम योद्धा, मोठा राज्यकर्ता, धर्म व राज्यसंरक्षक, राजेलोकांत **खुषरू**प्रमाणें, युद्धांत **रुस्तमा**प्रमाणें, व विद्येंत व ज्ञानांत **असफ** आणि **खिज्र** यांच्याप्रमाणें असा होता. तो परमेश्वराच्या आज्ञा उत्तम प्रकारें पाळून त्याच्या भक्तांचें सहाय्य करितो. या मशीदीचा पाया भरला गेला तो दिवस मोठा सुदिन होता. ही मशीद स्वर्गासही शोभा देणारी अशी आहे. २।१ हें त्रिभुवन व त्रिकाल उत्पन्न करणाऱ्या परमेश्वराच्या कृपेनें तिचें काम सन ७३२ हिजरी सालीं, पूर्ण झालें.

आमच्या मातोश्रीच्या कारकिर्दींत ही मशीद पूर्वींच्याच जागीं पक्क्या दगडांची नवीन बांधविली गेली. तें काम मदारुल्महाम् **जमाल उद्दीनखान** यांच्या देखरेखीखालीं होतें. त्या मशीदीच्या दरवाज्यावर संगमरवरी दगडांत काळ्या दगडाच्या नस्तालीक अक्षरांनीं एक लेख लिहून बसविला होता.

ही मशीद फार प्राचीन व पडकी अशी होती. ती धार्मिक लोकांच्या

उपयोगाकरितां पुनः बांधली गेली. ती मशीद प्रथम मलीक **मगी सुद्दीन** यानें सन ७३२ हिजरींत बांधली होती. नवाब **शिकंदर बेगम** भोपाळच्या गादीवर बसल्या तेव्हां त्यांनीं ती नवीन बांधली. तिचें काम पुरें झाल्याची तारीख 'फिदाग' या शब्दावरून निघते.

या गांवाजवळ इंग्रजी छावणी आहे. तेथील वस्ती गांवापेक्षां अधीक आहे. तेथील भरभराटी पाहून कोणालाही आनंद होईल. तेथें पोलिटिकल एजंट यांची राहण्याची जागा व कर्नल **आसबोर्न**साहेब पोलिटिकल एजंट यांनीं बांधलेलें चर्च, व क्याप्टन **कनिंगह्याम** पोलिटिकल एजंट यांणीं नदीच्या तीरावर बांधलेला मदरसा, या इमारती प्रशस्त, सुंदर व पक्या दगडांच्या आहेत. तसेंच आमच्या राहण्याकरितांही येथें एक इमारत बांधली आहे. येथें उत्तमतऱ्हेचीं पागोटीं एका रुपयापासून वीस रुपयेपर्यंत किमतीचीं व जरीचे कांठ व पदर असलेले दुपट्टे तयार होतात.

**दुराहा—भोपाळा**पासून अठरा मैलांवर आहे. तेथें ४०४ घरें आहेत. आसपास पुष्कळ आमराया आहेत. हा परगणा साधारण आहे. येथें सुभ्याची कचेरी व चौधऱ्याचें घर या इमारती साधारण आहेत. गांवच्या उत्तरबाजूशिवाय चारी बाजूस जमीन चांगली आबाद आहे. गांवांत सदतीस विहिरी व चार तलाव आहेत.

**आष्टा**—हा गांव व किल्ला, **पार्वती** नदीच्या किनाऱ्यावर एका उंचवट्यावर बांधला आहे. दक्षिणेस व पश्चिमेस जमीन उंच सखल आहे व बाकीच्या बाजूंस चांगली सपाट आहे. याच्या आसपास माफीदाराचे पुष्कळ बाग आहेत. येथील सावकार चांगले सधन आहेत. येथें अफूचा व्यापार बराच चालतो. या गांवांत २९१३ घरें, सत्तावीस विहिरी व तीन मंदिरें आहेत. **नजरगंजां**त एक पक्की वीट चुन्याची मशीद आहे. किल्ला विशेष ह्मणण्यासारखा नाहीं. या परगण्यांत १३७ गांवें आहेत. त्यांत कांहीं चांगले मोठे व आबाद आहेत. त्यांत **मनिया** येथें आंब्याचीं व जांबाचीं झाडें पुष्कळ आहेत. या परगण्याच्या जमि-

नींत शाळू व उन्हाळू पिकें होतात. येथील जमिनी १०।५ वर्षें पिकें घेतल्यानंतर २।४ वर्षें पड टाकाव्या लागतात. **जामनेर** हा बराच मोठा गांव याच परगण्यांत आहे. तेथें पुष्कळ कोष्टी लोक राहतात. उत्तम तऱ्हेच्या पगड्या, कंबरबंद व चांगलें सुती कापड येथें तयार होतें. यांच्या पूर्वपश्चिम व उत्तरभागांत अफू, ऊंस, कापूस, ज्वारी, गहूं पुष्कळ उत्पन्न होतो. व दक्षिणभागांत गहूं व ज्वारी उत्पन्न होते. जवळच एक मोठी झील किंवा दलदल आहे तेथें उत्तम तांदूळ पिकतो. या परगण्यांत पुष्कळ जातींचे तांदूळ उत्पन्न होतात. त्यांत राणीकाजल व रायभोग हे तांदूळ फार उत्तम व सुवासिक आहेत.

**जावर—भोपाळा**पासून साठ मैलांवर आहे. तेथें ५९४ घरें आहेत. व या परगण्यांत १६२ गांव आहेत.

**इच्छावर—भोपाळा**पासून ३१ मैलांवर आहे. गांवांत वस्ती पुष्कळ आहे व आसपासचा प्रदेश रमणीय आहे. सरकारी इमारती पक्या असून किल्ल्याच्या आंत आहेत. लोकांचीं घरें बरींच सुरेख आहेत. येथें सरकारी दोन व इतर लोकांच्या पुष्कळशा बागा आहेत. त्यांत गुलाब व निरनिराळ्या जातींचीं फळें उत्पन्न होतात. जमीन सपाट असून आबाद आहे. त्यांत उन्हाळू पिकें अधिक चांगलीं येतात. गांवांत ८९४ घरें आहेत. या परगण्यांत अडतीस गांव आहेत.

तिन्ही भागांत मिळून ३० मोठाले गांव, व २९३४ गांवें आहेत. त्याशिवाय, नवाब **खुदसिया** बेगम यांच्या जहागिरींत **चैनपूरवाडी,** आणि **इसलामनगर** हे दोन मोठे गांव व ८१६॥ लहान गांव आहेत. ते तहांहयात त्यांच्याचकडे चालावयाचे आहेत. ते यांत धरले नाहींत.

**भोपाळ**संस्थानांत अतिशय सुरेख, प्राचीन व पाहण्याजोग्या इमारती ह्मटल्या ह्मणजे **सांची कान्हाखेडा** येथें आहेत. हें लहानसें गांव **भोपाळ**च्या ईशान्येस वीस मैलांवर, एका लहानशा टेंकडीवर, **ग्वाल्हेर** व **भोपाळ**संस्थानाच्या सरहद्दीपासून जवळच व **भेलशा**पासून ६ मैलांवर आहे. या अर्धचंद्राकार टेंकडीवर दोन प्राचीन गोल व मोठे

असे दगडी स्थूप आहेत. त्यांतील एक फारच मोठा आहे. याशिवाय दुसरे पुष्कळसे पडके स्थूप आहेत. मोठ्या स्थूपासभोंवतीं पक्या दगडांचा खोदींव कठडा जागजागीं थोडासा पडलेला असून त्या कठड्यांत चार दरवाजे आहेत. या कठड्यांतील प्रत्येक दगडांवर लहान लहान संस्कृत शिलालेख आहेत. या दरवाज्याच्या दोन्ही बाजूंच्या दगडांवर व वरच्या दारावर तीन्ही बाजूंस निरनिराळ्या तऱ्हेच्या पशुपक्ष्यांच्या व मनुष्यांच्या मूर्ती कोरलेल्या आहेत. यांतून कांहीं दगड व दासे खालीं पडलेले आहेत. याच्याजवळच एक पडकीशी इमारत व दुसऱ्या जुन्या इमारतींच्या पायांच्या निशाण्या आहेत. अगदीं अशाच तऱ्हेचे पडकेसे स्थूप **सांदीर** गांवापासून सहा मैलांवर **सुनारी** येथें व **सुनारी**पासून तीन मैलांवर **सात धार** येथें व **भोपाळा**च्या दक्षिणेस **भोजपूर** येथें व **भोजपुरा**पासून पांच मैलांवर **आंधेर** येथें आहेत.

या पडक्या इमारतींचें युरोपियन लोकांस फार कौतुक वाटतें व त्यांविषयीं ते आस्थापूर्वक शोध करितात असें वाटतें. **भोपाळ** येथील पूर्वीचे पोलिटिकल एजंट क्यापूटन, जे. **कनिंगह्याम** यांचे बंधू मेजर **अलेक्झांडर कनिंगह्याम,** हे ह्या जागीं बरेच आठवडे राहिले होते. व त्यांनीं या सर्व पडक्या इमारतींचा चांगला शोध केला. त्यांनीं सर्व इमारतींचे नकाशे काढले, शिळालेख वाचले, व उतरून घेतले, व या घुमटांच्या आंत जाण्यास रस्ते खोदविले. या सर्व गोष्टींविषयीं त्यांनीं इंग्रजींत एक मोठा ग्रंथ लिहिला आहे. सांची या हिंदी शब्दाचा अर्थ शांति असा आहे. या घुमटाला स्थूप किंवा टोप ह्मणतात. यांतील मोठ्या स्थूपाचा व्यास १०६ फूट व उंची ४२ फूट आहे. हा ज्या चौथऱ्यावर बांधला आहे त्याची उंची २॥ फूट आहे. व त्याच्यावरील खुरसी ९॥ फूट उंच असून तिच्यावर १४ फूट उंचीचा दुसरा एक गोल चौथरा आहे. हा स्थूप २०० फूट लांब व १९० फूट रुंद अशा एका चौकांत पहाडीच्या पठारावर बांधला आहे. दगडी कठडा व दरवाजे यांतील दगडांचे सांधे सुतारकामाप्रमाणें खोदून अगदीं साफ बस-

विले आसेत. ही इमारत सुमारें २९०० वर्षांपूर्वीची आहे. त्यावेळीं सर्व **हिंदुस्थानांत** बौद्धधर्म प्रवृत्त होता. हल्लीं तो धर्म **चीन, नेपाळ, तिबेट, आवा, सिलोन, सयाम** व **जपान** येथें चालू आहे. हे स्थूप बौद्ध तीर्थंनूकाराचीं मंदिरें आहेत. मेजर **कनिंगह्याम** यांनीं **सांची** येथील व दुसऱ्या एका ठिकाणचे स्थूप खोदून त्यांतून दगडी पेट्या काढिल्या. त्यांत मेलेल्या माणसांचीं हाडें, व रक्षा होती. त्या पेट्यांवर व आंतील डब्यांवर नांवें खोदलेलीं होतीं. तसेंच त्यांनीं असा शोध लावला आहे कीं, या पहाडीजवळ **भेलशा**पासून दोन मैलांवर प्राचीनकाळीं एक मोठें थोरलें शहर होतें. त्याचें नांव **वैसानगर** होतें असें वाटतें. हुबेहुबपणा व सौंदर्य आणि प्रमाणशीरपणा या संबंधांत **सांची** येथील मूर्तींचें खोदींव काम अलीकडील कारागिरांच्या कामापेक्षां फारच उत्तम आहे, असें या साहेबांचें मत आहे. येथें खोदींव दगडांचे सिंह आहेत त्यांचे पाय मागील भाग हल्लीं शाबूत आहेत. ते इतके सुरेख आहेत कीं, ते **ग्रीस** देशांतील उत्तमोत्तम कामाची बरोबरी करतात. त्यांचे पुढील पाय व मागील थोडासा उचललेला पाय यांचें काम, व सिंहाचें एकंदर स्वरूप व आविर्भाव फारच सुरेख दाखविलेला आहे. या इमारती **उज्जन**चा राजा **अशोक** याच्या काळच्या असाव्या, असें त्यांचें मत आहे. तापसी, पूजा करणारे लोक, राजा व त्याचे दरबार, वगैरे देखाव्यांचें त्यांनीं तपशिलवार वर्णन केलें आहे; तें येथें देण्यास सवड नाहीं. एकंदरींत या जुन्या इमारतींविषयीं युरोपियन लोकांस इतकें कांहीं कौतुक वाटतें कीं, एकानें त्यांचा नमुना करून **विलायतेस लंदन** येथें ठेवण्याकरितां नेला आहे. दुसऱ्या एका शोधक साहेबानें याविषयीं असें लिहिलें आहे कीं, सुमारें तीनहजार वर्षांपूर्वीं या टेंकडीखालीं एक **संदकनगर** नांवाचें मोठें शहर होतें. व **सांची** येथील मोठा स्थूप **बुद्धाच्या** पट्टशिष्यांपैकीं आर्य **परसन** नांवाच्या एका शिष्याचें मंदिर होतें.

---

# भाग सातवा.

## भोपाळ शहराची हकीकत.

हें शहर **हिंदुस्थान** देशांतील **माळवा** प्रांतांत २३ अक्षांश व १११ रेखांश यांवर आहे. तें एका लहानशा पहाडीवर वसलें आहे. **धारा**नगरीचा राजा **भोज** यानें येथें जवळ जवळ असलेल्या दोन टें-कड्यांच्या मध्यें एक मोठा थोरला बंद बांधून तलाव निर्माण केला अशी दंतकथा आहे. या बंधावर किंवा पाळीवर त्यानें एक किल्ला बांधिला. व त्याचें नांव **भोजपाल** असें ठेविलें. हिंदीभाषेंत बंधाऱ्याला पाळ ह्मणतात. यांतील ज हें अक्षर उच्चार करण्यास त्रासदायक असल्यानें तें हळू हळू गळून जाऊन **भोपाळ** हा **भोजपाळ** याचा अपभ्रंश झाला. पुढें राजा ( उद्रादत्त ) किंवा **उदयादित्य** याची राणी **शाल्मली** इनें या किल्ल्याजवळ एक मोठें थोरलें दगडी मंदिर बांधलें. त्याला तिनें **सभामंडप** असें नांव दिलें. या मंदिराचें काम संवत् १२०८ सालीं सुरू झालें. व तें सोमवार कार्तिक वद्य ३ संवत् १२४१ सालीं पुरें झालें. तसेंच त्या राजानें व राणीनें त्या मंदिरांत ९०० ब्राह्मणांनीं भजनपूजन व वेदशास्त्रपुराण इत्यादिकांचें अध्ययन व अध्यापन करीत राहण्याविषयींचा बंदोबस्त करून दिला होता. या गोष्टी त्या मंदिरांत एक शिलालेख होता त्यावरून कळतात. वेद हे **व्यास** ऋषीनें लिहिलेले चार ग्रंथ आहेत, त्यांचीं नांवें सामवेद, अथर्वणवेद, ऋग्वेद, यजुर्वेद अशीं आहेत. तसेंच षट्शास्त्रें ह्मणजे व्याकरण, धर्मशास्त्र, न्याय, ज्योतिष, वेदांत, व वैद्यक तसेंच, अष्टादश पुराणें ह्मणजे भागवत, भारत, शैव इत्यादिक प्राचीन हिंदु इतिहासाचे पवित्र मानलेले ग्रंथ होत. छंदशास्त्र **पिंगल** यानें केलेलें आहे. असो. पुढें कांहीं कालांतरानें हें **सभामंडळ** मोडकळीस आलें. व **भोपाळ** हें एक लहानसें खेडें राहिलें. आमचे पूर्वज सरदार **दोस्तमहंमदखान** यांना शिकारीचा फार नाद होता व ते या तलावावर वरचेवर बदकें, बगळे, क्रौंच, पाणकोंबडे व

मासे, यांची शिकार करण्याकरितां जात असत. व त्यांनां या तलावाचा विस्तार व आसपासच्या पहाडी टेंकड्या व जंगल पाहून ती जागा फार पसंत वाटल्यावरून त्यांनीं शुक्रवार तारीख ९ जिल्हेज सन ११४० हिजरी रोजीं या ठिकाणीं एक मजबूत किल्ला बांधण्याचा पाया घातला. तो किल्ला **भोजराजाच्या** जुन्या किल्ल्यापासून तोफेच्या गोळ्याच्या टप्याच्या बाहेर बांधला व त्याला **फत्तेगड** असें नांव दिलें व त्या दोन्ही किल्ल्यांच्या आसपास बरीच जागा घेऊन एक तट बांधला, व त्यांत एक नवें शहर वसवून ते तेथेंच राहिले. व त्यांनीं त्या शहराची लौकर भरभराटी होण्याविषयीं सपाट्यानें यत्न चालविला. त्याप्रमाणें लौकरच तेथें पुष्कळ वस्ती वाढली. त्यांच्यामागून नबाब **यारमहंमदखान** यांनीं **इसलामनगर** येथें राजधानी नेली. त्यांच्यामागून नबाब **फैज महंमदखान** गादीवर बसले तेव्हां ते **भोपाळांतील** जुन्या किल्ल्यांतच राहूं लागले. त्यामागून नबाब **हयात महंमदखान** गादीवर बसले. त्यांचा दिवाण **छोटेखान** यानें **फत्तेगड** किल्ल्याची जागजागीं दुरुस्ती केली व पुढें तें शहर विशेष भरभराटीस आलें. तसेंच छोटेखान यांनीं किल्ल्याच्या दुसऱ्या बाजूस ३०० गज लांब व २२ गज रुंद असा एक पक्का दगडी बंध बांधून दुसरा तलाव तयार केला.

पुढें सन १२२९ त **ग्वाल्हेर** व **नागपूर** येथील सैन्यांनीं मिळून **भोपाळास** दहा महिने वेढा घातला तेव्हां सर्व लोक आपापलीं घरें सोडून निघून गेले. व तोफांच्या माऱ्यामुळें बहुतेक घरें पडून शहर उजाड झालें. याविषयींची हकीकत पहिल्या प्रकरणांत दिलीच आहे. या आपत्तीनंतर नबाब **नजीर उद्दौला नजरमहमदखान** यांच्या कारकीर्दीत शहराची पुनः आबादी झाली. परंतु त्यावेळीं बांधलेलीं सर्व घरें कच्चीं छपरें व कौलारू होतीं. नबाब **खुदसिया** बेगम साहेब, यांच्या अमलापर्यंत या शहरांत मुख्यत्वेंकरून अफगाण लोकांची वस्ती होती. ते लोक आपलीं हत्यारें व घोडे यांच्याच शोकांत व अभिमानांत निमग्न असत. त्यांना संसार, ऐषआराम किंवा सुखोपभोग यांची मुळींच

परवा नसे. आमचे वडील नबाब **जहांगीर महंमदखान** यांच्या कारकीर्दींतच काय तीं येथें सुधारणा व सामाजिक सौख्य यांचीं चिन्हें थोडीं-थोडीं दिसूं लागलीं. नबाबांनीं इंग्रजी तऱ्हेवर शहराबाहेर छावणी वसविली, व तिला **जहांगिराबाद** असें नांव दिलें व **छोटेखानाच्या** तलावाच्या किनाऱ्यावर एक बाग व महाल बनवून त्यांत ते राहूं लागले. त्यांनीं हजारों रुपये, गांवांतील लोकांनीं व शिपायांनीं तेथें घरें बांधून राहण्याविषयीं, खर्च केले. सुखवस्तू व सर्व शास्त्रें कला व विद्या यांच्यांत निपुण असे पुष्कळ लोक तेथें जमा झाले. यामुळें लोकांत संभावितपणा व सुधारणा वाढूं लागली. लोक चांगले चांगले पेहराव करूं लागले. चांगलें चांगलें अन्न खाऊं लागले. व चांगल्या प्रतिष्ठित घरांत राहूं लागले. वरिष्ठ प्रतीचे लोक ऐषआरामाचे व ज्ञानवृद्धि करणारे असे पदार्थ मिळवूं लागले. त्यांच्यामागून आमच्या मातोश्री **शिकंदरबेगम** यांचा अंमल झाला. त्यांच्या कारकीर्दींत शहरांतील सर्व भागांत चांगले रस्ते झाले, रस्त्यांच्या दुतर्फा दिव्यांचे खांब लावले गेले व शेंकडों चांगलीं चांगलीं घरें बांधलीं गेलीं. देशोदेशींहून हुषार व कुशल कारागीर येथें येऊं लागले. आमच्या कारकीर्दींत हीच तऱ्हा कायम राहून शहराचें वैभव व लोकवस्ती बरीच वाढली व अद्यापि वाढत आहे. रस्ते रुंद केले जात आहेत. रस्त्याच्या दुतर्फा पक्कीं घरें, दुकानें व बाजार बनविले जात आहेत. कच्चीं घरें बांधण्याची मनाई केली आहे. आमच्या हुकुमानें दोन्ही तलावांची मोजणी करून त्यांची लांबी, रुंदी व खोली कायम केली आहे ती येणेंप्रमाणें—मोठा तलाव. उत्तरबाजू १३३९० फूट, दक्षिणबाजू १२७३० फूट, पूर्वबाजू ८२ फूट व पश्चिमबाजू ३१२० फूट लांब आहेत. याची अतिशय खोली १८ फूट, मध्यम १२॥ फूट व कनिष्ठ ६ फूट आहे. याचा घेर २९२८३ फूट असून क्षेत्रफळ १८७६ बिघे १२ बिस्वे आहे. लहान तलावाची पूर्वबाजू ६३२८ फूट, व पश्चिमबाजू ४८८४ फूट व उत्तरबाजू १२७० फूट, व दक्षिणबाजू ३७९९ फूट लांब आहे व त्याचें क्षेत्रफळ २४०

बिघे आहे. या दोन तलावांच्या मध्यें राजा **भोज** यानें बांधलेला किल्ला व बंध यांची जागा आहे, तिचें क्षेत्रफळ १८ बिघे १२ विस्वे आहे. याच्या आसपास ७३ बाग आहेत. त्यांतील विशेष वर्णन करण्याजोगे १२ आहेत ते येणेंप्रमाणें.—

**ऐषबाग**—हा **खुदसिया** बेगमसाहेबांचा असून त्याच्या सभोंवार पक्का कोट आहे. त्याच्या आंत पक्क्या पुष्कळ विहिरी आहेत व तेथें अनेक फळझाडें व निरनिराळ्या जातींचे गुलाब आहेत. त्यांतील एका बावडीभोंवतीं एक प्रशस्त, सुंदर व पक्की इमारत आहे. तशीच तेथें एक लहान मशीद व पुष्कळशा बारद्वाऱ्या आहेत.

**फरहतअफजा**—हा **शिकंदर** बेगमसाहेबांचा बाग आहे, त्यांत फळझाडें व फुलझाडें यांचे तक्ते व रोंस व विहिरी अनेक आहेत. तेथें एक सुरेख मशीद आहे. व मोठ्या गोल विहिरीच्या आसपास बऱ्याचशा मोठमोठ्या इमारती आहेत. एका दगडी चौथऱ्यावर एक सफेत संगमरवरी जाळीदार कठडा आहे. त्याच्या आंत **शिकंदर** बेगमसाहेबांची कबर आहे. हें काम फार सुरेख आहे.

**दिलकुषा**—हा **मदारुल्महाम** यांचा बाग आहे. त्याच्या आसपास कोट असून त्यांत पुष्कळ पक्क्या विहिरी, रोंस व नानातऱ्हेचीं फळझाडें आहेत. तसाच एक फार सुंदर बंगला आहे. यांत अनेक जातींचीं आंब्यांचीं झाडें व द्राक्षवेली आहेत.

**नूरअफषां**—हा माजी नायबदिवाण **राजा किसनराम** यांचा बाग आहे. त्याच्यांत पुष्कळ चांगलीं चांगलीं फळझाडें व इतर उपयोगी झाडें असून त्याचा कोट व आंतील विहिरी पक्क्या आहेत.

**नूरबाग**—हा माजी नबाब **जहांगीर महंमदखान** यांचा आहे. त्याच्यांत उत्तम फळझाडें व सर्व तऱ्हेच्या गुलाबांचीं झाडें आहेत. त्याचा कोट पक्का असून त्याच्यांतील रोंस चांगले व सुंदर आहेत. माजी नबाबांची कबर आहे, तिच्या सभोंवार सुरेख संगमरवरी कठडा आहे. तशीच मीया **अमीर महंमदखान** यांच्यावरील घुमटदार कबर व **सुलेमान**

जहान बेगम इच्या कबरेसभोंवतालचा संगमरवरी कठडा व मशीद हीं कामें चांगलीं, सुरेख व पाहण्याजोगीं आहेत. बागेचा पश्चिमभाग तलावाच्या कांठीं आहे. तो फारच रमणीय आहे. याच्या उत्तरेस शिपायांच्या लाइनी आहेत. दक्षिणेस माजी नवाबांचा महाल आहे, व पूर्वेस सुरेख व प्रशस्त असें कवाइतीचें मैदान आहे. यामुळें हा बाग फारच रमणीय दिसतो.

**राहतअफजा**—हा बाग नवाब **शिकंदर बेगम** यांचे कनिष्ठ चुलते मीयां **फौजदार महंमदखान** यांचा होता. ते तारीख १६ जिल्हेज सन १२८१ हिजरी रोजीं मरण पावले. हा बागही इतर बागांप्रमाणेंच बराच रमणीय व चांगल्या स्थितींत आहे.

**निशातअफजा**—हा खुद्द आमचा बाग आहे. तो फार मोठा असून चांगल्या स्थितींत व सुरेख रीतीनें ठेविलेला आहे. त्याच्या सभोंवार पक्या विटांचा कोट आहे. व त्याचे दरवाजे मोठे व भव्य आहेत. त्यांत सर्व तऱ्हेचीं असंख्य झाडें आहेत. त्याच्यांत फारच सुंदर, रमणीय व विचित्र अशा बारद्वाऱ्या आहेत.

नवाब **अमरावदूला** यांच्या बागासभोंवतीं पक्का कोट आहे व त्याच्या भव्य व सुंदर दरवाज्यावर एक लहानशी सुरेख बाराद्वारी आहे. याशिवाय त्यांत दोन पक्या इमारती, एक हौद व पुष्कळशा गोड पाण्याच्या विहिरी आहेत. या नवाबाची कबरही येथेंच आहे.

नवाब **मुनीरमहंदखान**—यांचा बाग गांवाबाहेर जवळच **गुन्नूरी** दरवाज्यास लागून एका लहान तलावाच्या कांठीं आहे. त्याच्या सभोंवतालचा कोट सुरेख आहे. त्या नवाबास येथेंच पुरलें आहे. या बागाच्या पूर्वेस एक लहानसा बाग नवाब **सादिक हुसेन** यांनीं नवीनच बनविला आहे. व त्यांत एक विहीर व एक मशीद बांधली आहे. हा लहानसाच बाग चांगला टुमदार आहे.

राजा **खुषबख्तराय** यांचा बाग बराच मोठा असून त्याच्यांत त्यांची छत्री आहे.

नबाब **मोईजमहंमदखान** हे नबाब **शिकंदरबेगम** यांचे वडील मामा होते. ते तारीख २७ जमादिलाखर सन १२८६ रोजीं मरण पावले. या बागांत एक मोठी थोरली प्राचीन बावडी असून तिच्या सभोंवार एक कमानीदार इमारत आहे. तसेंच **गोषमहंमदखान** व नबाब **मोईजमहंमदखान** व मीयां **फौजदार महंमदखान** यांच्या कबरी येथेंच आहेत.

**वजीरबाग**—हा मीयां **वजीर महंमदखान** यांचा होता. त्याच्यांत एक मशीद आहे व शिवाय त्यांची स्वतःची व त्यांचे चिरंजीव नबाब **नजर महंमदखान** यांची कबर आहे. तेथें एक मोठी विहीर आहे. तिच्या सभोंवार एक सुंदर कोरींव दगडाची बाराद्वारी बांधली आहे. याशिवाय तेथें आणखी कांहीं पक्या विहिरी आहेत.

या शहरांतील कांहीं कांहीं मुख्य मुख्य इमारती चांगल्या सुरेख व पहाण्याजोग्या आहेत त्याः—आमचा स्वतःचा मोतीमहाल. **शिकंदर बेगम** साहेबांचा महाल. नबाब **खुदसिया बेगम** साहेबांचा महाल. नबाब **मोईज महंमदखान** यांचा महाल. मीयां **फौजदार महंमदखान** यांचा वाडा. **अमरावदूला** यांचा बादल महाल. हवा महाल. नबाब **जहांगीर महंमदखान** यांचा वाडा. सुलेमानिया, व व्हिक्टोरीया हे मदरसे किंवा शाळा व प्रिन्स आफ वेल्स नांवाचा आम्हीं बांधविलेला मदरसा.

या शहरांत पक्या दगडी व विटेच्या मशीदी १०० वर आहेत. त्या सर्वांत नबाब **खुदसिया बेगम** यांनीं ५७५०० रुपये खर्चून बांधलेली जुम्मामशीद ही फारच सुरेख आहे. तिच्या कामास सन १२४८ त आरंभ होऊन तें सन १२७२ सालीं पुरें झालें.

मोतीमशीद, **शिकंदर बेगम** यांनीं **दिल्ली**च्या जुम्मामशिदीच्या नमून्यावर, पांढरा संगमरवरी दगड व लाल दगड यांची बांधविली आहे. तिचें काम अद्यापि पुरें झालें नाहीं. तरी ती इमारत भव्य व सुरेख आहे. या दोन्ही मशीदींच्या तोडीच्या मशीदी याहून मोठमोठ्या शहरांत देखील क्वचितच आढळतील.

नबाब **खुदसिया बेगम** यांनीं युरोपियन लोकांच्या देखरेखीखालीं ६ लाख रुपये खर्चून सर्व शहरांत नळ आणिला आहे. या वरील इमारतींशिवाय सुखवस्तु व श्रीमान लोकांच्या पक्क्या व खोदींव लांकडी इमारती पुष्कळ आहेत. त्या मोठ्या प्रशस्त व सुरेख आहेत. त्यांचें वर्णन येथें होऊं शकत नाहीं. **फत्तेगड**च्या किल्ल्यांत आयुधागार, मेगजीन ९ कोठारें असून बालेकिल्ल्यांत एक महाल आहे. जुन्या किल्ल्यांत नबाब **फैजमहंमदखान** यांची कबर, जेलखाना, व राजा **केशरीसिंग** यांचा महाल, या सुंदर इमारती आहेत. तलावाच्या कांठीं जागजागीं हिंदू लोकांनीं चांगले पक्के व सुंदर घांट बांधलेले आहेत.

---

## भाग आठवा.

### भोपाळच्या राज्यांतील चांगले कामगार व विद्वान लोक यांच्याविषयीं माहिती व उपसंहार.

**भोपाळ** संस्थानांत पूर्वींपासून दरबारच्या सर्व कामांत फारसी भाषा चालत होती. ती आमचे पूर्वज सरदार **दोस्तमहंमदखान** यांच्या वेळेपासून **शिकंदर बेगम**साहेबांच्या अमलापर्यंत चालू राहिली. दरबारांतील सर्व कामकाजासंबंधीं पत्रव्यवहार व जमाखर्च फारसींतच होत असे. इंग्रजसरकारांनीं फारसी भाषा बंद करून सरकारी कामाकाजांत हिंदुस्थानी किंवा उर्दू भाषा चालू केली तेव्हां **शिकंदरबेगम** यांनींही फारसीच्या ऐवजीं हिंदुस्थानी भाषा चालू केली.

पूर्वींच्या नबाबाच्या वेळीं **भोपाळां**त गुणी व विद्वान लोकांची उणीव नव्हती. त्यांच्या वेळीं चांगले चांगले जाडे जाडे विद्वान, काजी, व मुफती, व फकीर व साधू व महात्मे, मौलवी **जियाउद्दीन**, **निजामुद्दीन**, हकीम **वासिल अली**, हकीम **सैफुद्दीन**, शेख **कादरबक्ष**, व दुसरे पुष्कळ विद्वान कायस्थ असे लोक होते. **परंतु** त्या काळीं सर्व लोकांचा भर विशेषतः शिपाईगिरीवर असे. **खुदसिया** बेगम यांच्या अमलांत विद्वान लोकांना बरेंच उत्तेजन मिळालें. हकीम **शहाजाद**

**मसी**, राजा **खुषवक्तराय** व दुसरे पुष्कळ कायस्थ लोक जमाखर्चाच्या व चिटणिशीच्या कामांत चांगले प्रवीण होते. व त्या वेळच्या विद्वान लोकांत मौलवी **अबदुल कादर**, मौलवी **शाहबुद्दीन**, मौलवी **रूफ अहंमद**, मौलवी **इमदाद अली**, हकीम **खादीम हसनखान** बिन मुनशी **बाका उल्लाखान** खैराबादी, हकीम **गुलजार अलीखान** व हकीम **बहादूर अलीखान** वगैरे मुख्य मुख्य होते. पुढें आमच्या वडिलांच्या वेळीं विद्वान लोकांना विशेष उत्तेजन व सहाय्य मिळालें. कारण ते स्वतः विद्वान, हुशार व चतुर होते. त्यांच्या वेळीं भोपाळांत काजी **शरीफहसन**, 'नीरा अजम' व 'अक्सीरे अजम,' या ग्रंथांचे कर्ते हकीम महंमद **अजीमखान**, **अबदुल वाहीद** मिस्कीन, **अबदुल्लाशहा** सूफी, मुनशी **कुंज बिहारी लाल** खलवत, **सय्यद वासील अली**, मुनशी **महम्मद अली**, बक्षी **बहादूर महंमदखान** वगैरे विद्वान लोक जमा झाले होते. तसेंच आमच्या मातोश्रींच्या वेळींही सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध असे विद्वान व चतुर लोक होते. शास्त्रीय विषयांत निष्णात मुनशी **मौलवी हकीम** यांच्याशिवाय उत्तमोत्तम कवीही भोपाळांत आले होते. त्यांत जमाबंदी, हिशेब व राजकारण यांत हुशार असलेल्या लोकांचा विशेष आदर होत असे. हल्लींचे **मदारुल्महाम** हे त्यांतीलच एक आहेत. त्यांनीं पुष्कळ वाईट गोष्टी नाहींशा करून राज्याची सुधारणा केली आहे. ज्ञानाचा प्रसार, खऱ्या धर्माविषयीं चर्चा, व मूर्तिपूजा व पाखंडमत यांचा निषेध, सपाट्यानें चालू आहे. **परमेश्वराच्या** कृपेनें आमच्या कारकीर्दीत विद्वान, योग्य, संभावित, इमानदार, सत्यप्रिय व गुणी लोक यांचा त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें बहुमान होत आहे. **परमेश्वर** अशा लोकांची येथें नेहमीं वृद्धि करो. हल्लीं **भोपाळ** दरबारांत पुष्कळ विद्वान लोक नोकर आहेत त्यांत काजी **जैनुल् आबदीन**, **इनसरी अरब**, **भोपाळचे** काजी मुफती **सय्यद अबदुल्ला**, व जणों ज्ञानभांडारच असे मौलवी **अबदुल कायूम** बिन **अबदुल है** हे लोक फार प्रसिद्ध आहेत. तसेंच विद्वान

हकीम लोकांत हकीम **असगर हुसेन,** हकीम **फर्जंद** अल्ली व हकीम **महम्मद अहेसानुल्ला,** हे दरबारांत नोकर आहेत. तसेंच आपापल्या कामांत निष्णात असे पुष्कळ कारकून व मुनशीही नोकर आहेत.

राजनिष्ठा व राज्यकार्यधुरंधरत्व यांविषयीं प्रसिद्ध असे मदारुल्महाम मुनशी **जमालुद्दीनखान,** सैफुद्दौला **अलीहुसेनखान** मदारुल्महाम यांचे चिटणीस, व खास कचेरीचे मोहतमीम दिवाण **ठाकूरप्रसाद** वगैरे मोठमोठे कामगार प्रसिद्ध आहेत.

खास **भोपाळ**च्या राजघराण्यापैकीं नबाब **वालाजाह** हे इतर सर्व लोकांत जणों रत्नाप्रमाणें आहेत. विद्वत्तेंत कोणीही त्यांची बरोबरी करूं शकत नाहीं. सर्व गुणांत ते आपल्या समकालीन लोकांहून फारच श्रेष्ठ आहेत. गद्यपद्यरचना, सर्व शास्त्रें व त्यांतही धर्मशास्त्र आणि पैगंबरांचे धर्मग्रंथ यांच्या ज्ञानासंबंधानें सर्व भूमंडलांत त्यांचा कोणी हात धरणारा नाहीं. याविषयीं व त्यांच्या विद्वत्तेविषयीं त्यांनीं केलेले ग्रंथ साक्ष देतात. भोपाळांत दुसरे पुष्कळ विद्वान व हुषार कामगार आहेत; परंतु त्यांचें वर्णन स्थलसंकोचामुळें येथें करितां येत नाहीं.

उपसंहार—या इतिहासाचीं तीन प्रकरणें आहेत. पहिल्या प्रकरणांत आमच्या वडिलांच्या वेळेपर्यंतच्या माजी नबाबांविषयीं थोडक्यांत हकीकत दिलेली आहे. दुसऱ्यांत आमच्या मातोश्रींच्या कारकीर्दीची हकीकत लिहिली आहे. तिसऱ्यांत आमच्या कारकीर्दीची सन १२८५ हिजरीपासून सन १२८८ पर्यंतच्या पहिल्या तीन वर्षांची हकीकत आहे. पुढें सालोसालची हकीकत तपशीलवार लिहून या पुस्तकाच्या परिशिष्टरूपानें ती प्रसिद्ध करण्याचा विचार आहे. तो **परमेश्वर** सफल करो.

नबाब वालाजाह अमीरउल्मुलुख सय्यद **महम्मदसादिक हसनखान** बहादूर यांनीं या ग्रंथाची केलेली प्रशंसा—भोपाळचे मालक नबाब **शहाजहान बेगम,** ग्रँड कमाँडर आफ धि स्टार आफ इंडिया, यांच्या वक्तृत्वपरिपूर्ण व सत्यप्रचुर अशा लेखणींतून निघालेला **ताजुल् इक्बाल** नांवचा **भोपाळ**चा इतिहास हा ग्रंथ **परमेश्वरा**च्या कृपेनें संपूर्ण झाला.

यांतील हकीकतीचें, राजकारणांचें व राज्यकारभाराचें प्राचीन व अर्वाचीन काळचें वर्णन नीटपणें शेवटास गेलें. पूर्वींच्या राजांच्या बखरी, तत्कालीन विद्वान् पण पक्षपाती लोकांनीं लिहिल्या असल्यामुळें त्यांत पुष्कळ जागीं वृथा स्तुति व सत्यापलाप आहेत. परंतु हा इतिहास बेगम साहेबांनीं हिंदुस्थानी व फारसी भाषेंत अगदीं खरा असा लिहिला आहे. याची रचना स्पष्ट व साधी असून यांतील मजकूर प्रत्येक सुशिक्षित मनुष्यास आवडण्याजोगा आहे. आपल्या घराण्याचा हा इतिहास व राजकारभाराची हकीकत लिहिण्यांत त्यांनीं फार निष्पक्षपात दाखविला आहे. व प्रत्येक गोष्टींत निवळ सत्याचेंच अवलंबन केलें आहे. या हल्लींच्या काळांत प्राचीन राजवैभव व राजसत्ता नष्ट होत चालली आहे. अशा वेळीं या देशांतील प्राचीन संस्थानांची दुर्दशा होत आहे, ती अवर्णनीय आहे. सर्व हिंदुस्थानांतील हिंदु किंवा मुसलमानी संस्थानिकांत राज्यकारभार करण्याचें कौशल्य, उदारबुद्धि, व बारीक दृष्टि, या संबंधांत या भोपाळच्या स्वामिणीच्या बरोबरीचा एकही संस्थानिक आढळत नाहीं. याविषयीं कोणाला शंका किंवा आश्चर्य वाटेल तर त्यांनीं हा भोपाळचा इतिहास लिहिला आहे तो लक्षपूर्वक पाहावा, व इतर संस्थानांतील राज्यकारभार कशा तऱ्हेनें चालतो याविषयीं नीटपणें चौकशी करावी, म्हणजे त्यांना इतर संस्थानिक, पुरुष असूनही आपला राज्यकारभार कसा चालवितात व केवळ आळसानें व अलगर्जीपणानें आपली बदनामी व्यर्थ कशी होऊं देतात तें उत्तम प्रकारें लक्षांत येईल व नंतर भोपाळच्या स्वामिणीनें राज्यकारभार व धर्मव्यवस्था या संबंधानें ज्या सुरेख व्यवस्था केल्या आहेत त्यांच्याशीं तुलना केली असतां त्यापासून मोठमोठ्या राज्यकार्यधुरंधर व विद्वान लोकांनाही राज्यकारभार व जमाखर्च यांच्या संबंधांत यापासून नमूने घेतां येतील, असें खचित दिसून येईल.

हा इतिहास आजकालच्या संस्थानिक लोकांच्या हातीं, चांगली राज्यव्यवस्था कशी असते त्याचा नमूना मिळण्याकरितां दिला पाहिजे. तसेंच सर्व राज्यकारभार करणाऱ्या लोकांनीं त्यावरून राज्यसुधारणा

कशी करावी याविषयीं कित्ता मिळणार आहे. या ग्रंथावरून त्यांना आपल्या व्यवस्थेंतील दोष कळून येतील. हा एवढा लहानसा ग्रंथ असून त्यांत राज्यव्यवस्थेचे मोठे मोठे प्रश्न कसे सुरेख उलगडले आहेत व प्राचीन व अर्वाचीन काळच्या अनेक गोष्टी थोडक्याशा पानांत कशा सुंदर रीतीनें आणल्या आहेत त्या पहा. पूर्वींच्या व हल्लींच्या मोठमोठ्या गोष्टी व किरकोळ माहिती व ऐतिहासिक माहिती या लहानशा तीन प्रकरणांत लिहिली आहे. हा ग्रंथ इतका सोपा आहे कीं, त्यावरून लहान मुलांना देखील राज्यव्यवस्थेचें ज्ञान होईल. व तो इतका ज्ञानानें भरला आहे कीं तो वाचून विद्वान लोकांनाही आपलें ज्ञान बरेंच वाढलें असें वाटेल. मागील इतिहास हल्लींच्या पिढीला धडा घालून दिल्याप्रमाणें होतो. हल्लीं होणाऱ्या गोष्टी पुढच्या पिढीच्या लोकांना उदाहरणाप्रमाणें व उपदेशाप्रमाणें होतात. खास संस्थानिकांच्या मुलांबाळांना हा ग्रंथ शिक्षण देण्याला मार्गदर्शक व स्मारक असा होईल. हा ग्रंथ जणों 'जामें जहांनुमा' ( जगदादर्श ) 'आयना शिकंदर'–( **शिकंदरबाद**शहाचा जादूचा आरसा ) व 'आईने जहांदारी' ( राजनीतीचें भांडार ) याप्रमाणें आहे. **भोपाळ**ची स्वामिणी राज्यव्यवस्थेच्या कामांत इतर सर्व संस्थानिकांमध्यें एखाद्या रत्नाप्रमाणें चमकत आहे. त्याचप्रमाणें आमच्या धर्माची वृद्धि करण्याच्या कामीं व धर्माच्या आज्ञा पालन करण्याच्या कामीं व पातक व नास्तिकपणा यांच्या त्यागाच्या संबंधांत त्यांची बुद्धि व त्यांचें धैर्य, त्या स्त्री असूनही, कोणाही मनुष्याहून कमी नाहींत. याबद्दल **परमेश्वरा**चा धन्यवाद करावा तितका थोडा आहे.

या एका **भोपाळ** शहरांत मशीदी, मदरसे, व विद्वान मुसलमान लोक यांचा असलेला मोठा समुदाय व येथील लोकांचें धार्मिक वर्तन व मशीदींतील गजबज, व **भोपाळां**तील लोकांचें धर्माचे ठायीं लक्ष, या गोष्टी ज्यांनीं पाहिल्या असतील त्यांना या शहरांत धर्माचा पाया अद्यापि चांगला भक्कम कायम आहे असें कबूल करावें लागेल. तसेंच स्वस्थता व प्रजेचें हल्लींच्या काळमानानें स्वातंत्र्य व सौख्य या संबंधांत हें शहर सर्व

**हिंदुस्थानां**त अप्रतिम असून, **अफगाणिस्थान** व **सिंध** या राज्यांसही लाजवितें. **परमेश्वरानें** येथील स्वामिणीच्या अंगीं जितके सद्गुण एकत्र केले आहेत तितके **भोपाळच्या** पूर्वीच्या कोणाही संस्थानिकाच्या अंगीं नव्हते. सोशीकपणा, धैर्य व चातुर्य या संबंधांत त्या जणों एखाद्या किल्ल्याप्रमाणें आहेत. दया, धर्म, औदार्य, भूतदया, व उपकार, यांविषयीं त्यांची दिगंतरीं कीर्ति आहे. त्या फार शांत व प्रेमळ, विचारी व दयाळू, आपल्या आश्रितांशीं ममतेनें वागणाऱ्या, गरिबांवर उपकार करणाऱ्या, उदार, निःपक्षपाती व न्यायी अशा आहेत.

याप्रमाणें लिहिण्यांत मला कांहीं स्वार्थ साधावयाचा आहे असें नाहीं. कारण मी त्यांचा पतीच आहें, त्यांच्याहातून कांहीं इनाम मिळण्याची इच्छा करणारा दरबारी नव्हे. **परमेश्वरानें** मला पुष्कळ व पुरेसें दिलें आहे. हें पुस्तक त्यांनीं माझ्या विशेष आग्रहावरून लिहिलें आहे व तें प्रसिद्ध झाल्यानें या राज्याचें व खऱ्या धर्माचें हित पुष्कळ साधलें आहे. यांत दिलेली हकीकत खरी आहे. व सर्व गोष्टी जशा घडल्या तशा दिल्या आहेत, याबद्दल **परमेश्वराचे** आभार मानले पाहिजेत.

आतां चौथ्या प्रकरणास आरंभ करून, लिहून ठेवण्यालायक गोष्टी घडत जातील तसतशा तपशीलवार लिहून एकत्र केल्या जातील, व त्या तयार झाल्यावर पुढें कांहीं कालानें **परमेश्वराच्या** कृपेनें त्या या ग्रंथांत सामील केल्या जातील.

शहाण्यास एक शब्द पुरे आहे.